# मधुराणी

श्री रवींद्रनाथ टागोर यांच्या
मूळ कथानकावरून मराठींत

भाषांतरकार
शिवराम गोविंद भावे




सत्य प्रकाशक मंडळी
गिरगांव, मुंबई

१९२०

# प्रस्तावना

सुविख्यात वंगकवि श्री रवींद्रनाथ टागोर यांच्या एका कादंबरीची प्रतिकृति प्रस्तुतचें पुस्तक आहे. ही कादंबरी रवींद्रबाबूंनीं बंगाली भाषेंत 'घरे बाइरे' या नांवानें लिहिलेली असून बाबू सुरेंद्रनाथ टागोर यांनीं केलेलें तिचें इंग्रजी भाषांतर 'ॲट होम ॲण्ड आउटसाइड' या मथळ्याखालीं मॉडर्न रिव्ह्यूमध्यें १९१८ सालीं क्रमशः प्रसिद्ध झालें आहे. प्रस्तुत पुस्तक या इंग्रजी भाषांतरावरून तयार केलें आहे.

बंगाली भाषेशीं मुळींच परिचय नसल्यामुळें हा असा लांबून घास घ्यावा लागला आहे. यामुळें मूळ बंगाली पुस्तकाशीं प्रस्तुत भाषांतर शब्दास शब्द जुळेलच असें नाहीं. तथापि दोहोंत फरक राहूं नये, व इंग्रजी भाषेच्या सांनिध्यामुळें मुळांतील माधुर्याला धक्का बसूं नये, यासाठीं शक्य तेवढा प्रयत्न करण्यांत आला आहे.

रवींद्रबाबूंच्या लेखनशैलींतील माधुर्य, सौष्ठव आणि सौंदर्य हीं इतर ठिकाणांपेक्षां या कादंबरींत विशेष चमकत आहेत.

याशिवाय सत्य आणि मिथ्या, स्वाभाविक आणि कृत्रिम, यांचा मनोहर व सुलभ ऊहापोह; मनुष्याचा धर्म, त्याचें ध्येय व परिस्थितीचा त्यांवर होणारा परिणाम, इत्यादिकांचें उद्घाटन; मनुष्यस्वभावाची चंचलता, त्यांतील स्वपरभाव, इत्यादि तत्त्वज्ञानविषयक सूक्ष्म विचारांचें साहजिक व हृदय हालवून सोडणारें विवेचन; उत्कट राष्ट्राभिमानाचें तेजस्वी चित्र व भलत्याच कल्पनांच्या अभिनिवेशाचा परिणाम; इत्यादि गोष्टींमुळें ही कादंबरी फारच बोधप्रद व विचारजनक झाली आहे. निरनिराळ्या गोष्टींमधून, निरनिराळ्या गीतांमधून, लेखांतून, व्याख्यानद्वारा, अशा अनेक प्रकारें व अनेक वेळीं जीं जीं तत्त्वें रवींद्रबाबू प्रतिपादन करीत असतात त्या सर्वांचा समावेश या कादंबरींत फार उत्तम अशा चौकटींत झाला आहे. इंग्रजी भाषेचा एक संप्रदाय उसना घेऊन बोलावयाचें तर थोडक्यांत असें म्हणतां येईल कीं, रवींद्रबाबूंचें सर्व तत्त्वज्ञान प्रस्तुत कादंबरींत सांठविलेलें आहे. तेव्हां अशा कादंबरीचें भाषांतर मराठींत होणें अत्यावश्यक होतें असें माझ्याप्रमाणेंच इतरांनाही वाटेल असा मला दृढ भरंवसा आहे.

आपल्या अशा सुंदर पुस्तकाचें भाषांतर करण्यास उदारपणें परवानगी देऊन रवींद्रबाबूंनीं मला आपला विचारवाहक केलें हा माझ्यावर त्यांचा फारच मोठा अनुग्रह आहे; व त्याबद्दल त्यांचे आभार मानावे तितके थोडेच आहेत.

असो; पुस्तक भाषांतररूप आहे, तेव्हां त्याची प्रस्तावना एवढी लांबली हेंच फार झालें. करितां येथेंच थांबून रवींद्रबाबूंच्या सुरम्य कृतीचा आस्वाद घेण्यास वाचकांना मोकळें करावें हेंच बरें.

भाषांतरकार.

भाषांतरकार

## प्रकरण पहिलें

### विमलेची आत्मकथा

### १

मला एका राजघराण्यांत दिली होती. हें घराणें मोंगल बादशहांच्या काळापासून मानमान्यतेस चढलेलें होतें. आमच्या घराण्याच्या रीतिभातींतील कांहीं रीतिभाती मोंगल अगर पठाण लोकांच्या असून कांहीं मनु अगर पराशर यांनीं सांगितलेल्या होत्या. परंतु माझे पति मात्र पूर्ण आधुनिक होते. कॉलेजचें शिक्षण घेऊन एम. ए. ची पदवी आमच्या घराण्यांत पहिल्यांदा माझ्या पतींनींच मिळविली होती. दारूच्या अतिरेकानें माझे दोघेही वडील दीर तरुणपणींच वारले असून त्यांना अपत्य मुळींच नव्हतें. माझे पति दारू पीत नसत आणि इतरही कसलीं व्यसनें त्यांना लागलेलीं नव्हतीं—परंतु ही त्यांची वर्तणूक आमच्या घराण्याच्या चालीशीं इतकी विसंगत होती कीं, तिजबद्दल त्यांचें हंसें होई. ज्यांच्यावर लक्ष्मीची कृपा नाहीं

त्यांनाच फक्त शुद्धाचरण शोभतें. आकाशांत डाग चंद्रावरच सांपडतात; ते कांहीं तारकांवर सांपडत नाहींत.

माझ्या सासूसासऱ्यांचा अंत होऊन पुष्कळ दिवस झाले होते. हल्लीं आमच्या घरांत माझ्या आजेसासूचें वर्चस्व असे. त्या माझ्या पतींना अगदीं जीव कीं प्राण करीत व अगदीं तळहातावरील फोडाप्रमाणें वागवीत. आणि ह्मणूनच माझ्या पतींना आमच्या प्राचीन चालीरीतींचें उल्लंघन करण्यास मुळींच दिक्कत वाटत नसे. त्यांनीं जेव्हां मिस् गिल्बीला मला शिकविण्यासाठीं आणि मजजवळ राहण्यासाठीं आणिली तेव्हां घरीं आणि दारीं पुष्कळांनीं विषारी फूत्कार सोडले. परंतु त्यांना तोंड देऊन माझ्या पतींनीं आपला निश्चय ढळूं दिला नाहीं तो केवळ आपल्या आजीच्या प्रेमाच्या जोरावरच.

मिस् गिल्बी आली तेव्हां माझ्या पतींची बी. ए. ची परीक्षा नुकतीच पास झाली होती; आणि एम. ए. चा अभ्यास करण्यासाठीं त्यांना कलकत्त्यास राहावें लागत असे. मला त्यांचें पत्र बहुतेक रोज येई. त्यांत मजकूर थोडा असे, आणि तोही अगदीं साध्या शब्दांत. परंतु त्या पत्रांतील त्यांचें तें मोठें वाटोळें अक्षर माझ्याकडे जणूं अत्यंत प्रेमानें टवकारून पाहत आहे असें मला वाटे. मी तीं सर्व पत्रें एका देवदाराच्या पेटींत ठेवीं, व बागेंतून फुलें गोळा करून आणून त्यांनीं त्या पेटीची पूजा करीत असें. पति आणि पत्नी यांचा दर्जा प्रेमाच्या साम्राज्यांत सारखाच आहे, कारण दोघेंहीजण एकमेकांपासून सारख्याच प्रेमाची अपेक्षा करीत असतात असें माझे पति

नेहमीं ह्मणत. या बाबतींत मी त्यांच्याशीं मुळींच वाद करीत नसें. परंतु माझी मात्र अशी पक्की खात्री होती कीं, स्त्रियांच्या प्रेमाचें पर्यवसान सेवाच होय—नाहींतर त्या प्रेमाला धिक्कार असो. खरें प्रेम जागृत होतांच त्याची ज्योत वरच जळत राहणार.

आमचा एक काळ जेव्हां सुखाचा होता तेव्हां आमच्या सभोंवार मत्सराच्या ज्वाळा कशा भडकून राहिल्या होत्या हें आज मला पक्कें आठवतें; आणि तसें होणें अगदीं स्वाभाविक होतें. कारण मी अगदीं कोणाच्या ध्यानींमनींसुद्धां नसतांना एवढ्या श्रीमंत घराण्यांत पडलें होतें व तीही आंगीं कांहीं योग्यता नसतांना. कित्येक दिवसपर्यंत रोजच्यारोज श्रम करून भवितव्यतेनें आपण होऊन दिलेलें ऋण फेडून तिला आपलीशी केल्याशिवाय मनुष्याचा सुखाचा काळ कायम राहत नाहीं. ईश्वर आपल्याला पुष्कळ देईल, परंतु तें घेऊन कायम राखण्याची शक्ति आपलीच पाहिजे. परंतु, अरेरे ! ईश्वरानें आपण होऊन दिलेल्या देणग्या कितीतरी अयोग्य माणसांच्या हातीं पडून निष्फळ होतात !

माझी सासू आणि आजेसासू यांची सौंदर्याविषयीं फार ख्याति होती. आणि माझ्या दोन विधवा जावांच्या रूपासारखें रूप क्वचितच पाहावयास मिळालें असतें. परंतु त्यांना दैवानें जेव्हां अनाथ केलें तेव्हां आपल्या राहिलेल्या नातवाला सुंदर स्त्री मिळविण्याच्या भानगडींत पडावयाचें नाहीं असा माझ्या आजेसासूनें निश्चय केला. माझ्या पत्रिकेंतील शुभ ग्रह व माझ्या

शरीरावरील कांहीं शुभ लक्षणें यांच्याचमुळें माझा या घरांत प्रवेश झाला; नाहींतर मी येथें पडणें शक्यच नव्हतें.

आमच्या ह्या ख्यालीखुशालींत राहणाऱ्या घरांत फारच थोड्या स्त्रियांना आपल्या पतींकडून योग्य तो मान मिळाला. परंतु त्यांना आमच्या घरच्या चालीरीतींची इतकी संवय झालेली होती कीं, रोज जरी त्यांना दारूच्या धिंगाण्यामुळें व वेश्यांच्या नृत्यामुळें रडून रडून डोळे कोरडे करावे लागत, तरी प्राचीन घराण्यांतील राणीपदाच्या अभिमानानें मान वर करून ताठ्यानें वागण्यांत त्या मुळींच कमी करीत नसत. माझे पति दारूला शिवत नसत व स्त्रियांच्या बाजारांत आपल्या पुरुषत्वाचा अपव्यय करीत नसत याचें श्रेय मजकडे होतें काय ? अशी कोणती मोहिनीविद्या मला अवगत होती कीं, तिच्या योगानें मी पुरुषांच्या उद्दाम आणि भटकणाऱ्या मनाला शांत करूं शकावें ? हें माझें सुदैव होतें; दुसरें कांहीं नाहीं. कारण संध्याकाळ होण्यापूर्वींच माझ्या जावांचा उत्सवदिन आटोपला; व मग त्या भयाण व निर्जन स्थानांत रात्रीं फक्त त्यांचें यौवन व सौंदर्य हींच काय तीं मिणमिण जळत राहिलीं, आणि सर्व संगीत नाहींसें होऊन जिकडे तिकडे हृदयाचा भडकाच कायम राहिला; हें जें सर्व झालें तें तरी त्या दैवाची तशी इच्छा होती म्हणूनच ना ?

माझ्या पतींच्या मतांविषयीं माझ्या जावा अगदीं तिरस्कार दाखवीत. अत्यंत प्राचीन काळापासून प्राप्त झालेल्या यशानें भरलेली कुटुंबनौका आपल्या एकाच लहानग्या पत्नीच्या

निशाणाखालीं चालवावयाची हा केवढा मूर्खपणा ! "आपल्या नवऱ्याचें प्रेम हरण करणारी चोर," "आपल्या नवीन पद्धतीच्या वस्त्रप्रावरणांच्या निर्लज्जतेखालीं लपून राहणारी कपटी," असल्याप्रकारचे त्यांच्या तिरस्काराचे फटके मला कितीदां तरी खावे लागले आहेत. निरनिराळ्या रंगांचीं आधुनिक तऱ्हेचीं वस्त्रें माझे पति मला मोठ्या प्रेमानें आणून देत त्याचा त्यांना हेवा वाटे. "आपलें सर्व शरीर–तोंडसुद्धां –कापडाचें दुकान बनविण्याची हिला लाज तरी कशी वाटत नाहीं," असें त्या म्हणत.

माझ्या पतींना हें सर्व माहीत होतें; परंतु स्त्रियांविषयींच्या त्यांच्या सौजन्याला सीमाच नव्हती. माझ्या जावांना क्षमा करण्याबद्दल मला ते नेहमीं विनवीत. मला चांगली आठवण आहे; मीं एक दिवस त्यांना म्हटलें, "स्त्रियांचीं मनें किती क्षुद्र आणि किती वक्र असतात !" यावर त्यांनीं उत्तर दिलें; "अगदीं चिनी स्त्रियांच्या पावलांसारखीं. त्यांना हा क्षुद्रपणा व वक्रपणा केवळ सामाजिक बंधनांच्या दडपणाखालीं खुरटून गेल्यामुळें प्राप्त झाला आहे नव्हे का ? त्यांचीं मनें जुगार खेळणाऱ्या दैवाच्या हातचीं केवळ खेळणीं होत. त्यांना स्वत:सिद्धता व जबाबदारी अशी कोठें आहे ? "

माझ्या जावांना जें जें कांहीं हवें असे तें तें सर्व त्यांना माझ्या पतींकडून बिनतक्रार मिळे. त्यांच्या मागण्या चांगल्या कीं वाईट योग्य कीं अयोग्य याचा ते क्षणभरही विचार करीत नसत. परंतु या सर्वांबद्दल त्यांच्याशीं त्या कृतज्ञतेनें वागत नसत याबद्दल

मात्र माझें चित्त फार क्षुब्ध होत असे. माझी वडील जाऊ तर— हिचा वेळ आणि पैसा उपासातापासांत व व्रतांवैकल्यांत इतका खर्च होत असे कीं, त्यापैकीं आत्मोन्नतीसाठीं खर्च करण्यास तिजजवळ कांहींच शिल्लक राहत नसे—नेहमीं मला ऐकूं येईल अशा रीतीनें म्हणे, “ माझा वडील भाऊ मोठा प्रख्यात वकील आहे. तो म्हणतो कीं, कोणत्याही कायद्याच्या कोर्टांत मला—” पण राहूं दे. त्यांचीं तीं घाणेरडीं बोलणीं मी येथें लिहीत नाहीं. माझ्या पतींना मीं वचन दिलें होतें कीं, जावांना मी उलट उत्तर बोलणार नाहीं. परंतु त्यामुळें तर माझ्या हृदयाचा आंतून जास्तच भडका होई. चांगुलपणाला झाली तरी कांहीं मर्यादा आहेच. तिचें पुरुषांनीं उल्लंघन केल्यास त्यांच्या आंगीं नामर्दपणा आला असें मला नेहमीं वाटे. मी सगळें ओकूंच का ? आपल्या चांगुलपणाला थोडीशी मर्यादा घालण्याइतका मर्दपणा माझ्या पतींच्या आंगीं यावा असें मला कितीदां तरी वाटे.

माझी दुसरी जाऊ निराळ्या प्रकारची होती. ती अगदीं तरुण असून साधुपणाचा टेंभा ती मुळींच मिरवीत नसे. उलट तिच्या बोलण्यांत, थट्टेंत आणि हंसण्यांत थोडी फार छचोरपणाचीच झांक दिसे. उद्दाम, तरुण आणि नाचऱ्या अशा दासींच्या घोळक्यांत ती नेहमीं असे. परंतु याबद्दल तिला कोणीही दोष देत नसे. कारण आमच्या घरची रीतच तशी नव्हती का ? माझ्या मोठ्या सुदैवानें मला अगदीं निष्कलंक पति मिळाला ही गोष्ट तिच्या डोळ्यांत विशेष सलत असावी

असें मला वाटे. माझ्या पतींना मात्र त्यांच्या स्वभावांतील दोषांपेक्षां त्यांच्या दुर्दैवाविषयींच जास्त वाईट वाटे. त्याबद्दल त्यांचा मी नेहमीं निषेध करीं. मी म्हणें, " हा जरी आपल्या समाजाचाच दोष असला तरी इतक्या लीनतेनें तुम्ही त्याच्यापुढें मान कां वांकवितां? जरी तुम्हांला थोडेंसें दुःख सोसावें लागलें तरीसुद्धां तुम्हीं—" परंतु या बाबतींत ते वादच करीत नसत; नुसते हंसत मात्र.

मला पडद्यांतून बाहेर काढण्याबद्दल माझ्या पतींची फार जबर इच्छा होती. मीं एक दिवस त्यांना म्हटलें, " पण मला बाहेरच्या जगाशीं काय करावयाचें आहे? "

त्यांनीं उत्तर दिलें, " बाहेरच्या जगाला तुझ्याशीं कांहीं करावयाचें असेल. "

" परंतु बाहेरच्या जगाचें आजपर्यंत जसें माझ्याशिवाय चाललें तसेंच तें पुढेंही चालेल; माझ्यावांचून झुरून मरण्याची कांहीं त्याला वेळ येणार नाहीं. "

"मरेना कां बिचारें मेलें तर; मी त्याविषयीं डोक्याला मुळींच शीण देत नाहीं. मी फक्त माझ्या स्वतःचा विचार करीत आहें."

" अस्सं! खरंच का? आणि गडे असा काय तो आपल्या स्वतःविषयींचा विचार? "

नेहमींप्रमाणें, स्मित करून माझ्या पतींनीं बोलणें बंद केलें. मला त्यांचा हा मार्ग चांगला आंगवळणी पडला होता. तेव्हां मीं लगेच जोरानें म्हटलें, " छे, छे! आपल्याला असें माझ्या ताब्रडींतून पटकन सुटून जातां येणार व्यसनांचा

बाबतींत आपण मन मोकळें करून शेवटपर्यंत बोललेंच पाहिजे. ”

“ नुसत्या बोलण्यानें एखाद्या विषयाचा शेवट करतां येणें शक्य आहे काय ? ”

“ गडे, आपलीं हीं असलीं गूढ बोलणीं सोडून देऊन मला असें सांगा—”

“ बरें आहे; माझी अशी इच्छा आहे कीं, माझी संगत तुला आणि तुझी मला हल्लींपेक्षां जास्त मोकळ्या जगांत अनुभविण्यास सांपडावी. या एकाच बाबतींत आपण एकमेकांचें थोडें फार देणें लागतों. ”

“ कां बरें ? प्रेमांत ज्या गोष्टींची कमतरता आहे त्या आपल्याला घरीं नाहीं का मिळत ? ”

“ परंतु घरीं तुला माझ्याशिवाय कांहींच दिसत नाहीं. व तुझें असें काय आहे आणि तुला कशाची कमतरता आहे यांपैकीं तुला कांहींच कळत नाहीं. ”

“ हें पहा ! आपण असें बोललेलें मला मुळींच सहन होत नाहीं.”

“ आणि एवढ्याचसाठीं प्रथम मी हें बोलूं इच्छीत नव्हतों तो. ”

“ परंतु आपलें गप्प बसणें तर मला मुळींच सहन होत नाहीं. ”

[illegible] मला माझ्या पतींचें हें असलें बोलणें मुळींच आवडत नसे. पति मिळाला [illegible]ें मी जनाना सोडून जाण्यास तयार होत नव्हतें

असें मात्र मुळींच नव्हे. त्यावेळीं माझी आजेसासू हयात होती. माझ्या पतींनीं आमचें घर शेंकडा १२० टक्के "विसाव्या शतकानें" भरून टाकिलें होतें तरी हें त्यांचें कृत्य माझ्या आजेसासूनें एक चकार शब्द न बोलतां सहन केलें होतें. आपल्या राजघराण्यांतील सून अंतरंग सोडून गेली असती तरी त्यांनीं तें तसेंच सहन केलें असतें. हें असें होणार हें जाणून तें सहन करण्यासाठीं त्यांनीं आपलें हृदय घट्ट करून ठेविलेंच होतें. परंतु या बाबतींत त्यांना दुखविण्याइतकी ती बाब मला महत्त्वाची वाटली नाहीं. आम्हां स्त्रियांना पिंजऱ्यांत कोंडलेले पक्षी असें म्हटलेलें मीं वाचिलें आहे. इतरांविषयीं कांहीं मला बोलतां येणार नाहीं; पण मला माझ्या पिंजऱ्यांत इतक्या कांहीं गोष्टी प्राप्त होत होत्या कीं, त्या सर्व सृष्टींत देखील मावूं शकणार नाहींत—निदान त्यावेळीं तरी मला असें वाटे.

माझ्या आजेसासूला मी फार आवडत असें. माझ्या पत्रिकेंतील ग्रहांच्या शुभ संयोगाच्या जोरावर मीं माझ्या पतींचें मन आकर्षून घेतलें होतें हा विचार त्यांच्या मजवर असलेल्या प्रेमाच्या मुळाशीं होता. पुरुषांचा कल स्वभावतःच अधःपतनाकडे नसतो काय? माझ्या जावा इतक्या सुंदर होत्या तरी खोल आगींत पडणाऱ्या आपल्या पतींना आपल्या सौंदर्याच्या बळावर कांहीं त्या आवरूं शकल्या नाहींत; आणि ते त्या आगींत सांपडून जळून भस्मसात्‌ही झाले. माझ्या आजेसासूला वाटे कीं, आपल्या घराण्यांतील व्यसनांचा

हा भयंकर अग्नि शमविण्याच्या कामीं आपल्या सर्वांत धाकट्या सुनेचें—माझें—साहाय्य झालें. आणि म्हणूनच त्या मला आपल्या प्रेमछत्राखालीं वागवीत. मला जरा कांहीं थोडेंसें झालें कीं, त्या भीतीनें घाबऱ्या होत. मला सजविण्याकरितां युरोपियन दुकानांतून माझे पति जीं वस्त्राभरणें आणीत तीं त्यांना मुळींच आवडत नसत. परंतु त्या आपल्याशीं म्हणत, "पैशाची उधळपट्टी होण्यासारखा पुरुषांना कांहींतरी नाद हा असतोच; त्यांच्या उधळपट्टीला आळा घालण्याचा प्रयत्न करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. त्यांनीं आपला सर्वस्वीं नाश करून घेतला नाहीं म्हणजे झालें. आपल्या बायकोला नटविण्याच्या कामांत जर माझ्या निखिलनें पैसा उधळला नसता तर मग त्यानें तो आणखी कशाकशांत उधळला असता आणि कशाकशांत नाहीं हरि जाणे!" जेव्हां जेव्हां मला नवा पोषाख विकत आणून मिळे तेव्हां तेव्हां माझ्या पतींना आपल्या जवळ बोलावून त्यांची पुष्कळ प्रकारें थट्टा करून आपल्याला त्या पोषाखाबद्दल कांहींच वाटलें नाहीं असें त्या दाखवीत. अशा रीतीनें त्यांची आवडनिवड इतकी पालटली आणि त्यांच्यावर आधुनिक जगाचें इतकें वर्चस्व बसलें कीं, प्रत्येक दिवशीं संध्याकाळीं त्यांना जर मीं इंग्रजी पुस्तकांतल्या गोष्टी सांगितल्या नाहीं तर त्यांचा दिवस जात नसे.

माझी आजेसासू स्वर्गवासी झाल्यानंतर मीं कलकत्त्यास जाऊन राहावें अशी माझ्या पतींनीं आपली इच्छा प्रगट केली. परंतु मला कांहीं जावेंसें वाटेना. याच आमच्या घराचें संरक्षण

मोठमोठ्या अडचणींतून आणि संकटांतून माझ्या आजेसासूनें केलें नव्हतें काय? आणि तेंच सोडून मी कलकत्त्यास गेलें तर त्या मला शाप देणार नाहींत काय?—असा विचार रिकाम्या आणि मजकडे टंवकारून पाहणाऱ्या त्यांच्या बसण्याच्या जागेकडे पाहतांच माझ्या मनांत येई व मला जाऊं नये असें वाटे. ती साध्वी स्त्री या आमच्या घरांत आपल्या आठव्या वर्षी आली व त्याच घरांत तिनें ७९ व्या वर्षापर्यंत दिवस काढले. त्यांचें आयुष्य कांहीं सुखांत गेलें नाहीं. दैवानें आपले तीक्ष्ण बाण त्यांच्या हृदयावर एकसारखे फेंकले; परंतु प्रत्येक समयीं त्यांच्या जखम झालेल्या हृदयांतून अमृतच बाहेर पडलें. त्यांच्या अश्रूंनीं पवित्र झालेलें हें घर सोडून कलकत्त्यास जाऊन मला काय मिळणार?

माझ्या पतींची कल्पना अशी होती कीं, आम्ही कलकत्त्यास गेल्यानें माझ्या जावांना घरांत आपली सर्वस्वीं हुकमत चालविण्यास चांगली संधि मिळेल; व कलकत्त्यांत आमच्या आयुष्यालाही जास्त विविधता प्राप्त होईल. पण येथेंच कायती माझी मुख्य अडचण होती. आजपर्यंत मला माझ्या जावांनीं किती त्रास दिला होता. माझ्या पतींचें सुख त्यांना अगदीं सहन होत नसे. आणि याचबद्दल उलट त्यांना हें बक्षीस मिळावयाचें होतें. पण आम्ही कलकत्त्याहून पुन्हां येथें परत येऊं तेव्हांची वाट काय? तेव्हां मग मला घरांत आपलें वर्चस्व स्थापतां आलें असतें काय?

“पण,” माझे पति म्हणत, “तुला आपल्या घरांतल्या

वर्चस्वाशीं काय करावयाचें आहे. संसारांत त्यापेक्षां जास्त महत्त्वाच्या दुसऱ्या गोष्टीच नाहींत कीं काय ? "

" पुरुषांना काय या बाबतींत समजतें ? " मी आपल्याशीं म्हणें, "त्यांचीं सर्व घरटीं बाहेर असतात; घर म्हणजे काय याची किंमत त्यांना मुळींच ठाऊक नसते. या बाबतींत त्यांनीं स्त्रियांच्या मागूनच आलें पाहिजे. " खरा मुद्दा असा आहे कीं, प्रत्येकानें आपले हक्क सांभाळण्याकरितां कंबर बांधून असलें पाहिजे. आपल्याशीं ज्यांनीं आजपर्यंत शत्रुत्व केलें त्यांच्या हातीं सर्व कांहीं देऊन दूर निघून जाणें म्हणजे आपला पराभव झाला ही गोष्ट जाहीर करणेंच होय.

याच सुमारास बंगालमध्यें " स्वदेशीचा " काळ आला. त्याचबरोबर नवयुगाच्या उदयानें माझें मन, माझी दृष्टि, माझ्या आशा व इच्छा हीं सर्व उद्दीपित झालीं. ज्या एका मर्यादित वर्तुळांत आमच्या आयुष्यांतील हेतु आणि ध्येयें, प्रयत्न आणि महत्त्वाकांक्षा हीं अत्यंत सुखकर आणि सुंदर रीतीनें सांठविलीं होतीं तें वर्तुळ यामुळें मोडलें असें कांहीं नव्हे; परंतु लांब क्षितिजापासून आपल्याला कोणीतरी बोलावीत आहे असें मला वाटे. आणि त्या बोलावण्याचा अर्थ जरी मला स्पष्ट कळत नसे तरी त्यामुळें माझ्या मनांत खोलवर खळबळ उडून जात असे.

माझे पति कॉलेजमध्यें गेल्यापासून आपल्या लोकांना लागणाऱ्या वस्तु आपल्याच देशांत तयार व्हाव्या याबद्दल त्यांचे पुष्कळ प्रकारचे प्रयत्न चालले होते. कांहीं काळ लोटल्यानंतर त्यांनीं आपल्या अनुभवांतून असा निष्कर्ष

ाढिला कीं, आपले उद्योगधंदे जे पुढां उदय पावत नाहींत ाचें कारण आपली अशी एक बँक ( पेढी ) नाहीं हें होय. ाचवेळीं ते मला अर्थशास्त्र समजावून देत असत. एवढेंच करून ते थांबते तर कांहीं विशेष नुकसान झालें नसतें; परंतु क काढण्याचा मार्ग सुकर व्हावा म्हणून लोकांनीं काटकसरीनें ागावें असा त्यांनीं लोकांना उपदेश सुरू केला, आणि नंतर ांनीं स्वतःच एक लहानशी बँक काढिली. बँकेचा व्याजाचा ः भरपूर असल्याकारणानें खेडेगांवच्या लोकांनीं तींत पैसा ाक्या उत्साहानें घातला कीं, त्या पैशाच्या वजनानें बँकच पार दडपून गेली.

हें पाहून जमीनदारींतील जुन्या नोकरांना वाईट वाटून भीतीही वाटली. शत्रुपक्षांतील लोक तर या प्रकाराची चेष्टा करून आनंदानें उड्या मारूं लागले. "कोर्टांत कायदेशीर रीतीनें काम चालवून या प्राचीन घराण्याची संपत्ति व अब्रू यांचें या वेड्यापासून अजूनही संरक्षण करितां येणें शक्य आहे असें माझा प्रसिद्ध कायदेपंडित भाऊ म्हणत होता," असे उद्गार माझ्या वडील जावेनें मला ऐकूं येतील अशा रीतीनें काढले. माझ्या आजेसासूला मात्र या प्रकाराबद्दल कांहीं वाटलें नाहीं. त्या उलट रागावून मला म्हणत, "कांग तुम्ही त्याला एकसारखा त्रास देतां ! इस्टेटीचें काय होईल हीचना तुमची भीति ? माझ्या हयातींत ही जमीनदारी कोर्टाच्या ताब्यांत कितीदांतरी गेलेली आहे. पुरुष काय स्त्रियांसारखे असतात? ते जन्मतःच उधळे असतात. पैसा मन मानेल तसा कसा खर्च करावयाचा एवढेंच

त्यांना समजतें. मुली, या सर्व उधळपट्टीबरोबर तो आपल्य स्वतःची खराबी करून घेत नाहीं हें तूं आपलें भाग्य समज.'

माझ्या पतींच्या दानधर्माची यादी बरीच लांबलचक होती एखादा संचा अगर भात भरडण्याचें यंत्र अथवा असेंच कांहं तरी शोधून काढणाऱ्या मनुष्याला अगदीं प्रथमपासून त्याच्या प्रयत्नांना अपयशाचें कटु फळ येईपर्यंत माझे पति मदत करीत. परंतु " स्वदेशी " कार्याच्या नांवावर संदीपबाबू माझ्या पतींना लुबाडीत याचा मला सर्वांत जास्त संताप येत त्यांना एखादें वर्तमानपत्र काढावयाचें असलें, प्रचारासा दौऱ्यावर निघावयाचें असलें, अथवा डॉक्टरच्या सल्ल्याप्रमाणें हवापालट करण्यास जावयाचें असलें तर माझे पति त्यांना बिनतक्रार पैसे पुरवीत. याशिवाय नेहमींच्या जेवणाखाणाच्या खर्चासाठीं संदीपबाबूंना एक नियमित रक्कम मिळे ती निराळीच. या बाबतींत सर्वांत आश्चर्याची गोष्ट ही कीं, माझ्या पतींची आणि संदीपबाबूंचीं मतें मुळींच जुळत नसत.

स्वदेशीचें वारें माझ्या रक्तांत भिनल्याबरोबर मीं माझ्या पतींना म्हटलें, " माझे सर्व विलायती कपडे मला जाळून टाकले पाहिजेत. "

" कां बरें ? जाळावयाचे कां म्हणून ? " माझ्या पतींनी म्हटलें, " जोंपर्यंत तुला ते वापरावयाचे नसतील तोंपर्यंत ते वापरूं नकोस ह्मणजे झालें. "

" जोंपर्यंत मला वापरावयाचे नसतील तोंपर्यंत ! ख या जन्मींतरी—"

"बरें बरें! कांहीं हरकत नाहीं. अगदीं मरेपर्यंत फळ्ळूं वापरूं नकोस. पण हा जाळपोळीचा धंदा कशाला?"

"माझ्या निश्चयाच्या आड तुम्ही कां बरें येतां?"

"मला तुला सांगावयाचें आहे तें हें:—कांहीं तरी प्रत्यक्ष कार्य करण्याचा प्रयत्न तूं कां करीत नाहींस? या असल्या विघातक मनःक्षोभांत तूं आपल्या सामर्थ्याचा दशांश हिस्सा सुद्धां खर्च करतां कामा नये."

"असल्या मनःक्षोभानेंच मनुष्याच्या आंगांत कांहीं तरी प्रत्यक्ष कार्य करण्याची शक्ति येईल."

"तर मग असेंच कां म्हणत नाहींस कीं, घराला आग लावल्याखेरीज त्यांत प्रकाश करतांच येणें शक्य नाहीं म्हणून!"

यानंतर आणखी एक गोष्ट करावयाची होती. मिस् गिल्बी जेव्हां प्रथम आमच्याकडे आली त्यावेळीं आमच्या घरांत पुष्कळ गडबड झाली; परंतु कांहीं दिवसांच्या सहवासानें ती बंद झाली. आतां त्याच गोष्टीला विशेष महत्त्व प्राप्त झालें. मिस् गिल्बी युरोपियन आहे कीं हिंदी आहे हा विचार माझ्या मनांत आजपर्यंत क्षणभर देखील आला नव्हता; परंतु आतां तो येऊं लागला. मीं माझ्या पतींना म्हटलें, "मिस् गिल्बीला आपण काढून टाकलें पाहिजे." त्यांनीं कांहींच उत्तर दिलें नाहीं.

त्यांनीं मिस् गिल्बीला काढून टाकलें नाहीं. परंतु एक दिवस मला कोणींसें सांगितलें कीं, मिस् गिल्बी चर्चमधून परत येत असतां तिचा एका तरुण मनुष्यानें अपमान केला. त्याच

त्यांन मनुष्याला आमचा आश्रय होता. लगेच त्याला माझ्या स्वामींनीं घरांतून घालवून लाविलें. हें त्यांचें कृत्य आमच्या घरांत अगदीं कोणालाही आवडलें नाहीं. मला सुद्धां नाहीं. परंतु मिस् गिल्बी आपण होऊनच आम्हांला सोडून गेली. माझा निरोप घेतेवेळीं तिचे डोळ्यांतून अश्रू आले. परंतु माझ्या वृत्तींत मुळींच गहिंवर उत्पन्न झाला नाहीं. त्या बिचाऱ्या तरुणाची अशी दुर्दशा करावयास हीच कारणीभूत झाली होती—किती सुंदर मुलगा होता तो! स्वदेशीच्या उत्साहांत तो दररोजचें स्नान आणि भोजन सुद्धां विसरत असे.

माझ्या पतींनीं आपल्या गाडींतून तिला स्वतः स्टेशनावर पोंचविलें. हें त्यांचें कृत्य मर्यादेबाहेर जात आहे असें मला वाटलें; परंतु या गोष्टीच्या अतिशयोक्तिपूर्ण वर्णनामुळें लोकांत कुजबूज सुरू होऊन ती जेव्हां वृत्तपत्रांतून आली, तेव्हां मला वाटलें कीं, भली झाली. माझ्या पतींच्या वागणुकीविषयीं मला कित्येकदां काळजी वाटे; तथापि आजपर्यंत मला त्याबद्दल लाज वाटण्याचा प्रसंग आला नव्हता. परंतु यावेळच्या त्यांच्या या कृत्याबद्दल मात्र मला मान खालीं घालावी लागे. बिचाऱ्या नरेन्द्रानें मिस् गिल्बीचा काय अपमान केला होता आणि काय नाहीं हें कांहीं मला नक्की माहीत नव्हतें, आणि तें कळण्याविषयीं मला मोठीशी उत्सुकताही नव्हती— परंतु या अशा वेळीं असल्या गोष्टीच्या चांगलेवाईटपणाविषयीं चर्चा करावयाची काय? इंग्लिश बाईला तुच्छ लेखण्यास ज्या आवेशानें नरेन्द्र प्रवृत्त झाला त्या आवेशावर पाणी ओतण्यास

मी कधींही तयार झालें नसतें. ही एवढी साधी गोष्ट कळूं नये हें माझ्या पतींच्या कमकुवतपणाचें चिन्ह आहे असें मला राहून राहून वाटे. आणि म्हणूनच माझ्या पतींच्या या कृत्याविषयीं मला लाज वाटे.

आणि असें असूनही माझ्या पतींचा स्वदेशीशीं कांहीं संबंध नव्हता अगर ते स्वदेशीच्या कार्याच्या विरुद्ध होते असें मुळींच नाहीं. परंतु 'वंदे मातरम्'चें वेड पूर्णपणें मान्य करण्याची त्यांची तयारी नव्हती. ते नेहमीं म्हणत, "मी देशाची सेवा करावयास उत्सुक आहें. परंतु त्याची खुशामत करणें म्हणजे त्याला बिघडविणें आहे."

२

याच सुमारास संदीपबाबू आपल्या अनुयायांसह आमच्या येथें स्वदेशीचा प्रचार करण्यासाठीं येऊन ठेपले होते. आमच्या देवालयांतील सभामंडपांत एक सभा व्हावयाची आहे. आम्ही स्त्रिया तेथेंच एका बाजूला पडद्याच्या आंत बसलेल्या आहों. 'वंदे मातरम्'च्या विजयी आरोळ्या जवळ जवळ येत आहेत व त्या ऐकून रोमरोमीं मी हदरून जात आहें. अशा वेळीं, पावसाच्या पहिल्या उमाळ्याबरोबर नदीच्या शुष्क पात्रांत ज्याप्रमाणें गाळानें लाल झालेलें पाणी शिरतें, त्याप्रमाणें अनवाणी चालणाऱ्या, संन्याशाचा पोषाख केलेल्या व बहिष्कारतत्त्वानें तळपणाऱ्या तरुणांचा ओघ एकदम चौकांत शिरतो. सर्व जागा

अफाट गर्दीनें फुलून गेलेली आहे, व त्या गर्दीतून संदीपबाबूंना उचलून दहाबारा मुलांनीं खांद्यावर तोलून धरलेल्या एका मोठ्या खुर्चीवर बसवितात. वंदे मातरम्! वंदे मातरम्! वंदे मातरम्! जणूं काय आकाश फाटून त्याचे सहस्रशः तुकडे होऊन पडतात कीं काय असें वाटूं लागलें.

पूर्वी मीं संदीपबाबूंचें छायाचित्र पाहिलें होतें. त्यांच्या चेहऱ्यांत मला कांहीं तरी थोडें कसेंसेंच दिसे. संदीपबाबू कुरूप होते असें मुळींच नव्हे, उलट त्यांचा चेहरा फार उमदा व सुंदर होता. परंतु इतका जरी त्यांचा चेहरा तेजस्वी होता तरी त्याच्या घटनेंत कशाची तरी दुष्ट व हिणकस भेसळ झालेली आहे असें मला सहजच, कांहीं विशेष स्पष्ट कारण नसतां वाटे. त्यांच्या डोळ्यांतलें तेज कांहीं खरें नाहीं असा आपला मला कशावरूनसा भास होई. आणि म्हणूनच त्यांच्या सगळ्या मागण्यांना माझे पति बिनतक्रार मान्यता देत हें मला आवडत नसे. मला इतक्या मोठ्या खर्चाबद्दल कांहीं वाटत असे असें नाहीं—परंतु मित्रानें मित्राला असें फसवावें? कारण त्यांची वागणूक कांहीं एखाद्या साधूप्रमाणें नव्हती तर केवळ नटवेबाजीची होती. शरीरसुखावरील त्यांचें प्रेम जणूं काय—आज माझ्या मनांत असे कितीतरी विचार येतात; पण जाऊं दे.

त्या दिवशीं सायंकाळीं जेव्हां संदीपबाबू बोलूं लागले आणि खेंचून जमलेल्या लोकांचीं हृदयें त्यांचें भाषण ऐकून जेव्हां डोलूं लागलीं, लाटांप्रमाणें खालीं वर होऊं लागलीं व आतां तीं फुटून बाहेर येतात कीं काय असें वाटूं लागलें तेव्हां

संदीपबाबूंमध्यें कांहीं विलक्षण फरक झालासें मला वाटलें. हळूहळू अस्ताचलाकडे जाणारा सूर्य सभामंडपाच्या कौलघराच्या पातळीच्या खालीं गेल्यावर त्याच्या उन्हाच्या तिरपेनें जेव्हां एकदम संदीपबाबूंचें शरीर प्रकाशित झालें तेव्हां तर विशेषत: मर्त्य स्त्रीपुरुषांकडे पाठविण्यासाठीं देवांनीं त्यांना आपले दूत निवडले आहेत कीं काय असे ते भासूं लागले. आरंभापासून अखेरपर्यंत त्यांचें व्याख्यान म्हणजे तुफानी गर्जनांनीं भरलेलें होतें. ते ज्या भरंवशानें आश्वासनें देत त्या भरंवशाला सीमाच नव्हती. मी अविचारानें बुरखा बाजूला सारून त्यांच्यावर नजर लावून बसलें; हें झालें तरी कसें हें कांहीं मला स्मरत नाहीं. परंतु त्या जमावांत मी काय करतें आहें इकडे कोणी लक्ष देत नव्हतें. एकदां मात्र त्यांनीं अपशकुनी मृगशीर्ष नक्षत्राप्रमाणें असणाऱ्या आपल्या डोळ्यांनीं मजकडे चटकन विजेप्रमाणें विस्फारून पाहिलें; हें मीं पाहिलें, परंतु त्यावेळीं मी स्वत:ला अगदीं पूर्णपणें विसरून गेलें होतें. आतां मी राजघराण्यांतील स्त्री राहिलें नव्हतें. तर आतां मी आपणाला सर्व बंगाली स्त्रियांची प्रतिनिधि समजत होतें. आकाशानें आपला प्रकाश त्यांच्यावर पाडला होता; त्या अर्थी त्यांनीं आमच्या निरोपाचें उटणें स्वीकारलेंच पाहिजे. नाहींतर त्यांचें प्रवासास निघणें शुभ होणार नाहीं. असे विचार माझ्या मनांत आले.

त्या दिवशीं संध्याकाळीं मी घरीं परत आलें तेव्हां माझें अंत:करण एक प्रकारच्या नवीन अभिमानानें आणि आनंदानें

उद्दीपित झालें होतें. माझ्या अंतरंगांत अफाट तुफान उसळून माझें मन आपली पूर्वीची जागा सोडून अगदीं दुसरीकडे गेलें होतें. प्राचीन काळच्या ग्रीक कुमारिकांप्रमाणें 'आपल्या वीराला धनुष्याच्या दोरीसाठीं स्वतःचे केंस—इतके सुंदर आणि लांबसडक असूनही—द्यावे असें माझ्या मनांत येऊं लागलें. माझ्या बाहेरच्या दागिन्यांचा माझ्या अंतरंगांतील भावनांशीं यत्किंचित जरी संबंध असता तरी माझी सरी ठुशी, माझे गोट तोडे, माझ्या सोन्याच्या बांगड्या, यांचीं बंधनें तुटून स्वर्गांतून होणाऱ्या पुष्पवृष्टीप्रमाणें त्यांचा तेथें जमलेल्या मंडळीवर वर्षाव झाला असता. कांहीं तरी स्वार्थत्यागाचें काम केल्याखेरीज आपल्या उद्दीपित भावनांचा गोंधळ सहन होणें अशक्य आहे असें मला वाटूं लागलें.

मी आल्यावर कांहीं वेळानें माझे पति घरीं आले; तेव्हां, माझ्या कानांत अद्याप घुमत असलेल्या त्या विजयी रणगीताच्या सुरामध्यें बिघाड आणण्यासारखें कांहीं तरी आतां हे बोलतील; अथवा भाषणांत नेहमीं प्रमाण व आटपशीरपणा असावा या आपल्या तत्त्वानुरूप त्यादिवशींच्या दुपारच्या भाषणासंबंधीं आपली नापसंती व्यक्त करतील; आणि मग माझ्या हातून त्यांचा उघड निषेध होऊन अपमान होईल असें वाटून मी भीतीनें कांपत होतें.

परंतु ते एक शब्दही बोलले नाहींत. पण मला हेंही आवडलें नाहीं. "संदीपनें मला आज नीट शुद्धीवर आणलें; आजपर्यंत मी कसा चुकत होतों हें मला आतां चांगलें समजून

आलें" असें त्यांनीं म्हणावयास पाहिजे होतें. मला आपलें वाटे कीं, त्यांनीं तिरस्कारानें मूकवृत्ति धारण केली आहे आणि उत्साहयुक्त व्हावयाचें नाहीं असा जणूं काय निश्चयच केला आहे.

शेवटीं मीं विचारलें, "संदीपबाबू आपल्याकडे किती दिवस राहणार आहेत?"

"उद्यां सकाळीं तो लवकरच रंगपूरला जाण्यासाठीं निघणार आहे" असें त्यांनीं उत्तर दिलें.

"उद्यां अगदीं त्यांना गेलेंच पाहिजे का?"

"होय. उद्यां त्याचें तेथें व्याख्यान व्हावयाचें आगाऊच ठरलें आहे."

मीं थोडा वेळ शांत राहून पुन्हां विचारलें, "त्यांना अगदीं थांबतां नाहींच का येणार? उद्यांचा दिवस?"

"जवळ जवळ तें अशक्यच—पण कां बरें?"

"त्यांना जेवावयाला बोलावून स्वतः स्वयंपाक करून वाढावें असें माझ्या मनांत आहे."

माझ्या पतींना आश्चर्य वाटलें. आपले खास मित्र जेवावयाला आले असतां त्या ठिकाणीं हजर राहण्याविषयीं त्यांनीं मला कित्येकदां सांगितलें होतें. परंतु आजपर्यंत मीं एकदां सुद्धां त्यांना रुकार दिला नव्हता. कांहीं न बोलतां त्यांनीं मजकडे एकसारखी टक लावली. त्यांच्या त्या पाहण्याचा मला अर्थच कळेना. एकदम मला अगदीं लाजल्यासारखें झालें. "छे! छे!" मी एकदम उद्गारलें, "तसें कांहीं करूं नये."

त्यावर ते म्हणाले, " कां ? काय हरकत आहे ? मी स्वतः त्याला बोलावणें करतों. कसेंतरी करून शक्य तर तो उद्यांचा दिवस राहीलच. "

आणि त्यांचें राहणें अगदीं शक्य आहे असें दिसून आलें.

मी अगदीं सगळें खरें खरें सांगतें. अतुल्य असें सौंदर्य मला न दिल्याबद्दल मीं त्या दिवशीं विधात्याला दोष दिला. एखाद्याचें मन आकर्षून घेण्याकरितां कांहीं मला सौंदर्य नको होतें, तर सौंदर्य ही एक शक्ति आहे म्हणून. या महत्त्वाच्या काळांत आपलें दैवत स्त्रियांमध्यें सांठविलेलें आहे हें देशांतील पुरुषांनीं ओळखलें पाहिजे. परंतु बाहेरचें सौंदर्य नसलें तर पुरुषांच्या डोळ्यांना आंतील देवता कांहीं दिसत नाहींत. मातृभूमीची शक्ति माझ्यामध्यें मूर्तिमंत असलेली, संदीपबाबूंना दिसेल काय ? कीं मला ते एक सामान्य स्त्री, आपल्या मित्राच्या घराची स्वामिनी, असेंच केवळ समजतील ? असे विचार माझ्या मनांत त्यावेळीं येत होते.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं मीं माझ्या लांबसडक केसांना सुवासिक तेल लावलें आणि त्यांचा सईलसर अंबाडा बांधून त्यावर चटकदार अशी एक वेणीच्या विणकरीची तांबडी फीत गुंडाळली. भोजन १२ वाजतां व्हावयाचें होतें; तेव्हां न्हाल्यानंतर केंस वाळून नेहमींप्रमाणें वेणी घालण्यास मला वेळ नव्हता. मी एक मद्रासी जरीकांठी लुगडें नेसलें. माझ्या मलमलीच्या आंखूडहाती पोलक्याचे कांठही जरीचेच होते. आज मीं आपला पोशाख थोडा भिडस्तपणानें केलेला आहे;

याच्यापेक्षां साधा पोशाख करतांच येणें शक्य नाहीं असें मला वाटलें. परंतु माझी जाऊ माझ्या आंगावरून सहज जात असतां मजजवळ स्तब्ध उभी राहिली व मला पायांपासून डोक्यापर्यंत नीट निरखून तिनें थोडें स्मित केलें.

" बाई, तुम्हांला हंसावयाला काय झालें ? " मीं विचारलें.

" तुमच्या पोशाखाचें मला कौतुक वाटत आहे. "

मला हें ऐकून कसेंसेंच वाटलें आणि मीं विचारलें, " एवढें कौतुक वाटण्याजोगें माझ्या पोशाखांत काय आहे ? "

" धाकटया राणीसाहेब, वाईट कांहीं नाहीं; वाईट कांहीं नाहीं " असें चटकन मला उत्तर देऊन पुन्हां एकदां कुटिल स्मित करून त्या पुढें म्हणाल्या, " पण माझ्या मनांत आपलें असें आलें कीं, याच्या जोडीला तुमचें तें तेवढें उघड्या मानेचें इंग्रजी तऱ्हेचें पोलकें असतें म्हणजे फार शोभा आली असती." त्या खोलींतून गेल्या त्यावेळीं त्यांच्या तोंडावर आणि डोळ्यांतच नव्हे केवळ नव्हे तर सर्व शरीरभर, दाबलेल्या हास्याच्या लहरी उसळत होत्या.

मला अगदीं फार राग आला आणि तो सर्व पोशाख फेकून देऊन नेहमींचीं वस्त्रें नेसावीं असें वाटलें. परंतु या माझ्या अंतःकरणांतील ऊर्मीप्रमाणें मी कां वागूं शकलें नाहीं हें कांहीं मला सांगतां येत नाहीं. मी आपल्याशींच म्हणालें, " स्त्रिया या समाजाचीं भूषणें आहेत. कसातरी पोशाख करून मी जर संदीपबाबूंपुढें आलें तर पतींना राग येईल. "

[illegible]पेक्षा असा बेत होता कीं, ते दोघे जेवावयास बसले म्हणजे

मग तेथें जावयाचें. पहिल्यानेंच वाटणारा थोडासा भिडस्तपणा वाढण्याकडे लक्ष देण्याचें मिष करून घालवितां येईल असें मला वाटलें. परंतु स्वयंपाक कांहीं वेळेवर झाला नाहीं आणि बारा तर वाजून गेले होते. इतक्यांत पाहुण्यांची ओळख करून घेण्यासाठीं म्हणून मला माझ्या पतींकडून बोलावणें आलें.

संदीपबाबूंच्या तोंडाकडे पाहण्याची मला अतोनात लाज वाटत होती. परंतु कसाबसा धीर आणून मीं एकदांचें म्हटलें, "जेवणाला उशीर होत आहे याबद्दल मला फार वाईट वाटतें."

संदीपबाबू धीटपणें पुढें येऊन अगदीं माझ्या शेजारीं बसले आणि म्हणाले, "रोज मी नानाप्रकारच्या पदार्थांचें भोजन करतों; परंतु अन्नपूर्णादेवी नेहमीं पडद्याच्या आड असते. आज देवीच पुढें आली आहे. तेव्हां भोजन थोडेंसें लांबलें तर काय हरकत आहे?" सार्वजनिक रीतीनें बोलतांना त्यांच्या ठायीं जो आवेश दिसे तोच आवेश त्यांच्या खाजगी वर्तनांत दिसून आला. दिक्कत हा शब्द त्यांना माहीत सुद्धां नसावा. कोणीही न सांगतां आपली योग्य जागा कशी पटकावावी हें त्यांना चांगलें अनुभवानें अवगत असावें असें दिसलें. दुसऱ्याशीं स्नेह करण्याचा आपला हक्क ते इतक्या निश्चयानें व निर्धास्तपणानें बजावीत कीं, त्यासंबंधीं कांकूं करणाराचाच दोष असावा असें वाटावें.

मला भीति वाटत होती कीं, संदीपबाबू मला मूर्ख, लाजे-वाळी एक गांवढळ, जुन्या चालीरीतीची स्त्री समजतात कीं काय;

पण ते मोहित अथवा चकित होतील अशीं चमकदार व हजरजबाबी बोलणीं मला कांहीं केल्या बोलतांच येईनात. माझी त्यांच्यापुढें या प्रकारची वागणूक व्हावयाला असें मला झालें होतें तरी काय, याबद्दल मी संतापानें व आश्चर्यानें विचार करूं लागलें.

जेवण झाल्याबरोबर मी पळ काढण्याच्या बेतांत होतें. इतक्यांत अगदीं धीटपणानें संदीपबाबू आडवे होऊन म्हणतात, "मी अधाशी आहें असें तुम्हीं समजतां कामा नये. स्वयंपाक चांगला झाला होता म्हणून नव्हे तर बोलावणें तुमचें होतें म्हणून मीं एवढा ताव मारला. आतां जर तुम्ही निसटून जाल तर तुम्ही आपल्या पाहुण्याशीं नीट वागलां असें होणार नाहीं." त्यांच्या या भाषणांत निर्भयपणा होता; नाहींतर मीं तें चमत्कारिकच मानलें असतें; शिवाय कसेंही झालें तरी ते माझ्या पतींचे कट्टे स्नेही होते व त्या दृष्टीनें मी त्यांची बहीणच होतें.

संदीपबाबूंना तोडीस तोड उत्तर देण्याच्या हेतूनें मी आपल्या लाजाळूपणाशीं झगडत असतां माझे पति माझ्या मदतीला आले आणि म्हणाले, "तूं आपलें जेवण वगैरे आटोपून पुन्हां इकडे आलीस तर नाहीं कां चालणार ?"

"परंतु येथून निघून जाण्यापूर्वीं तुम्हीं आम्हांला वचन देऊन गेलें पाहिजे." संदीपबाबू म्हणाले.

थोडें स्मित करून मीं म्हटलें, "मी खचित येईन."

पण संदीपबाबू पुन्हां म्हणाले, "माझा तुमच्यावर विश्वास

कां बसत नाहीं तो पहा. निखिलला लग्न झाल्याला आज नऊ वर्षे झालीं. व या नऊही वर्षे तुम्हीं मला झुकांडी दिलेली आहे. असेंच आणखी एक नऊ वर्षे तुम्हीं केलेंत म्हणजे माझी तुमची गांठच पडावयास नको."

मीं त्यांच्याचप्रमाणें हळू आवाजांत म्हटलें, "कां बरें? त्यानंतर सुद्धां आपली भेट होऊं शकेल."

"माझ्या पत्रिकेंत असें आहे कीं, मी लवकर मरणार. माझ्या पूर्वींच्या वंशजांपैकीं कोणीही तिशीच्यावर जगला नाहीं. मला हल्लीं २७ वें वर्ष आहे."

आपला बाण पुरा लागू पडणार हें ते ओळखून होते. पुन्हां जेव्हां मी हळू बोलूं लागलें तेव्हां माझ्या आवाजांत काळजीचें मिश्रण झालेलें असलें पाहिजे. मी म्हणालें, "सर्व देशाचे आशीर्वाद तुमच्या ग्रहांचा अशुभ योग खात्रीनें नष्ट करतील."

"परंतु देशाचे हे आशीर्वाद त्यांतील देवतांच्या तोंडून बाहेर पडले पाहिजेत. आणि म्हणूनच तुम्ही परत येण्याविषयीं मला एवढी उत्कंठा आहे; हेतु हा कीं, माझ्या अशुभ ग्रहांना मारक अशा या आशीर्वादांना आजपासूनच सुरवात व्हावी." आपलें म्हणणें पुढें मांडण्याची संदीपबाबूंची पद्धति इतकी धडाडीची होती कीं, दुसऱ्या कोणीं हेच शब्द उच्चारले असते तर त्याचा मीं निषेध केला असता; पण तसें करण्याला संदीपबाबू आपल्या भाषणांत संधीच देत नसत. ते पुढें हंसून म्हणाले, "तुमच्या या पतींना तुम्ही परत येईपर्यंत मी ओलीस ठेवणार आहें."

मी बाहेर आलें तों ग्यालरींत उभी राहून माझी धाकटी जाऊ किलकिल्या खिडकींतून पहात होती. मीं अगदीं हळू विचारलें, "तुम्ही येथें ?" "तुमचा संकेत पहात होतें," तिनें उत्तर दिलें.

मी जेव्हां परत गेलें तेव्हां संदीपबाबूंनीं आपल्याला थोडें वाईट वाटलेंसें दाखविलें. ते प्रेमळपणें म्हणाले, "आमच्यामुळें तुमच्या भुकेंत थोडा व्यत्यय आला असेल नाहीं ?" खरेंच. मी अगदीं घाईघाईनें जेवलें त्या दिवशीं. आणि वेळेवरून तें स्पष्टच होत होतें. परंतु एवढ्यासाठीं कोणी पळें मोजीत बसलें असेल अशी मला कल्पनाही नव्हती. मला लाज वाटली; आणि संदीपबाबूंच्या तें लक्षांत आल्यावर तर माझ्या लज्जेला पारावारच उरला नाहीं. ते म्हणाले, "आपल्या मृगीप्रमाणें पळून जाण्याच्या ऊर्मीवर तुम्हीं जय मिळविलात म्हणून कांहीं मी तुमचें अभिनंदन करीत नाहीं. परंतु तुम्हीं आपल्या शब्दाप्रमाणें वागून मात्र मजवर उपकार केले आहेत."

मला कांहीं नीटसें उत्तर सुचेना; त्यामुळें लाज वाटून व कसेंसेंच होऊन मी कोचाच्या एका टोंकाला बसलें. संदीपबाबूंच्यापुढें बंगालमधील स्त्रियांच्या प्रेरित शक्तीची मूर्ति म्हणून येण्याची माझी इच्छा पार कोठच्या कोठेंच राहिली होती.

संदीपबाबूंनीं माझ्या पतींशीं मुद्दाम वादविवाद उकरून काढला. वादविवादामध्यें माझ्या पतींची बुद्धि विकास पावून तेजाचे फवारे टाकूं लागते हें त्यांना माहीत होतें. त्या

दिवसापासून मला असें दिसून आलें कीं, मी हजर असलें म्हणजे त्यांच्याशीं विवाद करण्याची संधि संदीपबाबू मुळींच फुकट जाऊं देत नसत.

'वंदे मातरम्'च्या तत्त्वाविषयीं माझ्या पतींचे काय विचार आहेत हें संदीपबाबूंना माहीत होतें. म्हणून त्यांना खिजविण्यासाठीं ते म्हणाले, "निखिल, देशहिताच्या कामांत कल्पनावारूला वावरण्याला स्थान आहे हें तुला कबूल नाहीं काय ?"

"त्याला अनुरूप असें स्थान आहे हें मी कबूल करतों. परंतु सर्वच स्थान त्यानें व्यापावें हें मात्र मला पसंत नाहीं. माझ्या देशाची खरीखुरी स्थिति कळावी अशी माझी इच्छा आहे, व दुसऱ्यांनींही तसेंच करावें असें मी इच्छितों. माझें मत असें असल्याकारणानें चित्ताकर्षक वाक्यसमूहांचा उपयोग करण्याची मला लाज वाटते."

"ज्याला तूं आकर्षक वाक्यसमूह समजतोस त्यालाच मी सत्य हें नांव देतों. माझा देश हाच माझा ईश्वर यावर माझा खराखुरा भरंवसा आहे. मी मानुषतेचा भक्त आहें. ईश्वर मनुष्य आणि देश या दोहोंतही व्यक्त होतो."

"तूं म्हणतोस अशीच जर तुझी खरी श्रद्धा असेल तर मनुष्यामनुष्यामध्यें अथवा देशादेशामध्यें तुला कांहींच फरक वाटणार नाहीं."

"खरें आहे. परंतु माझी शक्ति मर्यादित आहे. आणि माझी मानुषतेची भक्ति माझ्या देशाच्या भक्तीमध्यें आहे."

" तूं कोणावरही भक्ति केलीस तरी माझी हरकत नाही. परंतु इतर देशांत ईश्वर सारखाच व्यक्त असतांना त्यांचा द्वेष करून तूं ईश्वराची भक्ति करतोस या तुझ्या भक्तिमार्गाला काय म्हणावें ? "

" द्वेष हा मुद्दा भक्तीचें एक साधन आहे. पाशुपत अस्त्र मिळविण्याचे वेळीं अर्जुनानें भिल्लरूपी महादेवाची प्रीति त्याच्याशीं युद्ध करून संपादन केली. आपली ईश्वराबरोबर लढण्याची जर तयारी असेल, तर अंतीं ईश्वर आपल्या बाजूचा झाल्याखेरीज राहावयाचा नाहीं. "

" पण असें जर असेल तर देशाची जे सेवा करीत आहेत, आणि देशाचें जे अनहित करीत आहेत, ते दोन्ही प्रकारचे लोक ईश्वराचे सारखेच भक्त होत. तेव्हां मग देशभक्ति शिकविण्याचा त्रास घेण्याची काय जरूर ? "

" परंतु स्वतःच्या देशाची गोष्ट मात्र निराळी आहे. त्याच्या ठिकाणीं खास भक्तीची जरूरी असते. "

" मग आणखी थोडें पुढें कां जाऊं नये ? या अगर त्या देशाच्या सेवेच्या आधीं प्रत्येकानें आपल्या सदसद्विवेकबुद्धीची भक्ति करावी, अशी अपेक्षा आपलें अंतःकरण करीत नाहीं काय ?"

" हें पहा निखिल, हा तुझा सगळा तर्कशास्त्राचा कोरडा काथ्याकूट आहे. केवळ भावना म्हणून कांहीं आहे हें तुझ्या कधींच ध्यानांत येत नाहीं. "

" संदीप, खरें सांगावयाचें तर देशाचें दैविकपण आणि आपल्या देशांतील रहिवासी यांना तूं एकच समजण्याचा गोंधळ

दिवालूं लागलास म्हणजे माझ्या उच्च भावना दुखविल्या जातात आणि माझ्याच्यानें तुला तसें मुकाट्यानें करूं देववत नाहीं. माझ्या देशाचा गौरव करण्याच्या मिषानें माझ्या देशबांधवांना कोणी अवनत, हिणकस करूं पाहील तर तें मला सहन होणार नाहीं."

मी आंतून अगदीं जळत होतें. आतां मात्र माझ्याच्यानें मुकाट्यानें राहवेना. "जर्मनी, रशिया, फ्रान्स अगर इंग्लंड यांपैकीं कोणत्याही देशाचा इतिहास घ्या. तो आपआपल्या देशासाठीं केलेल्या पापांचा वृत्तांतच नाहीं काय?" असें मीं विचारलें.

"त्यांना त्यांच्या पापाचें फळ भोगावें लागलें आहे. हल्लींही ते भोगीत आहेत; कारण त्यांचा इतिहास कांहीं अद्याप संपला नाहीं."

"परंतु कांहींही असलें तरी"—संदीपबाबू मध्येंच पडून म्हणाले—"आम्हीं त्यांचें अनुकरण कां करूं नये? पाप जरी करावें लागलें तरी प्रथम आपण आपल्या देशाचे खिसे आपल्या उद्योगाच्या फळांनीं भरून घेऊं या; मग पापाचें प्रक्षालन करण्यासाठीं आपल्याला पुष्कळ मोकळा वेळ मिळेल. परंतु ते आपल्या पापाचा जाब देत आहेत असें तूं म्हणतोस तर तो जाब ते कोठें बरें देत आहेत?"

"रोमचें राज्य जेव्हां आपल्या पापाचा जाब देत होतें तेव्हां त्याबद्दल कोणाला वार्ताही नव्हती. त्यावेळीं त्याचा अमर्याद उत्कर्षच चाललेला आहे असें दिसत होतें. या लुटारू

लोकांच्या भव्य सुधारणेवर पापक्षालनाला सुरवात करण्याची पाळी केव्हां येते, हें तिच्या बाह्य स्वरूपावरून कोणासही सांगतां येत नाहीं; परंतु असत्य, लांडीलबाडी, विश्वासघात, गुप्त हेरणी, खोट्या इभ्रतीसाठीं सत्य आणि न्याय यांचा त्याग इत्यादि गोष्टींनीं युक्त असें त्यांचें राजकारणी पाप त्यांना एकसारखें नीचावस्थेप्रत नेत आहे हें तुला दिसत नाहीं काय ?"

संदीपबाबू अगदीं एकदम मजकडे वळून म्हणाले, "आपलें काय म्हणणें आहे ?"

मीं उत्तर दिलें, "बारीक सारीक भेदांसंबंधीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. ढोबळ मानानें मला काय वाटतें हें मी तुम्हांला सांगतें; मी केवळ मानुष आहें. मला लोभ आहे; व चांगल्या गोष्टी–वस्तु–माझ्या देशाला मिळाव्या असें मला वाटतें. जरूर तर त्या मी दुसऱ्याकडून घेईन अथवा चोरूनही घेईन. माझ्या आंगीं क्रोध आहे; माझ्या देशासाठीं मला अवश्य राग येईल. त्याच्या अपमानाचा सूड घेण्यासाठीं मी आघात करीन व प्राणहत्याही करीन. मी निर्वाणाला–मोक्षाला–जाऊन पोंचलेली नाहीं. मी माझ्या देशाची अंधपणें भक्ति करणार, माझ्या देशावर मूर्तत्वाचा आरोप करून त्याला मी माता, दुर्गा असें म्हणणार; व त्याच्यासाठीं यज्ञाहुतींनीं जमीन तांबडी करणार. मी मानुष आहें; अतिमानुष अगर दैवी नाहीं."

संदीपबाबू चटकन उडी मारून उभे राहून हात वर करून "शाबास, शाबास" असें ओरडूं लागले. इतक्यांत कांहीं तरी चुकलेंसें वाटून त्यांनीं चटकन 'वंदे मातरम्'चा घोष करण्यास

सुरवात केली.

ते म्हणाले; "पहा निखिल, पहा सत्य कसें स्त्रियांच्या हृदयांत अगदीं खोलवर जाऊन भिडतें आणि त्यांच्या जीवनाशीं कसें अगदीं एकजीव होऊन जातें तें. तें सत्य किती रंगहीन, रुचिहीन, जीवहीन आहे—तें बुद्धीला किती पटण्याजोगें आहे! स्त्रीच कोणत्याही रीतीनें न भितां निधडेपणानें संपूर्ण नाश करूं शकते; म्हणूनच तिचें पाप भीतिप्रद परंतु अतिशय सुंदर दिसतें. परंतु पुरुष सदसद्विवेकबुद्धीच्या फटकाऱ्यानें मागेंपुढें पहात असल्यामुळें त्याच्या पापांत एक प्रकारचा हिडिसपणा येतो. निखिल, माझें तर असें मत आहे कीं, आमच्या स्त्रियाच फक्त आमच्या देशाचा उद्धार करतील. या वेळा नीतीचीं सालें काढीत बसण्याच्या नाहींत. आपण मागें पाय अगदीं न घेतां, बुद्धिवादाकडे लक्ष न देतां पशुवृत्ति स्वीकारली पाहिजे. आपल्याला पापच केलें पाहिजे. आपल्या पापाचें स्वागत करण्याकरितां आणि त्याच्यावर चकाकी चढविण्याकरितां आपण आपल्या स्त्रियांजवळ रक्तचंदनाचें उटणें देऊन ठेवलें पाहिजे."

असें म्हणून संदीपबाबूंनीं जोरानें जमिनीवर दोनदां पाय आपटला; व त्यायोगें पुष्कळ दिवसांची चटईखालीं सांचलेली धूळ खूप वर उडाली. मी आनंदभरानें त्यांच्याकडे पहात राहिलें.

त्यांनीं आवाज चढवून आपलें बोलणें पुढें चालू ठेवलें. ते म्हणाले, "जो अग्नि घर जाळून टाकतो तोच बाहेर लख्ख

उजेड पाडतो, हें मला स्पष्ट दिसत नाहीं काय ? तुम्ही त्या अग्नीची देवता आहां असें मला स्पष्ट दिसत आहे. सार्वत्रिक नाशाची अमोघ शक्ति आम्हांला द्या. आमच्या अपराधांना सौंदर्य व तेज आणा. "

त्यांच्या भाषणांतील ही शेवटची विज्ञप्ति त्यांनीं कोणाला केली होती हें कांहीं उघड समजत नव्हतें. जिची ते 'वंदे मातरम्'च्या घोषांत भक्ति करीत असत तिला ती विनंति असेल; कदाचित ती विनंति त्यांच्या देशांतील स्त्रीवर्गाला असेल; किंवा आपल्याच समोर असणाऱ्या स्त्रीला त्या स्त्रीवर्गाची प्रतिनिधि म्हणून असेल. संदीपबाबू आणखी असेच बोलत राहिले असते. परंतु माझे पति एकाएकीं आपल्या जागेवरून उठले आणि त्यांच्या खांद्यावर हळूच हात ठेवून चूप रहा अशी खूण करून म्हणाले, "संदीप, चंद्रनाथबाबू आलेले आहेत."

मी उठून उभी राहिलें; मागें वळून पाहतें तों गंभीर, शांत व प्रौढ असा एक वृद्ध गृहस्थ आंत यावें कीं न यावें असा विचार करीत दारांतच उभा राहिलेला माझ्या दृष्टीस पडला. माझे पति मजजवळ येऊन कानांत म्हणाले, " माझे सद्गुरु म्हणून ज्यांच्याविषयीं मी तुजजवळ नेहमीं बोलतों ते हेच. त्यांना वंदन कर." मीं खालीं वांकून त्यांच्या पायाची धूळ घेतली. त्यांनीं मला आशीर्वाद दिला, "माझे लहानगे आई, ईश्वर तुझें नेहमीं रक्षण करो."

त्यावेळीं अशा एखाद्या आशीर्वादाची मला खरोखरच अत्यंत जरूरी होती !

## प्रकरण दुसरें

### निखिलची आत्मकथा

एके दिवशीं मीं विमलला जनान्यांतील जीवित सोडून बाहेर येण्यास सांगितलें. विमलचें सत्यतम व संपूर्ण स्वरूप जाणण्याची जर आपली खरोखरीची इच्छा असेल तर तिच्यावर कोणत्याही तऱ्हेचा अधिकार ठेवण्याचा प्रयत्न आपण करतां कामा नये, ही एक गोष्ट त्यावेळीं माझ्या ध्यानांत यावयास पाहिजे होती ती आली नाहीं. ती माझ्या दृष्टिपथांतून कशी सुटली याचें मला राहून राहून आश्चर्य वाटत आहे. शाश्वत मुरून राहिलेल्या नवरेपणाच्या भावनेचा हा प्रभाव असावा काय ? मला मोठा गर्व होता कीं, सत्याच्या कितीही उघड्या बाजू मला दिसल्या तरी त्या मी सहन करीन. आतां माझ्या परीक्षेची वेळ आली आहे.

आजपर्यंत माझ्यासंबंधींची एक गोष्ट विमलला मुळींच कळून आलेली नाहीं. कोठेंही झालें, तरी सत्ता गाजविणें हें मी कमकुवतपणाचें निदर्शक समजतों. परंतु पुरुष म्हटला

कीं तो जुलमी असला पाहिजे अशी तिची अपेक्षा असते. भीतिप्रद गोष्टींची तिला मोठी आवड आहे.

माझ्या देशबांधवांच्या राजकीय धांगडधिंग्यांत मी मुळींच मिसळत नाहीं यामुळें मी लोकांना कितीही अप्रिय झालों तरी देशाची सेवा कोणत्याही प्रकारच्या धुंदीच्या भरांत हातीं घ्यावयाची नाहीं असा माझा पुरापूर निश्चय आहे. मी एखाद्या पदवीसाठीं धडपडतों आहें अथवा मी पोलिसला भितों असें सर्वजण समजतात. परंतु माझे हात कांहींतरी विशेष प्रकारच्या ठकबाजींत गुंतलेले असल्यामुळें मी वरवर भोळ्यासारखा वागतों असें पोलिसचें मत आहे. तरी पण अविश्वास आणि अपमान यांनीं युक्त अशा या मार्गालाच मी आपला चिकटून आहें. माझें खरेंखुरें मत मात्र असें आहे कीं, ज्यांच्या उत्साहाला आपला देश खरोखर कशा प्रकारचा आहे या संबंधींचें ज्ञान मिळवावें असें वाटत नाहीं, किंवा मनुष्यावर तो केवळ मनुष्य आहे एवढ्याचसाठीं जे प्रेम करूं शकत नाहींत, ज्यांना नुसतें एकसारखें ओरडावें लागतें व आपला क्षोभ कायम राखण्यासाठीं ज्यांना देशाला देव समजावें लागतें, त्यांचें आपल्या देशापेक्षां क्षोभावरच जास्त प्रेम असतें.

आज कित्येक दिवस माझ्या ध्यानांत आलें आहे कीं, संदीपबाबूमध्यें एक प्रकारची हलकी स्वार्थपरायणता भरलेली आहे. आपल्या ऐहिक सुखविषयक भावनांमुळें तो आपल्या स्वतःच्या धर्माविषयीं आभासात्मक कल्पना मनांत वावरूं देतो व त्यामुळें त्याच्या राष्ट्रभक्तींत एक प्रकारच्या जुलमीपणाची झांक

मारते. त्याची बुद्धि तीक्ष्ण आहे; परंतु त्याचा स्वभाव अशिष्ट आहे; यामुळें आपल्या स्वार्थपर लालसांना मोठमोठीं कानाला गोड लागणारीं नांवें देऊन तो गौरवतो. भूक लागली असतां ती शमविण्यासाठीं खाणें जितकें जरूर आहे तितकेंच द्वेषानें मनाला मिळणारें स्वस्त समाधान त्याच्या स्वभावाला आवश्यक आहे. मागें विमलनें त्याच्या पैशाच्या हांवेसंबंधीं मला कित्येकदां तरी सुचविलेलें आहे. मला हें कळत नसे असें नाहीं. परंतु संदीपबरोबर पैशासाठीं घासाघीस करण्यास माझें मन तयार होईना. माझ्यापासून तो आपला फायदा करून घेण्यासाठीं झटत आहे ही कल्पना सुद्धां मनांत आली असतां मला लाज वाटे. परंतु आतां आज मात्र संदीपची देशप्रीति म्हणजे फक्त त्याच्या हीन आत्मप्रीतीचेंच एक स्वरूप आहे हें विमलला समजावून देणें कठीण होईल. विमलच्या मनांत संदीपविषयीं एक प्रकारचें वीरप्रेम रुजलें आहे, त्यामुळें तर ही गोष्ट काढण्यास मी जास्त कचरतों आहें. कारण अगदीं नकळत अशी मात्सर्याची एखादी छटा माझ्या मनांत उत्पन्न होऊन मजकडून कदाचित अतिशयोक्ति व्हावयाची. माझ्या मनांत उडालेल्या खळबळीमुळें मला कदाचित संदीपचें चित्र वेडेंवांकडें दिसत नसेल कशावरून! परंतु भावना मनांत वाढूं देण्यापेक्षां त्या बोलून दाखविणेंच मला बरें वाटतें.

माझा सद्गुरूंना मी आज तीस वर्षें ओळखतों. निंदा, टवाळकी, संकट, प्रत्यक्ष मृत्यु, यांपैकीं त्यांना कशाचीच भीति वाटत नाहीं. मी तर आमच्या या असल्या परंपरेनें युक्त अशा

वंशांत जन्मलेला होतों; तेव्हां आमच्या संसारामध्यें त्यांचें जीवित, त्यांची सत्यनिष्ठा, त्यांची शांत वृत्ति व साधुत्वनिदर्शक शरीरयष्टि इत्यादिकांची छाया जर न पडती तर मी सुमार्गावर राहिलोंच नसतों. त्यांच्याच कृपेनें मला सत्य आणि हित यांची खरी जाणीव प्राप्त झाली आहे.

त्याच दिवशीं माझे सद्गुरु मजकडे येऊन म्हणाले, "संदीपला येथें आणखी थांबविण्याची जरूर आहे काय?" सर्व अशुभ चिन्हांसंबंधींची त्यांची ग्रहणशक्ति इतकी तीव्र होती कीं, त्यांना सर्व कांहीं चटकन समजे. त्यांच्या हृदयांत खळबळ कधींच उडत नसे; परंतु त्या दिवशीं मात्र संकटाची कृष्ण छाया त्यांना दिसली असावी. त्यांचें मजवर किती अकृत्रिम प्रेम आहे हें मला ठाऊक नाहीं काय?

चहा पिण्याचे वेळेस मी संदीपला म्हणालों, "रंगपूरला जाण्याचा तुझा केव्हांचा बेत आहे? मला तेथील लोकांकडून पत्रें आलीं आहेत. मीं तुला थांबवून घेतला आहे हा माझा आप्पलपोटेपणा होय असा त्यांचा आरोप आहे. ते याबद्दल पत्रांत तक्रार करतात."

विमल चहा ओतीत होती. तिचें तोंड एकदम उतरलें. तिनें एक प्रश्नपूर्ण असा दृष्टिक्षेप संदीपकडे केला.

संदीप म्हणाला, "इकडून तिकडे तिकडून इकडे, असें हिंडून व्याख्यानें देत फिरण्यांत शक्तीचा भयंकर अपव्यय आहे असें मला अलीकडे वाटूं लागलें आहे. एकाच मध्यापासून जर मी कार्य करीन तर मला वाटतें हल्लींपेक्षां मी जास्त टिकाऊ

फळ मिळवूं शकेन." एवढें बोलून विमलकडे पाहून तो म्हणाला, "तुम्हांला सुद्धां असेंच नाहीं का वाटत?"

विमल उत्तर देण्यास कांकूं करून म्हणाली, "हिंडून अथवा एकाच मध्यापासून काम करणें हे दोन्हीही मार्ग मला चांगले दिसतात. त्यांपैकीं ज्यांत तुम्हांला जास्त समाधान वाटेल तो तुम्हीं पतकरावा."

"तर मग माझ्या मनांत काय आहे हें मी सांगतोंच. जेथून मला हिताची प्रेरणा मिळेल असें स्थान मला अद्याप सांपडलें नव्हतें. म्हणूनच मी लोकांचा उत्साह वाढवीत हिंडत असें व त्यापासून स्वत:ला शक्तीचा सांठा प्राप्त करून घेत असें. आज तुम्हीं मला माझ्या देशाचा संदेश सांगितला आहे. तुमच्या इतका आवेशाग्नि मीं आजपर्यंत कोणत्याही पुरुषांत पाहिला नाहीं. नका; कृपा करून लाजूं नका. विनय, नम्रता, संकोच या कमकुवतपणाच्या साधारण वृत्तींपासून तुम्ही फार वर आहां. आमच्या मधाच्या पोळ्यांतील तुम्ही राणी आहां आणि आम्ही मजूर आहों. तुमच्या मदतीसाठीं आम्ही प्रयत्न करूं. तुम्हीच आमचा मध्य आहां; तुम्हीच आमची प्रेरणाशक्ति आहां."

विमल लज्जेनें व अभिमानानें गोरीमोरी झाली आणि चहा ओततांना तिचा हात कांपूं लागला.

दुसऱ्या दिवशीं सद्गुरु मजकडे येऊन म्हणाले, "हवा पालटण्यासाठीं तुम्ही दोघेंजण दार्जीलिंगला कां जात नाहीं? तूं कांहीं ठीक दिसत नाहींस. पुरेशी झोंप मिळत नाहीं काय?"

संध्याकाळीं विमलजवळ मीं, तिची पर्वतावरून फेरफटका करून येण्याची इच्छा आहे कीं काय याची चौकशी केली. हिमालय पाहण्याची तिला फार उत्कंठा होती हें मला ठाऊक होतें. परंतु ती म्हणाली, "नको. आपण पुन्हां——."

मला वाटतें देशकार्यांत अडथळा आला असता.

## प्रकरण तिसरें

### संदीपची आत्मकथा

जे अगदीं अंतःकरणापासून आशा बाळगतात आणि मनापासून उपभोग घेतात, ज्यांना आढेवेढे अथवा नीतिविषयक शंकाकुशंका मुळीं शिवत सुद्धां नाहींत, तेच खरे भवितव्यतेच्या नाकांतील बाल होत. सृष्टि आपण होऊन त्यांना आपल्याजवळील जें जें म्हणून अतितर सौंदर्यानें, भपक्यानें व महार्हतेनें युक्त तें तें देते. जें जें म्हणून मिळविण्याजोगें आहे तें मिळविण्यासाठीं ते ओढे पोहून जातात, भिंतीवरून उड्या टाकतात आणि लाथेनें दरवाजेही फोडतात. अशा तऱ्हेनें वस्तु मिळविण्यांत मनाला एक प्रकारचा आनंद आहे; अशा धडपडीनें ती वस्तु मिळविलेली असल्यामुळें तिला एक प्रकारची किंमत येते. सृष्टि सुद्धां शरण येते. पण, कोणाला? तिला लुबाडणाराला. ही बलात्कारयुक्त इच्छा आणि लुटालूट पाहून तिला आनंद होतो. आणि म्हणून ती आपली पसंतीची माळ एखाद्या साधूच्या

किडकिडीत व रुक्ष अशा गळ्यांत कधींच घालीत नाहीं.

लाज ? छे ! छे ! मजजवळ लाज मुळींच नाहीं. मला ज्याबद्दल इच्छा होते तें मी मागतों व तें घेण्यापूर्वी प्रत्येक वेळेस मीं मागणी केलेली असतेच असेंही नाहीं. आपल्या संकोचवृत्तीमुळें ज्यांना हव्या त्या वस्तु मिळत नाहींत ते आपल्या हालांचे कारणांना विनय, नम्रता हीं नांवें देऊन गौरवतात. आपण ज्या जगांत जन्मलों आहों तें जग वस्तुसत्य आहे. मला जें हवें असतें तें अगदीं अवश्य आणि त्याच्या उच्चतम स्वरूपांत हवें असतें. तें पकडावें, तें खावें, त्याच्यावर लोळावें अशी माझी इच्छा असते. भुकेनें जे फिकट आणि कृश झालेले आहेत अशा नीतिवाद्यांचा दुबळा निषेध माझ्या कर्णरंध्रांपर्यंत पोंचत नाहीं. हा कठिण संसार ज्यांना, जवळही कांहीं नाहीं व आशाही पूर्ण झाल्या नाहींत अशा स्थितींत सोडावा लागतो, ते जन्माला तरी कशाला आले ?

मी कोणतीही गोष्ट लपवून ठेवणार नाहीं; तसें करणें भित्रेपणाचें आहे. परंतु जरूर पडेल तेव्हां जर मला तसें करतां आलें नाहीं तर तेंही भित्रेपणाचें व कमकुवतपणाचेंच होईल. तुम्ही लोभी आहां; आणि म्हणून तुमच्याजवळ जें कांहीं आहे त्याचें संरक्षण करण्यासाठीं तुम्ही भिंती बांधतां. मी लोभी आहें; आणि म्हणून मला जें हवें तें मिळविण्यासाठीं त्या फोडून मी आंत जातों. तुम्ही यंत्रांचा उपयोग करतां; मी युक्तीचा उपयोग करतों. संसारांत या वास्तविक गोष्टी आहेत; त्यांच्यावर सर्व राज्यें, साम्राज्यें आणि मनुष्यजातीची

साहसाचीं कृत्यें अवलंबून असतात. आपल्या स्वर्गीय निवासांतून खालीं मृत्युलोकीं येऊन आपल्यास पवित्र व उपदेशपर गोष्टी सांगूं पाहणाऱ्या अवतारांविषयीं खरें बोलावयाचें तर त्यांचे शब्द वास्तविक नसतात. आणि म्हणूनच त्यांच्या संदेशाला कमकुवत लोकांच्या एकांतिक हृदयांत वाव मिळतो. ज्यांना जगावर सत्ता गाजवावयाची आहे त्यांना त्या संदेशाचा उपयोग नाहीं; कारण तो वास्तविक सत्य नसल्याकारणानें मनुष्याची शक्ति ढिली करतो. ज्यांना हें कळण्याइतकी बुद्धि असून ज्यांनीं आपणांला हें कळलें असें कबूल केलें त्यांनाच यश मिळालेलें आहे; परंतु जे बिचारे दुर्दैवी लोक सृष्टि आणि अवतार, वास्तविक आणि अवास्तविक या दोहोंनाही प्रसन्न ठेवण्यास झटले, त्यांना प्रगति अगर परागति कांहींच करतां न येऊन ते नाश पावले.

कांहीं लोक जन्मतात ते मरणाच्या निश्चयानें घेरलेले असेच जन्मतात असें दिसतें. कदाचित मृत्यूची छाया सदोदित पडलेल्या जीवितांत सूर्यास्ताप्रमाणें एक प्रकारचें सौंदर्य दिसून त्यानें हे लोक भाळत असावे. अशा प्रकारच्या जीविताला जीवित हें नांव देणें योग्य असेल तर आमचा निखिल तशा प्रकारचें जीवित कंठीत असतो. या मुद्द्यावर त्याच्याशीं पुष्कळ दिवसांपूर्वी माझा वाद झाला होता. तो म्हणाला, "मिळविण्यासारख्या वस्तु आपल्याला सत्तेविना मिळावयाच्या नाहींत हें मी कबूल करतों. परंतु तुम्ही सत्ता कशाला म्हणतां? ज्याप्रमाणें जितकें तुम्ही बाहेर काढाल तितकेंच तुमचें भांडवल, त्याप्रमाणें

तुम्ही जितकी टाकून द्याल तितकीन
" तर मग त्यागाच्या गौरवासा
आहेस तर ? " मी उद्गारलों.

त्यानें उत्तर दिलें; " कोंबडीचें
आवरणाच्या बाहेर येण्यासाठीं उतावं
अंड्यावरील आवरण अगदीं वास्तवि
हवा आणि प्रकाश यांच्यासाठीं त्य
कदाचित ही अदलाबदल तुझ्या दृष्टी

निखिल एकदां उपमा आणि उत्
करूं लागला कीं, 'तूं केवळ शब्दां
कांहीं जास्त नाहीं; वस्तुसत्य हें
अगदीं अशक्य आहे. कांहीं हर
आपल्या उत्प्रेक्षांच्या आनंदांत मग्न अ
मांसभक्षक आहोंत; आम्हांला नखें अ
पाठलाग करतों, पकडापकड क
सकाळच्या [illegible]रीं पुढें घातलेलें गव
आमचें समाधान होत नाहीं. कांहीं
उत्प्रेक्षावाल्यांना आम्ही आमच्या उपज
नाहीं. मग त्यासाठीं आम्ही चो
आम्हीं जगलें हें पाहिजेच !

लोक म्हणतील, मी एक नवीनच
आहें; आणि त्यांना असें वाटण्याचें
सिद्धांतानुरूप ते वागत असूनही

त.  यामुळें माझा सिद्धांत मूर्तिमंत
ा उमगत नाहीं.  खरें बोलावयाचें
ाहे कीं, माझी वरील कल्पना मुळींच
ारांत तिचा उपयोग झालेला आहे.
ाकाशयानांत बसून मेघावृत प्रदेशांत
ांत आणि ज्या वास्तविक सृष्टींतील
ज्या हृदयांवर माझा मार्ग स्वामित्व
दिसून आलेलें नाहीं काय ?
र्तन, माझी गति, माझें भाषण,
घूच्या अडखळणाऱ्या, विचाररूपी
ा इच्छेसारखी नव्हे ; तर अनिवार्य
ा पाहिजे, मी घेणार, मीं घेतलेंच
रणारी, अशा स्त्रियांना दिसते.
ंतरक्त आहे; ती आपल्याखेरीज
नाहीं आणि म्हणूनच ती नेहमीं
ा अंतःकरणपूर्वक व. नें. आणि
मरूं याची मुळींच पर्वा न करतां
र वाहून जाण्यास त्यांनीं कित्येकदां
स्त्रियांना जिंकणाऱ्या या बलिष्ट
जिंकण्याचें सामर्थ्य आहे.
जास्त चांगलें असें ज्यांना वाटतें
ूमीवरून उचलून आकाशांत नेऊन
इच्छेचें कारंजें किती उंच उडतें

व किती काळपर्यंत उडत राहतें एवढें आतां दिसावयाचें आहे. परंतु एवढें मात्र खास कीं, स्त्रिया मात्र असल्या या कल्पनावारूबरोबर धावणारांसाठीं कांहीं उत्पन्न झालेल्या नाहींत.

# प्रकरण चवथें

## विमलेची आत्मकथा

माझ्या संभावितपणाच्या वृत्तीचें त्यावेळीं काय झालें होतें राम जाणे. मात्र गोष्ट अशी झाली कीं, मला स्वत:विषयीं विचार करण्यास फुरसदच नव्हती; माझे सर्व दिवस एक प्रकारच्या वादळाबरोबर वाहून जात होते. मी पण त्या वादळांतच सांपडलेली होतें. त्याच्या सोसाटयापुढें विनय अथवा संकोच यांना थाराच मिळेनासा झाला होता.

एके दिवशीं माझी धाकटी जाऊ माझ्या पतींना माझ्या देखत म्हणाली, " अहाहा ! भावोजी, आजपर्यंत आमच्या घराण्यांतील स्त्रियांना अश्रू ढाळावे लागत असत. आतां पुरुषांची पाळी ! ती त्यांची चुकणार नाहीं याबद्दल आतां आम्हीं डोळ्यांत तेल घालून राहिलें पाहिजे. कां धाकटया राणीसाहेब, तुम्हीं युद्धाची कडेकोट तयारी केलीच आहे. आतां आपले तीक्ष्ण बाण थेट त्यांच्या हृदयावर टाका म्हणजे झालें. " असें म्हणून तिनें आपल्या तीक्ष्ण डोळ्यांनीं माझें

पायांपासून डोक्यापर्यंत सूक्ष्म निरीक्षण केलें.

माझी स्नानसामग्री, माझीं वस्त्रें, माझें वर्तन व माझें भाषण या सर्वांमध्यें ज्या कांहीं नवीन छटांचा उदय झाला होता, त्यांपैकीं एकही छटा माझ्या जावेच्या तीक्ष्ण नजरेंतून सुटली नव्हती. माझ्या वस्त्रप्रावरणांत त्यावेळीं फरक पडला होता हें सांगण्याची आज मला लाज वाटते; परंतु त्यावेळीं मला लाज मुळींच वाटत नसे. याचें कारण त्यावेळीं मला अगदीं अज्ञात अशी एक शक्ति माझ्या हृदयांत संचार करीत होती. मी जास्त भपक्याचीं वस्त्रें नेसत असें; कबूल आहे. परंतु तसें एखाद्या विशिष्ट हेतूनें नव्हे तर केवळ आपोआप चालणाऱ्या यंत्राप्रमाणें मी करीत असें. माझा या बाबतींतला कोणता प्रयत्न संदीपबाबूंना आवडत असे हें मला माहीत असे, परंतु त्याला कांहीं मोठेंसें ज्ञान लागत नव्हतें. कारण संदीपबाबू त्याविषयीं सर्वांदेखत खुशाल चर्चा करीत असत.

एके दिवशीं ते माझ्या पतींना म्हणाले, " निखिल, तुला माहीत नाहीं; आमची मधुमोहळ्यांतील राणी जेव्हां जरीकांठी लुगडें नेसून दृष्टीचा मार्ग चुकल्यामुळें अंतराळाकडे गंभीरपणें डोळे लावून बसली असतांना प्रथम मीं पाहिली, तेव्हां ती एखाद्या काळ्याकुट्ट अंधाराच्या टोंकाला बसली असून कांहींतरी अज्ञात असें दृष्टीस पडावें म्हणून युगानुयुगें टक लावून राहिली आहे कीं काय, असें मला वाटलें—आणि माझ्या आंगावर एकाएकीं रोमांच उभे राहिले. तिचा जरीकांठ म्हणजे बाहेर येऊन तिच्या भोंवतीं वेष्टण घालून बसलेला तिच्या

अंतरंगांतील प्रदीप्त अग्नीच आहे असा मला भास झाला. हीच ज्योति—दृश्य अंगारक—आम्हांला हवी आहे ती! हें पहा मधुराणी, पुन्हां एकदां तुम्हीं अग्निवेष्टित असा पोषाख केला पाहिजे."

स्त्रष्टयानें मला पुनर्जन्म दिला कीं काय असें मला वाटलें. आजपर्यंत माझ्या बाबतींत केलेला निष्काळजीपणा त्याला भरून काढावयाचा होता काय? जी साधी होती ती सुंदर झाली. आजपर्यंत जिच्याकडे कोणी लक्ष देत नव्हतें ती आज आपल्याला सर्व बंगालचें वैभव समजत होती. कारण संदीपबाबू कांहीं यःकश्चित व्यक्ति नव्हते; त्यांच्या ठिकाणीं देशांतील लाखों मनांचा संगम झालेला होता. त्यांनीं मला मोहळ्यांतील मधुराणी म्हटलें तेव्हां सर्व देशकार्यकर्त्यांनी त्याला एकसुरांत अनुमतीच दिल्यासारखें झालें. त्यानंतर माझ्या शांत अशा मोठ्या जावेचा तिरस्कार व धाकटीच्या मोठमोठ्यानें चालणाऱ्या चेष्टा यांचें मला कांहींच वाटेनासें झालें. जगाबरोबरच्या माझ्या सर्व संबंधांत पूर्ण बदल झाला.

सर्व राष्ट्राला माझी कशी जरूरी आहे हें संदीपबाबूंनी स्पष्ट करून सांगितलें. आपल्या आंगीं सर्व प्रकारचें सामर्थ्य आहे अशी त्यावेळीं माझी भावना झालेली असल्यामुळें त्यांच्या म्हणण्यावर विश्वास ठेवण्यास मला बिलकूल हरकत वाटली नाहीं. आजपर्यंत अज्ञात असलेली कांहींतरी असामान्य दैवी शक्ति माझ्या शरीरांत संचारित झालीसें मला वाटलें. माझ्या आंगांत संचरलेल्या आवेगांत कांहीं अवगुण आहेत की

काय या संबंधींची शंका येण्यास त्यावेळीं मला फुरसत अथवा जागाच नव्हती. ती शक्ति माझी असून माझी नव्हती—ती माझ्या बाहेर होती. ती सर्व देशाची होती. समुद्राच्या भरतीनें आलेला तो पूर होता. त्यांत खेडेगांवांतील लहान ओढ्याचा कांहीं संबंध नव्हता.

देशकार्यांतील अगदीं बारीक सारीक बाबतींत सुद्धां संदीपबाबू माझा सल्ला घेत असत. पहिल्यापहिल्यांदा मला अगदीं कसेंसेंच वाटून मी मान खालीं घालीत असें; परंतु हें सर्व कांहीं लौकरच पार नाहींसें होऊन गेलें. मीं कोणतीही गोष्ट सुचविली कीं, संदीपबाबू चकित होत. आनंदाच्या उकळ्या फुटल्या असें दाखवून ते म्हणत, "पुरुषांना फक्त विचार करतां येतो, परंतु तुम्हां बायकांजवळ मात्र विचार केल्याखेरीज सर्व कांहीं समजण्याची अजब शक्ति आहे खरी! स्त्री तयार करतांना स्रष्टा मोठ्या खुषींत असला पाहिजे. पुरुषाचे अवयव घडवितांना मात्र त्याला मोठ्या नाखुषीनें घण मारावे लागले असले पाहिजेत—."

देशांत जें जें कांहीं म्हणून चाललें आहे त्याच्या मुळाशीं संदीपबाबू व संदीपबाबूंच्या मागें एका साध्या स्त्रीचें व्यवहारज्ञान, अशी माझी हळूहळू खात्री झाली. या मोठ्या जबाबदारीच्या गौरवानें माझें शरीर फुलून गेलें.

आमच्या खलबतांत माझ्या पतींना मुळींच थारा नव्हता. एखाद्या धाकट्या भावावर आपण जसें प्रेम करतों परंतु मोठ्या विचाराच्या कामांत त्याचा सल्ला घेत नाहीं, त्याप्रमाणें

संदीपबाबू त्यांच्याशीं वागत. असल्या महत्त्वाच्या बाबतींतल्या त्यांच्या पोराइतपत अज्ञानाविषयीं, त्यांच्या चमत्कारिक वेड्यावांकड्या कल्पना आणि मतें यांविषयीं, ते कित्येकदा जपून बोलत व अशा चमत्कारिक स्वभावामुळें आपल्याला निखिल जास्त आवडतो असें म्हणत. त्यांच्यावरील या प्रेमामुळेंच तर देशकार्याचें ओझें संदीपबाबू त्यांच्यावर टाकीत नसत.

अत्यंत जिव्हाळ्याचे संबंध कपटानें तोडले जात असतां त्यावेळीं काय कापाकाप चालली आहे हें कळूं नये म्हणून देण्यासाठीं दुःखशामक औषधें सृष्टीच्या वैद्यकीय भांडारांत पुष्कळ आहेत. त्या औषधांचा अंमल नाहींसा झाल्यावर मनुष्य जागा होतो तों त्याला ते सर्व संबंध आगाऊच तुटलेले आढळून येतात.

माझ्या जीवितांतील अत्यंत गाढतम अशा बंधनांवर जेव्हां सुरी चालू होती, तेव्हां अमली वायूच्या धुरानें मी इतकी व्याप्त होऊन गेलें होतें कीं, कसली दुष्ट गोष्ट घडून येत आहे याची मला तिळभरही वार्ता नव्हती.

## प्रकरण पांचवें

### संदीपची आत्मकथा

### १

कोठेंतरी थोडासा घोटाळा झाला आहे खास. कालच मला त्याचा थोडा झटका समजला.

मी निखिलकडे आल्यापासून निखिलची बसण्याची खोली म्हणजे बाहेरच्या दिवाणखान्यांतून आंतल्या दिवाणखान्यांत जातांना विश्रांतीसाठीं बसण्याचीच एक खोली झाली होती. मला तिच्यामध्यें बाहेरून जावयास मिळत असे, आणि विमलला आंतून तेथें येण्यास प्रतिबंध नव्हता. आम्हीं जर थोडी मंद गति स्वीकारली असती, आणि आम्हांला मिळालेल्या या हक्कांचा जरा संयमनपूर्वक उपयोग केला असता, तर कांहीं आमच्याकडे बोटें दाखवून लोक आमच्याविषयीं कुचेष्टा करूं शकले नसते; परंतु आम्ही इतक्या वेगानें पुढें गेलों कीं, आजूबाजूचा विचार आमच्या मनांत ठरेनासाच झाला.

जेव्हां जेव्हां मधुराणी निखिलच्या खोलींत येते तेव्हां मला आपली ती गोष्ट चटकन सहज समजते. बांगड्यांचा नाहींतर दुसरा कसला तरी आवाज माझ्या मदतीला येतो. निदान दार तरी वाजवीपेक्षां जास्त जोरानें लावलें जातें. पुस्तकांच्या कपाटाचें दार थोडेंसें मस्तीला तरी येतें आणि त्याचा करकर आवाज होतो. मी जेव्हां खोलींत येतों तेव्हां मधुराणी दरवाजाकडे पाठ करून फळीवरून पुस्तकें शोधून काढण्यांत अगदीं गर्क झालेली असते! आणि त्या तिच्या कठीण कार्यांत जेव्हां मी तिला मदत करण्याची इच्छा प्रदर्शित करतों, तेव्हां ती चमकते आणि नको म्हणते; आणि मग आम्ही सहजच इतर विषयांकडे वळतों.

परवां एके दिवशीं—अशुभ अशा गुरुवारच्या तिसऱ्या प्रहरीं—मला अशाच कांहीं आवाजांनीं जागृत केलें आणि मी मोठ्या लगबगीनें व ताठ्यानें माझ्या खोलींतून बाहेर पडलों. मार्गामध्यें एक मनुष्य उभा होता. मीं त्याच्याकडे जणूं काय पाहिलेंच नाहीं अशा झोंकांत चाललों; परंतु दरवाज्याशीं पोंचल्याबरोबर तो माझ्या मार्गाआड येऊन म्हणाला. "महाराज! इकडे जावयाचें नाहीं."

"इकडे जावयाचें नाहीं! काय म्हणून?"

"राणी आई तिकडे बसल्या आहेत."

"असें का? तर मग फारच चांगलें! तुझ्या राणी आईना सांग कीं, संदीपबाबू तुम्हांला भेटूं इच्छितात."

"तें होणार नाहीं. तें हुकमाविरुद्ध आहे."

मला फार राग आला. मीं चढत्या आवाजांत म्हटलें, "जा, आणि मी आलों आहें म्हणून सांग. माझा असा तुला हुकूम आहे."

माझ्या एकंदर झोंकाकडे पाहून तो बिचारा थोडा मागें सरून घाबरून उभा राहिला. इतक्यांत मी दाराच्या अगदीं जवळ गेलों; मी आतां अगदीं दाराला हात घालणार इतक्यांत घाबरून मजजवळ येऊन माझा हात धरून तो म्हणाला, "छे ! छे ! साहेब, तुम्हीं असें करूं नये."

काय? मला एखाद्या नोकरड्यानें स्पर्श करावा ! मीं आपला हात चटकन हिसकावून घेतला, आणि त्याला एक चांगलीच थप्पड दिली. त्याच वेळेस मधुराणी बाहेर आली व तो मनुष्य माझा अपमान करण्याच्या अगदीं बेतांत आलेला आहे हें तिनें पाहिलें.

तिच्या क्रोधाचें चित्र मी कधींही विसरणार नाहीं ! मधुराणी सुस्वरूप आहे हा माझा शोध आहे. आमच्यापैकीं पुष्कळ लोकांना तिच्यांत कांहींच दिसत नाहीं. तिच्या उंच सडसडीत शरीरयष्टीला हे मूर्ख रानटी लोक 'किडकिडीत' म्हणतात; परंतु तिची ही किडकिडीत यष्टीच मला आवडते—तिला मी जीवनाचें वर उडणारें कारंजें म्हणतों. ती काळी आहे, परंतु तो तरवारीच्या पात्याप्रमाणें प्रखर आणि स्फुलिंग बाहेर टाकणारा पोलादी रंग आहे. उंबरठ्यावर उभी राहून "नानकू, चालता हो" असें अधिकारी वाणीनें सांगून त्याला तिनें लांब बोट दाखविलें.

" त्याच्यावर कशाला रागावतां, " मी म्हणालों. " हें माझें कृत्य हुकमाच्या विरुद्ध आहे; वास्तविक पाहतां मींच निघून गेलें पाहिजे. "

मला उत्तर देतांना अजून सुद्धां मधुराणीचा आवाज रागानें कांपत होता. ती म्हणाली, " नाहीं; तुम्हीं जावयाचें नाहीं. आंत या. "

मलाही पण कांहीं विमलनें ही विनंति केलेली नव्हती, नानकूप्रमाणें तो हुकूमच होता ! मी तिच्या मागून आंत गेलों आणि खुर्चीवर बसून टेबलावरील एका पंख्यानें वारा घेऊं लागलों. मधुराणीनें शिसपेन्सिलीनें कागदावर कांहींसें लिहिलें आणि कागद एका नोकराजवळ देऊन, " हा महाराजांकडे घेऊन जा " असें त्यास सांगितलें.

मी म्हणालों, " आपण मला क्षमा करा. रागाच्या सपाट्यांत मला माझें मन आवरतां आलें नाहीं आणि मीं त्या मनुष्याला मारलें ! "

" तुम्हीं त्याला ठीक बक्षीस दिलेंत, " मधुराणी म्हणाली. " परंतु खरें पाहिलें तर त्या बिचाऱ्याचा दोष मुळींच नव्हता. तो काय ! आपल्या हुकमाप्रमाणें वागत होता. "

मी हें बोलत असतांना निखिल आंत आला; मी चटकन आपली जागा सोडून खोलीकडे पाठ करून खिडकींत तोंड घालून उभा राहिलों.

" देवडीवरील नानकूनें संदीपबाबूंचा अपमान केला आहे. " मधुराणी निखिलला म्हणाली.

निखिलला खरोखरच मनापासून इतकें आश्चर्य वाटलें कीं, मीं मागें वळून त्याच्याकडे टक लावली. माझ्या मनांत विचार आला कीं, कोणीही मनुष्य आपल्या बायकोशीं शेवटपर्यंत खोटें बोलूं शकणार नाहीं. आतां, ती स्त्री मात्र योग्य प्रकारची असली पाहिजे यांत संशय नाहीं.

मधुराणी पुढें म्हणाली, " संदीपबाबू इकडे आंत येत होते तेव्हां तो त्यांच्या मार्गामध्यें उद्धटपणानें उभा राहिला. तो म्हणतो मला तसा हुकूम—."

" कोणाचा हुकूम ? " निखिलनें विचारलें.

" तें मला कसें समजावें ! " मधुराणी आवेगानें म्हणाली. अपमानामुळें तिचे डोळे अगदीं भरून आले होते.

निखिलनें नानकूला बोलावून आणून विचारपूस केली. " माझा कांहीं दोष नाहीं, " नानकू जरा ओशाळून म्हणाला. " मला काय ? माझ्या हुकमाप्रमाणें मला वागलेंच पाहिजे होतें. "

" तुला कोणीं हुकूम दिला नानकू ? " निखिलनें विचारलें.

" दुसऱ्या राणी आईनीं. "

कांहीं वेळ आम्ही सर्वजण स्तब्ध होतों. नानकू निघून गेल्यावर मधुराणी म्हणाली, " नानकूला आपण काढून टाकलें पाहिजे. "

निखिल कांहींच बोलला नाहीं. त्याच्या न्यायबुद्धीनें त्याला तसें करूं दिलें नसतें हें मला स्पष्ट दिसत होतें. त्याच्या मनस्तापाला कांहीं सीमा राहिली नाहीं. परंतु या वेळेस

त्याच्यापुढें फार कठीण असा प्रश्न येऊन पडला होता. ती कांहीं आपलें म्हणणें खालीं पडूं देणारी नव्हती. आणि त्या बिचाऱ्याला शिक्षा देऊन तिला तिच्या जावेला खट्टू करावयाचें होतें. तेव्हां निखिल स्तब्ध राहिला हें पाहून तिच्या नेत्रांतून अग्निकण बाहेर पडूं लागले; परंतु आपल्या नवऱ्याच्या कमकुवतपणाविषयीं तिरस्कार कसा व्यक्त करावा हें तिला ठाऊक नव्हतें. निखिल एक शब्द सुद्धां न बोलतां खोलीबाहेर निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं नानकू कोठेंही दिसेनासा झाला. विचारपूस करतां मला असें कळलें कीं, त्याची बदली इस्टेटीच्या दुसऱ्या भागाकडे झालेली असून त्यामुळें त्याच्या पगारांत मात्र कांहीं कमतरता झालेली नव्हती.

या बाबतींत पडद्याआड किती भयंकर वादळ सों सों करीत होतें याची मला थोडीशी चुणूक लागली; परंतु काय म्हणावें !

वरील सगळ्या प्रकाराचा असा परिणाम झाला कीं, मधुराणी आतां मला गप्पा मारण्याकरितां आपल्या खोलींत कांहीं आडपडदा न ठेवतां, गुप्तपणाची युक्ति न करतां आणि आमची भेट सहज झाली असें दाखविण्याचा प्रयत्न न करतां, बोलावूं लागली. अशा रीतीनें आम्ही अंधुक सूचनांपासून दीर्घ व स्पष्ट खुणांपर्यंत आलों; गर्भिताला परिस्फुटता आली. राजांच्या घराण्यांतील सून बाहेरच्या सामान्य मनुष्यापासून इतक्या दूरवर असणाऱ्या तारकामय प्रदेशांत राहते कीं, त्या

बिचाऱ्याला तेथपर्यंत जाण्याला सरळ असा रस्ताही पण नसतो; परंतु सत्याच्या विजयी प्रगतीचा परिणाम काय सांगावा ! त्यानें हलके हलके परंतु चिकाटीनें रूढीचे पडदेच्या पडदे बाजूला सारले. शेवटीं त्यायोगें खुद्द सृष्टी सुद्धां उघडी पडली !

सत्य ? होय, तें सत्यच होय ! स्त्री आणि पुरुष यांचें एकमेकांवरील आकर्षण हें प्रधान वस्तुसत्य आहे. जगांतील रजःकणांपासूनच्या सर्व वस्तु त्याच्या पक्षाला आहेत. आणि तरी सुद्धां शब्दांच्या जाळ्याआड करून मनुष्य तें दृष्टीपासून दूर नेतो व निरनिराळ्या नियमांनीं त्याला जखडून तें कौटुंबिक उपयोगाला येईल अशा रीतीनें त्याला मऊ करतो ! परंतु सत्याच्या हांकेसरशी वास्तविकता जेव्हां जागी होते आणि शब्दावडंबराच्या जाळ्याला बाजूस सारून आपलें योग्य स्थान पटकावते, तेव्हां मग श्रद्धा अथवा रूढी कोणी आड येतात काय ? मग किती आक्रोश, किती अवक्षेप आणि किती अधिक्षेप सुरू होतात. पण नुसत्या शब्दानें वादळाशीं युद्ध करणें शक्य आहे काय ? वादळ प्रतिस्पर्ध्याशीं उलट उत्तरें देऊन बोलत बसत नाहीं; तें त्याला उडवून देतें; कारण तें वस्तुसत्य आहे.

हें सत्य हलके हलके उघड होत असून त्याचें दृष्टिसुख मी अनुभवीत आहें. किती लाजाळूपणा, किती थरकांप, किती संकोच ! परंतु हीं जर नसतीं तर वस्तुसत्य खरोखर नीरस आणि बेचव झालें असतें ! आणि त्यासंबंधींच्या वंचना—केवळ दुसऱ्याच्याच नव्हे तर आपल्याही—म्हणजे सत्यावर

त्याला गांवढळ म्हणणाऱ्या त्याच्या शत्रूंनीं फेंकलेलीं शस्त्रेंच नव्हेत काय ?

मला हें सगळें किती स्पष्ट समजून चुकलें आहे ! पडदा वाऱ्यानें हालत आहे, आणि आंत नाटकाच्या शेवटाची तयारी चाललेली मला दिसत आहे. त्या भपकेबाज कुरळ्या केसांच्या वोळक्यांतून हळूच मान वर काढणारी ती बारीकशी तांबडी फीत. गुप्त आणि तीव्र अभिलाषांनीं पूरित अशा वसंतवायूची ती अग्रदूतीच नव्हे काय ? लुगडें यत्किंचित हाललें तरी त्याची मला झुळूक लागून माझें अंतःकरण मुदित होत नाहीं काय ? कंचुकीच्या प्रत्येक हालचालीनें माझ्या अंतःकरणांत आमोद उत्पन्न होत नाहीं काय ? कदाचित आपल्या वस्त्रांचा हा इतका परिणाम होत असेल अशी कल्पना खुद्द तीं वस्त्रें वापरणाराचीही नसेल !

मी उघड उघड जडवादी आहें. शून्यवादरूपी आपल्या तुरुंगांतून निसटून अनावृत वस्तुसत्य—अनावृत जडता—बाहेर उजेडांत आलें म्हणजे मला अत्यानंद होतो. ज्याची मी इच्छा करतों तें अगदीं मजजवळ आपल्या जड स्वरूपांत-अगदीं मला माझ्या मुठींत गच्च धरून ठेवतां येईल अशा स्वरूपांत—असलें पाहिजे. मग मार्गामध्यें आडव्या येणाऱ्या इतर वस्तूंचा पुरापूर चुराडा आणि नाश झाला तरी बेहेत्तर ! तसें होणें हा या वस्तुसत्याच्या—जडतेच्या—साम्राज्यांतील आनंदाचा एक भागच आहे ! त्यानंतर मग चांगलें अथवा वाईट, सुख अथवा दुःख, जीवित अथवा मृत्यु, यांपैकीं कांहींही

प्राप्त होवो, त्याची कांहीं कांहीं किंमत नाहीं !

माझी मधुराणी बिचारी स्वप्नसृष्टींत वावरत आहे. तिचें पाऊल कोठच्या मार्गावर पडत आहे याची तिला जाणीव नाहीं. तिला योग्य वेळेच्या आधीं जागी करणें सुरक्षितपणाचें होणार नाहीं. आपण तिच्या इतकेच त्या बाबतींत अज्ञान आहों असें दाखविणें हेंच माझ्या फायद्याचें होणार आहे. त्या दिवशीं जेवणाच्या वेळेस ती माझ्याकडे चमत्कारिक तऱ्हेनें टक लावून पहात होती; परंतु अशा दृष्टिक्षेपांचा अर्थ काय याची त्या बिचारीला मुळींच कल्पना नव्हती. माझी दृष्टि तिच्या दृष्टीला जाऊन भिडतांच एकदम गोरीमोरी होऊन तिनें तोंड फिरविलें. मी म्हणालों, "तुम्हांला माझ्या भुकेचें नवल वाटतेंसें दिसतें. मी सर्व कांहीं लपवूं शकतों; परंतु मी अधाशी आहें हें लपवूं शकत नाहीं. आणि शिवाय जेथें मी स्वतःच निर्लज्ज बनलों आहें तेथें तुम्ही कशाला माझ्याकरितां लाजतां?"

यामुळें तर तिचा वर्ण अधिकच लाल होऊन ती अडखळत अडखळत म्हणाली, "छे ! छे ! मला फक्त—"

अधाशी पुरुषांकडे स्त्रियांचा आपला थोडा जास्त कल असतोच हें मला माहीत आहे. कारण अशा मनुष्यांवर त्यांना आपली थोडी सत्ता गाजवितां येते. त्यांच्याकडून आजपर्यंत मजवर जो भरपूर अनुग्रह झाला आहे त्यामुळें तर मी जास्तच निर्लज्ज बनलों आहें. या सर्व वस्तु एकूणएक बारीक सारीक तुकड्यासुद्धां पार नाहींशा कशा होत आहेत हें तुम्ही पाहत राहिलां तरी माझी हरकत नाहीं. या सगळ्या

वस्तूंचा आस्वाद मी घेणार आहें.

एके दिवशीं मी एक इंग्रजी पुस्तक वाचीत बसलों होतों. त्यांत स्त्रीपुरुषांच्या एकमेकांच्या आकर्षणाविषयीं अगदीं धीटपणें कोणताही आडपडदा न ठेवतां वास्तविकतेनें विवेचन केलेलें होतें. आमच्या बसण्याच्या खोलींत तें मीं उघडें ठेवलें होतें. दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं मी कशाकरितांसा खोलींत गेलों. तों मधुराणी तें पुस्तक हातांत घेऊन बसलेली मला आढळली. माझी चाहूल लागतांच तिनें तें पुस्तक झटकन खालीं ठेवलें व त्यावर दुसरें एक पुस्तक ठेवलें. तें दुसरें पुस्तक लाँगफेलो नामक इंग्रजी कवीच्या कवितांचा ग्रंथ होता.

मीं बोलण्यास सुरवात केली. मी म्हणालों, "कविता वाचीत असतांना लोकांना आपण सांपडूं नये इतकी त्या बाबतींत स्त्रियांना कसली लाज वाटते कोण जाणे. आम्हां पुरुषांना—वकिलांना, यंत्रशास्त्रज्ञांना, सगळ्यांनाच—लाज वाटली तर शोभेल. आम्हांला काव्य वाचावयाचेंच तर मध्यरात्रीं खोलीला कडी लावून वाचलें पाहिजे. परंतु तुम्हीं स्त्रिया काव्याच्या किती जवळ आहां! स्रष्टा स्वतःच वीणाकाव्य रचणारा आहे; आणि ही दैवी कला जयदेव त्याच्यापासूनच शिकला असला पाहिजे."

मधुराणीनें कांहींच उत्तर दिलें नाहीं. परंतु तिला लाज वाटून थोडें वाईटही वाटलेंसें दिसलें. ती खोलींतून निघून जाणार असा मला तिचा रंग दिसूं लागला. तेव्हां मी निषेधपूर्वक म्हणालों, "छे! छे! वाचा. तुम्ही खुशाल वाचा.

काल येथें एक माझें पुस्तक राहिलें आहे तेवढें मी घेतों आणि आपला रस्ता सुधारतों." असें म्हणून मीं आपलें पुस्तक टेबलावरून उचलून घेतलें आणि पुढें म्हणालों, "सुदैव, कीं, तुम्हीं या पुस्तकाचीं पानें चाळलींबिळलीं नाहींत. नाहींतर तुम्हीं माझें चांगलेंच शासन केलें असतें."

"खरें कीं काय? कां बरें?" मधुराणीनें विचारलें.

"कारण," मी म्हणालों, "त्यांत काव्य नाहीं. त्यांत कांहीं सरळ गोष्टी अगदीं सरळपणें, अतिसूक्ष्म सभ्यता सोडून, लिहिलेल्या आहेत. निखिल हें पुस्तक वाचील तर किती चांगलें होईल!"

कपाळाला थोड्याशा आंठ्या घालून मधुराणी पुटपुटली, "तुम्हांला असें कां बरें वाटतें?"

"तो आमच्यापैकींच एक—पुरुष—आहे. माझें त्याच्याशीं भांडण एवढेंच कीं, तो जगताच्या गूढ स्वरूपांत आनंद मानतो. या त्याच्या वृत्तीमुळें स्वदेशीला तो लॉंगफेलोच्या एखाद्या काव्याप्रमाणें समजतो व त्याच्याप्रमाणेंच प्रत्येक पदांत मात्रांचें प्रमाण कायम राखलें पाहिजे असें म्हणतो, हें तुम्हांला ठाऊक नाहीं काय? आम्ही तर आमच्या गद्यमय सोडग्यांनीं वृत्तांचा नाश करावयाला निघालेले आहों."

"तुमच्या या पुस्तकाचा स्वदेशीशीं काय संबंध?"

"तुम्हीं जर तेवढें वाचलेंत तर तुम्हांला समजेल. इतर बाबतींप्रमाणें स्वदेशींतही निखिल पूर्वकालीन म्हणींप्रमाणें चालूं पाहतो; आणि म्हणूनच प्रत्येक वेळीं मनुष्यस्वभावाशीं

त्याचा झगडा उत्पन्न होतो व मग त्याला तो निंदूं लागतो. त्याला असें समजत नाहीं कीं, मनुष्यस्वभाव हा म्हणी अथवा सांप्रदाय यांच्या आधीं जन्मास आला आहे व त्यांच्या मागें तो जगणार आहे. मला वाटतें ही गोष्ट त्याला कधींच समजणार नाहीं."

थोडा वेळ स्तब्ध राहून मधुराणी गंभीरपणें म्हणाली, "प्रयत्न करून स्वाभाविक मानुषतेपेक्षां उच्च स्थितीस जाणें हाही एक मनुष्यस्वभावाचाच भाग नाहीं काय ?"

मी आपल्याशींच हास्यभरानें म्हणालों, "अहाहा ! राणी, हे शब्द तुझे नाहींत. तूं ते निखिलपासून शिकली आहेस. तूं एक निरोगी सशक्त अशी साधी मानवी मूर्ति आहेस. तुझ्यामध्यें उत्साहपूर्ण, आशापूर्ण, विलासपूर्ण, अशा जीवितांचा अप्रतिहत संचार झालेला आहे. तुझ्या जीवितांतील अणुरेणुमात्र जडतेच्या प्रकाशानें पेटलेला आहे. या लोकांनीं तुझ्या भोंवतीं जें हें शब्दांचें गूढ–रहस्यमय–जाळें टाकलें आहे तें तुला फार वेळ धरून ठेवूं शकेल अशी तुझी कल्पना आहे काय ?"

मग मी उघड म्हणालों, "आज दुर्बलांची बहुसंख्या आहे. हीं असलीं जुनीं कुचकामाचीं मतें एकसारखीं उच्चारून हे लोकांच्या कानांत विष ओतीत आहेत. ज्यांना स्वतःला सृष्टीनें शक्ति दिलेली नाहीं तेच हे लोक दुसऱ्याचा स्वभाव कमकुवत करूं पाहतात."

मधुराणीनें उत्तर दिलें, "आम्ही स्त्रिया असमर्थ आहोंत.

तेव्हां मला वाटतें, दुर्बलांच्या या कटांत आम्हींही सामील झालें पाहिजे."

"स्त्रिया दुर्बल!" मी हंसूं लागलों. "पुरुष तुम्हांला नाजूक, कोमल, हीं विशेषणें देऊन हरभऱ्याच्या झाडावर चढवितात, आणि आपण खरोखरच अशक्त आहों असें तुम्हांला वाटूं लागतें. बाहेर पुरुष आम्ही मोठे शूर आहोंत असा आव घालतात, परंतु अंतरंगीं ते किती दुर्बल असतात हें तुम्ही जाणतांच. स्वतःच्याच धार्मिक वचनांनीं त्यांनीं आपणांला गुलाम करून घेतलें आहे आणि आपल्याला आंतून व बाहेरून बांधून घेण्यासाठीं स्त्रीरूपी साखळदंड त्यांनीं स्वतःच्याच अग्नींत आणि स्वतःच्या ऐरणीवर तयार केले आहेत. स्वतःच उत्पन्न केलेल्या बंधनांना ते आपले उत्तमोत्तम देव समजतात! परंतु स्त्रियांविषयीं म्हणाल तर तुम्हीं तर वस्तुसत्याची अगदीं अंतःकरणापासून इच्छा केली आहे; वस्तुसत्याला—जडतेला—जन्म दिला आहे; वस्तुसत्याचें—जडतेचें—संगोपन केलें आहे."

स्त्रीस्वभावाला अनुसरून मधुराणी लाल झाली; परंतु माझ्या मुद्द्यांना इतक्या सहज हार जाण्याचा तिचा उद्देश नव्हता. "हें जर खरें असतें," आक्षेप घेऊन ती म्हणाली, "तर मग पुरुषांना स्त्रिया आकर्षक दिसल्या नसत्या."

"स्त्रियांना या भीतीची जाणीव असते," मीं उत्तर दिलें. "पुरुष आभासावर प्रेम करतात हें स्त्रियांना पुरापूर माहीत असतें, आणि म्हणून पुरुषांचींच वचनें उसनीं घेऊन त्या

त्यांच्यापुढें पुरेसे आभास उत्पन्न करतात. पुरुष हा पानप्रिय असून निशेवर त्याचें फार प्रेम असतें हें त्यांना ठाऊक असतें, म्हणून त्या स्वतःच त्याच्या ठायीं निशा उत्पन्न करतात. वास्तविक गोष्ट अशी आहे कीं, स्त्रियांना केवळ पुरुषांखेरीज इतर कशासाठींही नाहीं नाहीं तीं ढोंगें करावीं लागणार नाहींत."

"तर मग तुम्ही या निशेचा नाश कां करूं पाहतां?"

"स्वातंत्र्यासाठीं. देश स्वतंत्र व्हावा, मनुष्यामनुष्यांतील संबंध खुले व्हावे अशी माझी इच्छा आहे."

२

झोंपेंत चालणाराला एकदम जागें करणें धोक्याचें आहे याची मला जाणीव होती. परंतु मी स्वभावानें इतका तीव्र आणि चपल आहें कीं, हळू आणि अडखळणारी चाल—गति—माझ्या स्वभावाला मुळींच रुचत नाहीं. त्या दिवशीं मीं वाजवीपेक्षां जास्त धीटपणा केला हें मी जाणतों. त्याप्रमाणेंच असल्या कल्पनांचा पहिला धक्का जरा विशेषच वाटणार हेंही मला ठाऊक आहे. परंतु स्त्रियांशीं धीटपणाचाच जय होतो.

आम्ही अगदीं बोलण्याच्या व भावनेच्या भरांत आलों तों काय! निखिलचे वृद्ध गुरु चंद्रनाथबाबू खोलींत आले! हे गुरु—शाळाशिक्षक—जर या जगांत नसते तर जग अगदींच कांहीं राहण्यास अयोग्य झालें नसतें; परंतु यांच्यामुळें त्याचा

तिटकारा येऊन तें सोडून द्यावेंसें वाटतें. निखिलच्या जातीच लोक जगताला नेहमीं शाळागृहाच्या स्वरूपांतच ठेवूं इच्छितात. त्याचें तें व्यक्तित्व धारण केलेलें शाळागृह त्या दिवशीं तिसऱ्या प्रहरीं अगदीं आयत्या वेळीं आमच्यापुढें प्राप्त झालें. आमच्या हृदयाच्या कोणत्याना कोणत्या तरी कोपऱ्यांत विद्यार्थिवृत्ति जागृत असते आणि मी, खुद्द मी सुद्धां, थोडासा दबकलों. मधुराणीचें तर काय विचारतां! परीक्षा देण्यास अगदीं तयार असलेल्या एखाद्या पहिल्या नंबरच्या मुलीची, पुढें पुढें करून आपल्याला पुष्कळ येत आहे व आपण कांहींही चुकत नाहीं अथवा चुकलों नाहीं असें दाखविण्याची जी वृत्ति, ती तिच्या चेहऱ्यावर स्पष्ट व चटकन दिसूं लागली. कांहीं लोक दुसऱ्याची विचारमालिका एका मार्गावरून दुसऱ्या मार्गावर वालविण्यासाठीं वाटेंत कसे अगदीं नेम धरून टपून एकसारखे बसलेले असतात!

चंद्रनाथबाबू आंत येतात न येतात तोंच बाहेर निघून जाण्यासाठीं कांहीं तरी सबब शोधून काढण्याकरितां इकडे तिकडे पाहून म्हणाले, “ माझी चूक झाली. मी——”

त्यांचें वाक्य पुरें होण्यापूर्वींच मधुराणी त्यांच्याजवळ जाऊन त्यांस लवून नमस्कार करून म्हणाली, “ महाराज, जाऊं नका! आपण येथेंच कां बसत नाहीं?” बुडणारा मनुष्य जवळच्या मनुष्याला आधारासाठीं अगदीं घट्ट पकडून ठेवतो तेव्हां त्याची जी अवस्था होते ती तिची झाली. किती भित्री!

चंद्रनाथबाबूंनीं स्वदेशीबद्दल बोलण्यास सुरवात केली.

त्यांना कांहींच उत्तर न देतां तसेंच आपल्याशीं बडबडूं द्यावें असा मीं विचार केला. वृद्ध मनुष्याला आपले विचार स्पष्टपणें बोलूं देण्यासारखें जगांत दुसरें कांहीं नाहीं. त्याला असें वाटतें कीं, आपण सर्व जग आपल्या कह्यांत आणलें आहे—परंतु त्याच्या भकणाऱ्या जिभेपासून वास्तविक जग किती दूर आहे हें तो अगदींच विसरून जातो. मी खरोखर पुष्कळच वेळ स्तब्ध राहिलों होतों. परंतु माझे खुद्द शत्रू सुद्धां मला सहनशील म्हणून दोष देत नाहींत. चंद्रनाथबाबू बोलतां बोलतां जेव्हां म्हणाले, "आम्हीं जेथें बींच लावलें नाहीं तेथून फळ मिळण्याची जर आमची अपेक्षा असेल तर माझें एवढेंच म्हणणें आहे कीं,——" तेव्हां मात्र मीं त्यांना मध्येंच अडथळा केला. मी ओरडलों, "फळ कोणाला पाहिजे आहे ?"

चंद्रनाथबाबूंनीं जरा चमकूनच विचारलें, "तर मग तुम्हांला पाहिजे आहे तरी काय ?"

"कांटे !" मी ओरडलों. "ते लावण्याला मुळींच त्रास पडत नाहीं."

"परंतु कांटे फक्त दुसऱ्यालाच त्रास देतात असें नाहीं. आपल्या स्वतःच्या सुद्धां पायाला ते बोंचतात."

"कित्त्यामध्यें लिहावयाला हें वाक्य चांगलें आहे !" मी टोमणा मारून म्हणालों. "परंतु ज्या गोष्टीमुळें आमचें हृदय जळत आहे तीच आम्हांला या काळांत फार महत्त्वाची आहे. आमचे कांटे दुसऱ्यांच्या पायांला बोंचतील एवढेंच

आम्हांला सध्यां पुरे आहे. आमच्या पायांना ते बोंचण्याची वेळ येईल तेव्हां मग पश्चात्ताप करीत बसण्याला पुष्कळ अवकाश मिळेल. परंतु आजच त्यामुळें एवढें घाबरून कां जा ? जेव्हां मरणाची वेळ प्राप्त होईल तेव्हां मग थंड होऊं लागावयाला वेळ मिळेल. आम्ही जोंपर्यंत अग्नीवर आहोंत तोंपर्यंत आम्हीं उकळत राहिलें पाहिजे—उसळत राहिलें पाहिजे. ”

चंद्रनाथबाबूंनीं स्मित केलें. ते म्हणाले, “ उकळतच रहावयाचें असेल तर खुशाल रहा. परंतु आपण मोठें कार्य करीत आहोंत अथवा शौर्य गाजवीत आहोंत अशी भलतीच कल्पना मात्र करून घेऊं नका. जगांत राष्ट्रांनीं आजपर्यंत जी प्रगति केली आहे ती क्रियेनें केली आहे; नुसत्या उकळण्यानें—भावनातिरेकानें—केलेली नाहीं. नेहमीं कामाची भीति बाळगून त्यापासून दूर राहणारे लोक हीनता प्राप्त झाल्यामुळें जेव्हां जागे होतात तेव्हां आपल्याला त्या दैन्यांतून सोडवून घेण्यासाठीं मग ते आडवाटा आणि छटपणा यांचा आश्रय करतात. ”

यावर अगदीं एक जोराचें आणि बाबूमहाशयांच्या विचारांचा चुराडा उडवून टाकणारें उत्तर देण्यासाठीं मी कंबर कशीत होतों इतक्यांत निखिल आंत आला. चंद्रनाथबाबू उठले आणि मधुराणीकडे पाहून म्हणाले, “ माझ्या लहानग्या माते, मला आतां जाऊं दे; मला दुसरीकडे कांहीं थोडेंसें काम आहे. ”

ते गेल्यावर मीं निखिलला माझ्या हातांतील पुस्तक

दाखविलें आणि म्हटलें, " मधुराणीला मी या पुस्तकासंबंधीं सांगत होतों. "

शेंकडा नव्याण्णव मनुष्यांना खोटें सांगून फसवावें लागतें. परंतु शाळागुरूच्या या चेल्याला खरें सांगून फसविणें त्याहीपेक्षां सोपें काम आहे. स्वतःच फसण्याची त्याला संधि दिली कीं, मग तो पुरा फसलाच! तेव्हां त्याच्याबरोबर खेळतांना माझे पत्ते टेबलावर उघडे ठेवणें हाच श्रेयस्कर मार्ग होता.

निखिलनें पुठ्यावरील पुस्तकाचें नांव वाचलें; परंतु तो कांहींच बोलला नाहीं. मी आपलें बोलणें पुढें चालू ठेवून म्हणालों, " मनुष्यांनीं या आपल्या जगावर जी विशेषणांची धूळ भरून टाकली आहे तिच्या खालची वास्तविकता बाहेर काढण्याच्या हेतूनें ती धूळ काढून टाकण्याकरितां हे लेखक कसे केरसुण्या घेऊन तयार असतात! तेव्हां मी मधुराणीजवळ म्हणत होतों कीं, तूं हें पुस्तक वाचावेंस अशी माझी इच्छा आहे. "

" मीं तें वाचलें आहे. " निखिलनें उत्तर दिलें.

" असें का? मग काय तुझें म्हणणें आहे त्यावर?"

" ज्यांना विचार करण्याची खरोखरीच इच्छा आहे त्यांना फार चांगलें आहे तें; परंतु विचारापासून जे दूर पळतात त्यांना तें विषरूप आहे. "

" तुझ्या म्हणण्याचा अर्थ तरी काय?"

" कां बरें? वस्तुजातावरील स्त्रीपुरुषांच्या समसमा-

हक्कांविषयीं जे उपदेश करतात ते जर चोर नसतील तर मग हें पुस्तक चांगलें नाहीं का ? आणि जरी ते चोर असले तरी असें सांगतांना ते खोटें तरी बोलत नाहींत. स्वार्थभावना ज्यावेळीं इतर सर्व भावनांपेक्षां हृदयांत जास्त जागृत असेल त्यावेळीं अशा तऱ्हेचें पुस्तक बरोबर समजत नाहीं."

"वासना तर आम्हांला मार्ग दाखविणारा–वाटाड्या–कंदिलाचा खांब आहे. डोळे काढून मग उत्तम दिसण्याची अपेक्षा करणें जितकें व्यर्थ आहे तितकेंच वासना असत्य हें म्हणणें आहे."

मधुराणीनें आमच्या वादांत मिसळावें अशी माझी इच्छा होती. परंतु आतांपर्यंत तिच्या तोंडून एकही शब्द बाहेर पडला नव्हता. मीं तिला दिलेला धक्का फाजील धीटपणाचा होता काय ? त्यामुळेंच तिच्या मनांत तर्कवितर्क उत्पन्न होऊन शाळामास्तरांकडून पुन्हां धडे घेण्याची इच्छा तिच्या मनांत उत्पन्न झाली होती काय ? तरी पण पूर्ण व सार्वत्रिक धक्का दणें अत्यावश्यक आहे. ज्या गोष्टी ढळविणें शक्य नाहीं असें मनुष्याला वाटतें त्या ढळविणें शक्य आहे असें त्याला वाटूं लागण्यापासूनच सुरवात झाली पाहिजे.

मी निखिलला म्हणालों, "तुझें माझें हें बोलणें झालें ही फार आनंदाची गोष्ट झाली. कारण हें पुस्तक मी मधुराणीला वाचावयास देण्याच्या अगदीं बेतांत होतों."

" काय हरकत आहे ?" निखिलनें विचारलें. "मीं जर तें पुस्तक वाचलें तर मग तें विमलनेंही कां वाचूं नये ?

मला जें काय सांगावयाचें आहे तें हें कीं, युरोपमध्यें प्रत्येक गोष्टीकडे लोक शास्त्राच्या दृष्टीनें पाहतात. परंतु मनुष्य म्हणजे कांहीं निव्वळ शारीरशास्त्र अथवा निव्वळ प्राणिशास्त्र अगर निव्वळ अध्यात्मशास्त्र एवढेंच नव्हे तर निव्वळ समाजशास्त्रही नव्हे. कसेंही करून ही गोष्ट विसरूं नका म्हणजे झालें."

"पण तुला त्याबद्दल इतकी काळजी काय म्हणून?" मीं चेष्टापूर्वक विचारलें.

"कारण मनुष्याला कमी दर्जाचा करण्याचा, त्याला क्षुद्र करण्याचा तुम्हीं अगदीं निश्चय केला आहे हें मला दिसत आहे."

"कोठेंसें दिसतें तुला तें बोवा या जगांत?"

"वातावरणांत, माझ्या धर्षित भावनांत मला तें स्पष्ट दिसत आहे. मनुष्यांत जें कांहीं उच्च, स्वार्थरहित आणि सुंदर म्हणून आहे तेवढ्याला तुम्ही खच्ची करून त्याचा नाश करणार." असें मोठ्या आवेशानें बोलून निखिल खोलींतून तडक चालता झाला.

तो जात असतांना त्याच्याकडे शून्य दृष्टीनें मी पाहत होतों तोंच टेबलावरून पुस्तक खालीं पडल्याचा आवाज मला ऐकूं आला; म्हणून मागें वळून पाहतों तों मधुराणी घाबरत घाबरत, जलदीनें, माझ्या जवळ आलेंसें न होईल अशा बेतानें, आंग सांवरीत, त्याच्या मागोमाग जातांना मला दिसली.

काय चमत्कारिक प्राणी आहे हा निखिल! आपल्या घराबर

कोणतें संकट येऊं पाहत आहे याची याला पूर्ण जाणीव आहे. आणि तरी सुद्धां हा मला घरांतून बाहेर कां घालवीत नाहीं ? विमलकडूनच ही सूचना व्हावी म्हणून तो थांबला असावा हें मी ओळखतों. आपण एक ठिकाणीं जोडले गेलों परंतु हा सांधा चुकीचा झाला असें त्याला जर विमल सांगेल तर तो मुळींच नाहीं म्हणणार नाहीं; “हो हो खरेंच, ती मोठी घोडचूक झाली ” असें म्हणून तिच्या म्हणण्याला तो अनुमति दर्शवील. चूक कबूल करणें ही सर्वांत मोठी चूक होय हें समजण्याइतकें त्याचें मन खंबीर नाहीं. कल्पना मनुष्याला कशा दुर्बल करतात याचें तो एक मासलेवाईक उदाहरण आहे. सृष्टीनें छांदिष्टपणें उत्पन्न केलेला याच्यासारखा प्राणी मीं दुसरा कोणीही पाहिला नाहीं. कादंबरी अथवा नाटक यांतील एखादें पात्र होण्याला सुद्धां तो लायक नाहीं, मग वास्तविक संसाराची गोष्ट कशाला ?

आणि मधुराणी ! मला वाटतें तिचें स्वप्नमय जीवित आजपासून संपलेंच. तिला जो ओघ वाहून नेत आहे त्याचें स्वरूप एकदांचें आतां तिच्या ध्यानांत आलें आहे. आतां तिला उघडया डोळ्यांनीं पुढें गेलें पाहिजे अथवा उघडया डोळ्यांनीं मागें आलें पाहिजे. एकदां ती एक पाऊल पुढें जाईल, परंतु पुन्हां एक पाऊल मागें येईल, असा अंदाज वाटतो. तथापि मला त्याचें कांहीं वाटत नाहीं. मनुष्य एकदां पेटलेला असल्यावर त्याच्या मागेंपुढें होण्यामुळें ज्वाळा जास्तच भयंकर होतात. तिच्या मनांत जी भीति उत्पन्न झाली आहे

तिच्यामुळें तिचा विकार जास्तच प्रज्वलित होईल.

तिच्याशीं विशेष संभाषण करीत बसण्यापेक्षां तिला कांहीं अर्वाचीन पुस्तकेंच वाचावयास देणें बरें असें मला वाटतें. तिचें तिलाच कळून चुकूं दे कीं, खरोखरीचें अर्वाचीन व्हावयाचें म्हणजे वासना हें सर्वगामी सत्य आहे हें जाणून त्याला मान देऊं लागलें पाहिजे. त्याची लाज वाटतां कामा नये, अथवा वासना दाबून ठेवण्यांत धन्यताही मानतां कामा नये.

तें कसेंही होवो. या सगळ्याची मला आतां पांचव्या अंकापर्यंत पाठ पुरविलीच पाहिजे. राजघराण्याकरितां राखून ठेवलेल्या चष्म्यांत बसून मधून मधून स्तुतिपर टाळ्या वाजविणारा असा या नाटकाचा मी केवळ एक प्रेक्षक आहें असें कांहीं मला मान वर करून सांगतां येणार नाहीं. माझ्या हृदयाला एक शल्य टोंचत आहे, माझ्या रोमरंध्रांतून एक प्रकारचा सणका सुरू आहे. दिवा मालवून जेव्हां मी अंथरुणावर पडतों तेव्हां क्षुद्र स्पर्श, क्षुद्र दृष्टिक्षेप, क्षुद्र शब्द सभोंवार उपस्थित होऊन सर्व अंधकार भरून टाकतात. सकाळीं जेव्हां मी उठतों तेव्हां नवीन आनंदमय अपेक्षांनीं माझें शरीर रोमांचित होतें, आणि कांहीं गायनवादन ऐकल्याप्रमाणें माझें रक्त शरीरांत उसळूं लागतें.

निखिलच्या टेबलावर फोटोची एक दुहेरी चौकट होती. तिच्यांत एका बाजूला मधुराणीचा आणि दुसऱ्या बाजूला निखिलचा असे दोन फोटोग्राफ होते. त्यांतून मीं तिचा फोटोग्राफ काढून घेतला होता. काल तिला मीं मोकळी

बाजू दाखवून म्हटलें, " केवळ कंजुषपणामुळें जेव्हां चोरीची आवश्यकता उत्पन्न होते, तेव्हां तिचा दोष कंजूष आणि चोर अशा दोघांत वांटून दिला पाहिजे."

" तो फोटो कांहीं मोठासा चांगला नव्हता." मधुराणी स्मित करून सहज म्हणाली.

" त्याला काय करावयाचें ?" मी म्हणालों. " तसबीर ही आदर्शापेक्षां सुंदर कोठून असणार ? ती जशी आहे तशांतच मला समाधान मानलें पाहिजे."

मधुराणी पुस्तक घेऊन त्याचीं पानें चाळूं लागली. " तुम्हांला जर ही गोष्ट लागली असेल," मी पुढें म्हणालों, " तर मग ही उघडी जागा भरून काढण्यासाठीं कांहीं तरी युक्ति लढविली पाहिजे."

आज मीं ती जागा भरून टाकली आहे. हा माझा फोटोग्राफ माझ्या लहानपणीं घेतलेला आहे. त्यावेळीं माझा चेहरा तरुण होता. माझें मनही तसेंच होतें. त्यावेळीं इहपरलोकांविषयीं माझ्या सुद्धां मनांत कांहीं भ्रामक कल्पना अस[illegible]. अशा कल्पना असणें सुरक्षितपणाचें नाहीं खरें, परं[illegible] त्यामुळें अवयवांना एक प्रकारची तेजस्विता येते खास.

[illegible] आतां माझा फोटोग्राफ निखिलच्या शेजारीं आहे; आणि अ[illegible] मी फार जुने स्नेहीही नाहीं काय ?

आणि

सांठ[illegible]

भण[illegible]

प्रकरण सहावें

निखिलची आत्मकथा

आजपर्यंत मला स्वतःची जाणीव अशी नव्हती. पर हल्लीं मी आपलें बाह्य स्वरूप पाहण्याचा—विमलल मी कसा दिसतों हें पाहण्याचा—प्रयत्न करूं लागलों आहे सर्वच गोष्टी अगदीं जशा दिसतात तशाच असतात मानण्याच्या माझ्या आजपर्यंतच्या प्रवृत्तीमुळें मला तें किती भयाण व शांत वाटतें !

खरोखर संसार अश्रूंनीं भिजवून चालविण्यापेक्षां तो चालविणेंच जास्त बरें ! निदान जग तरी याच र चाललें आहे. अन्न अथवा विश्रांति यांची आम्हांला अर्थु कां वाटते ? जिकडे तिकडे, वरीं दारीं, अंतर्बाह्य, पसरलेल्य सावली समजून आम्ही दूर फेंकून देऊं शकतों म्हणून खरीं आहेत असें आम्हांला एकच क्षण जरी वा मग आमची क्षुधा, आमची निद्रा, कोठें बरें जाईल परंतु अरेरे ! स्वतःला कांहीं या सावल्यांपैकीं एव

मी एकीकडे करूं शकत नाहीं; आणि म्हणून माझ्या संसारांत दुःखाचें जड ओझें माझ्या हृदयाला दडपीत आहे. त्याचाच परिणाम हें गांभीर्य ! हे अश्रू !

अरेरे, दुर्दैवी प्राण्या ! सृष्टीच्या राजरस्त्यावर, सर्व संबंध सोडून, एकटा एकीकडे उभा राहून, आपण केवळ या सर्व पसाऱ्याचा एक सूक्ष्म अंश आहों अशी आपल्या मनाची जाणीव तूं कां करून घेत नाहींस ? अमर्याद, अनादि अशा या मानवी जमावांत विमल तुझी कोण आहे ? तुझी पत्नी ? पत्नी म्हणजे काय ? तुझ्या स्वतःच्याच श्वासानें फुगवून मोठा केलेला एका नांवाचा तो बुडबुडा नव्हे काय ? इतकी रात्रंदिवस काळजी घेऊन त्याचें संरक्षण केलें तरी, बाहेरून एखाद्या टांचणीचा संपर्क होतांच तो फुटणारच.

माझी पत्नी आणि म्हणून केवळ माझी—मन्मय ! ती जर म्हणूं लागली, "कांहीं नाहीं! माझी मी निराळी आहें." तर मग, "असें कसें होईल ? तूं सर्वस्वीं माझीच—मन्मयच आहेस" असें मीं तिला म्हणावयाचें काय ?

'माझी पत्नी.' खुद्द सत्य राहो, पण त्याच्या अन्वेषणांतील एक दुवा तरी हा शब्दसमुच्चय असेल काय ? त्या नांवांत एक सबंध जीव–मानुषता–मावविणें शक्य आहे काय ?

माझी पत्नी ! माझ्या जीवितांत जें जें म्हणून पवित्रतम आणि मधुरतम असें होतें तें तें मीं या लहानग्या शब्दांत सांठविलें होतें. मीं आपल्या हृदयांतून तो शब्द कधींही क्षणभर सुद्धां खालीं पडूं दिला नाहीं. माझ्या देवीच्या

देव्हाऱ्यावर मीं काय काय पूजारूपी धूपदीप ओंवाळले! विकाररूपी गायन तिच्या पुढें किती केलें! माझ्या वसंतांतील आणि शरदतूंतील किती किती पुष्पें तिच्या चरणीं अर्पण केलीं! आणि तीच देवी जर खेळांतल्या कागदी होडीप्रमाणें गटारांतील घाणेरड्या पंकमय पाण्याबरोबर वाहून जाऊं लागली तर मग मी सुद्धां— !

पहा! येथें सुद्धां माझ्या कोडग्या पावित्र्यबुद्धीनें शिरकाव केला! पंकमय कां बरें? आणि गटार तरी कशाला म्हणावयाचें? मात्सर्याच्या भरांत दांतओठ खाऊन कितीही शिव्या दिल्या, तरी संसारांतील घडलेल्या गोष्टी कांहीं बदलत नाहींत. विमल एकदां माझी नाहीं असें झालें म्हणजे मग ती माझी नाहीं. आणि मग कितीही धुसफूस केली, दांतओठ चावले, बुद्धिवाद सांगितला तरी ती माझी आहे असें सिद्ध करतां येणें शक्य नाहीं. माझें हृदय म्हणे फुटत आहे—फुटेना बिचारें! त्यामुळें कांहीं जग ओस पडत नाहीं; कारण या जीवितांत मनुष्य ज्या ज्या गोष्टींना मुकतो त्या सर्वांपेक्षां तो स्वतः किती तरी उच्च आहे. या माझ्या अश्रूंच्या समुद्राला सुद्धां पलीकडील तीर आहे. तसें नसतें तर कोणी रडलाच नसता!

हें सगळें खरें. पण मग समाजासंबंधीं विचार केला पाहिजे.

——समाजाला जरूर तर करील तो विचार. त्याचें मला काय? मी शोक करतों तो स्वतःसाठीं; समाजासाठीं कांहीं नव्हे! विमल जर म्हणूं लागली कीं, मी तुमची नाहीं,

तर मग माझी समाजांतील पत्नी कोठें आहे याची विवंचना मला कशाला ? कारण तिनें असें म्हटलें कीं मी अचूकच त्या समाजाच्या बाहेर जाईन.

माझे गुरुजी आतांच माझ्या खोलींतून बाहेर गेले. जातां जातां माझ्या खांद्यावर हात ठेवून ते म्हणाले, " निखिल, बाबा आतां नीज जा. रात्र फार झाली आहे. "

गोष्ट अशी झाली आहे कीं, हल्लीं मला फार रात्रपर्यंत—विमलला अगदीं गाढ झोंप लागेपर्यंत—झोंपच येत नाहींशी झाली आहे. दिवसा आम्ही एकमेकांना भेटतों आणि एकमेकांशीं बोलतों सुद्धां—परंतु रात्रीच्या या प्रशांत समयीं आम्ही दोघें एकांतांत असल्यावर मग काय बोलावें तरी काय ? मला अगदीं नखशिखांत लाज घेरते.

गुरुजींना उत्तर म्हणून मीं विचारलें, " मग तुम्ही अद्याप विश्रांतीसाठीं गेलां नाहीं हें कसें ? "

गुरुजींनीं थोडें स्मित केलें आणि आतां जातां ते म्हणाले, " माझे निद्रेचे दिवस आतां संपले आहेत. आतां मी जागृत राहण्याच्या वयांत आलों आहें. "

इतकें मीं लिहिलें आणि बिछान्याकडे जाण्याकरितां उठणार इतक्यांत आषाढ महिन्यांतील मेघांचें गाढ आवरण एकाएकीं मध्येंच फाटून त्या चिरेंतून एक भव्य तारा आपल्या दिव्य तेजानें प्रकाशत असलेला मला माझ्या समोरच्या खिडकींतून दिसला. " स्वप्नभूमींत बंधनें बांधलीं जातात; स्वप्नभूमींतील तीं बंधनें तुटतात. वधूवरांच्या प्रथम भेटीच्या

रात्रीं सदैव प्रकाशमान असणारा हा मी नेहमीं येथेंच आहे, आणि हें सर्व पाहत आहें, " असें तो मला म्हणत आहे कीं काय, असें मला वाटलें.

आधिभौतिक वस्तूंच्या पडद्याआड माझें शाश्वत प्रेम अगदीं धीरानें आज कित्येक युगें माझी वाट पाहत बसलेलें होतें असा विचार मनांत येऊन माझें हृदय अगदीं भरून गेलें. कित्येक जन्मांतून अनेक आरशांच्या साहाय्यानें मीं त्या प्रेमाचें प्रतिबिंब पाहिलेलें आहे—परंतु ते आरसे सगळे फुटके, वांकडे व धूळ बसलेले असे होते. मीं एखादा आरसा अगदीं आपलासा करण्याचा बेत करून तो आपल्या पेटींत बंद करून ठेवावा कीं, लगेच ती मूर्ति दृष्टीआड झालीच. पण त्याचें काय ? त्या आरशाशीं नाहींतर त्या मूर्तीशीं मला आतां काय करावयाचें आहे ?

" आत्मवंचना करून घेऊन आपलें किती बालिश—खोटें—समाधान करून घेत आहे हा ! " असें एखादें पिशाच्च अंधाऱ्या कोंपऱ्यांतून खिजवून म्हणतें. तरी पण आमच्यांत जी बालवृत्ति आहे तिचें शांतवन कसेंबसें हें केलेंच पाहिजे. आणि इतक्या शतशः सहस्रशः मुलांचे लाखों रुसवे केवळ खोट्या बोलण्यानें शांत होतात हें शक्य आहे काय ? नाहीं. माझें शाश्वत प्रेम मला फसविणार नाहीं; कारण तें सत्य आहे. तें खरें आहे; आणि म्हणून इतके वेळां माझ्या चुकांमधून, अश्रूंच्या गाढतम धुक्यांतून सुद्धां, तें मला दिसतें आणि असेंच दिसत राहील. मीं तें पाहून जीविताच्या या बाजारांत

गर्दीमध्यें तें हरविलेंही आहे व पुनः शोधून मिळविलेंही आहे. मृत्यूच्या खिडकींतून मी निसटलों म्हणजे तें मला पुनः एकदां सांपडणार आहे. हे निर्दया ! माझ्याशीं असे खेळ खेळण्याचें आतां पुरे कर. मार्गांतील तुझ्या पदचिन्हांवरून किंवा तुझ्या वस्त्रांचा सुवास वाटेंत पसरलेला असतो त्यावरून मी जरी तुझें स्थान शोधून काढून तुझा पत्ता लावूं शकलों नसलों, तरी तेवढ्याकरितां तूं मला नेहमींच शोक करावयाला लावूं नकोस. हा नेपथ्यविरहित तारा मला भिऊं नको म्हणून धीर देत आहे—जें शाश्वत आहे तें कायम राहणारच असें तो म्हणतो.

पहाऱ्यावरच्या घंटेंत दोन टोले पडले तेव्हां माझी धाकटी भावजय माझ्या खोलींत येऊन म्हणाली, " भावोजी, तुमचें कसलेंही काम असलें तरी आतां कृपा करून निजा जा आणि एवढे श्रम व त्रास घेत जाऊं नका. तुमच्या तोंडावर काय कळा आली आहे अगदीं ! मला अगदीं तिकडे पाहवत नाहीं. " एवढें बोलतांना तिचे नेत्र अश्रूंनीं भरून आले आणि भाषण संपतांच तिच्या मुखावर त्यांचे ओघळ वाहूं लागले.

मला एक शब्दही बोलवेना. मात्र शय्येकडे जातांना मी तिच्या पायांखालील माती कपाळाला लावली.

# प्रकरण सातवें

## विमलेची आत्मकथा

### १

अगदीं प्रथम मला कसलाही संशय आला नाहीं; कसलीही भीति वाटली नाहीं. मीं आपल्याला देशासाठीं वाहून घेतलें आहे असें मला अगदीं अंतःकरणापासून वाटलें. या अशा निर्भ्रांत आत्मसमर्पणानें किती भयंकर आनंद मला होत होता. पूर्ण आत्मनाशांत मनुष्याला श्रेष्ठतम सुख कसें मिळतें हें मला कसें अगदीं पटून चुकलें होतें !

माझी तर अशी समज आहे कीं, या माझ्या उन्मादाचा हळू हळू साहजिक शेवट झाला असता; परंतु संदीपबाबू त्याच्या आड आले. आपलें सत्स्वरूप उघडें करून दाखविण्याचा त्यांनीं हट्ट धरला. त्यांचा आवाज अगदीं स्पर्शाइतका निकट भासूं लागला. त्यांच्या प्रत्येक दृष्टिपातांत गुडघे टेंकून मागितलेली भिक्षा दिसूं लागली. त्यांच्या एकंदर

वर्तणुकींत कामविकार जळतोसा दिसला; आणि त्याचा जोर इतका वाढला कीं, तो आतां मला मुळापासून उपटून केस धरून ओढून नेतो कीं काय, अशी मला भीति पडली. मी सत्य सांगण्यास कचरणार नाहीं. ही प्रलयी इच्छा मला रात्रंदिवस मोहूं लागली. माझी नजीकची भवितव्यता किती भयंकर मोहक, लज्जास्पद, तशीच भयप्रद होती !

आणि त्यांत भरीला माझी अनिवार्य जिज्ञासा—तिला तर मर्यादाच नव्हती. मला त्यांच्याविषयीं अगदीं थोडी माहिती होती; ते माझे होणें कदापि शक्य नव्हतें. त्यांचें तारुण्य त्यांच्यामध्यें शेंकडों ज्वाळांनीं नुसतें पेटत होतें. तरी पण त्यांच्या उसळणाऱ्या गाढ आणि उद्दाम विकाराविषयीं मला किती गूढ वाटे ! मी त्याच्याविषयीं किती विचार करीं ! त्या लांबच्या समुद्राविषयीं मीं फक्त लोकांनीं सांगितलेलें ऐकलें होतें. परंतु एका बुभुक्षित लाटेसरशीं मार्गांतील सर्व विघ्नें ओलांडून तो फेंसाळत माझ्या पायांशीं मी जेथें माझ्या घराशेजारच्या डबक्यावर बारीक सारीक लाट वाढ्या घाशीत बसलें होतें तेथें आला.

मीं आराधनेच्या भावनेनें आरंभ केला. परंतु ती भावना केव्हांच वाहून गेली. मी संदीपबाबूंना मान देईनाशी झालें; उलट त्यांच्याकडे मी तुच्छतादर्शक दृष्टीनें पाहूं लागलें. तरी पण भावना व कल्पना यांनीं सजविलेल्या ह्या माझ्या हाडांमासांच्या वीणेला ते खरोखरच कुशल वादक मिळाले; मी यांच्या स्पर्शापासून जरी दूर सरलें असलें, आणि खुद्द वीणेचा

जरी मला तिरस्कार वाटूं लागला असला, तरी पण तिच्या नादानें नजरबंदी घडवून आणली खास !

माझ्या त्यावेळच्या वर्तणुकींत असें कांहीं तरी होतें—काय बरें त्याला म्हणावें ?—कीं, त्यामुळें मी मेलें असतें तर बरें झालें असतें असें मला वाटतें, हें कबूल करणें भाग आहे.

एके दिवशीं छद्मी हास्य करून माझी धाकटी जाऊ म्हणाली, “ काय आमच्या धाकट्या राणीसाहेबांची आदरातिथ्यबुद्धि ! आणि त्यांचा पाहुणा पण अगदीं कसूर करणारा नाहीं. आमच्या वेळीं सुद्धां पाहुणे येत असत. पण त्यांची इतक्या थाटानें काळजी आम्हांला घेतां येत नसे—आम्ही आपल्या बिचाऱ्या वेड्यांसारख्या आमच्या पतींकडेच गुंतलेल्या असूं! फार अर्वाचीन झाल्याचें पातक आमचे भावोजी बिचारे भोगीत आहेत. त्यांना येथें राहण्याची इच्छा होती तर त्यांनीं पाहुणा म्हणून येण्यांतच जास्त फायदा झाला असता. आतां त्यांचा काळ भरलाच असें वाटतें ! अरेरे ! हे राक्षसी ! त्यांचें दुःखित मुख तुझ्या कधींच नजरेस येणार नाहीं काय ? ”

परंतु माझ्या भक्तीचें कारण खरें काय होतें त्याचें स्वरूप जाणण्याइतकी अक्कल त्या बायकांत नव्हती हें मला पक्कें माहीत होतें. आणि म्हणून मला या असल्या व्यंग्योक्तींचें कांहीं वाटत नसे. त्यावेळीं त्यागाच्या प्रतिष्ठेचें एक प्रकारचें संरक्षक आवरण माझ्याभोंवतीं होतें; तेव्हां असले टोले त्याच्या आंत शिरून मला लज्जित करूं शकत नसत.

हल्लीं कांहीं दिवस देशाच्या कार्यासंबंधींचें भाषण तहकूब

आहे. आधुनिक स्त्रीपुरुषभेदविषयक प्रश्न आणि इतर कांहीं गोष्टी यांनीं हल्लीं आमचें संभाषण भरलेलें असे. मधून मधून कवितेविषयींही आम्ही बोलत असूं. जुनें वैष्णव काव्य व नवें इंग्रजी काव्य या दोहोंविषयीं आमची चर्चा चाले. त्याच वेळीं कधीं कधीं अगदीं मंद आवाजांतील—अगदीं खर्ज सुरांतील—मधुर व सतत गायनवादन आमच्या भाषणांत मिसळलेलें असे. याच्यापूर्वीं इतकें मधुर गायनवादन मीं कधींच ऐकलेलें नव्हतें. व तो आवाज म्हणजे पुरुषी बाण्याच्या सामर्थ्याचा खरा आवाज होय असें मला वाटे.

नंतर एक दिवस असा आला कीं, त्या दिवशीं सर्व आवरण निघून गेलें. संदीपबाबूंनीं माझ्या खोलींत रेंगाळावें अथवा एकसारख्या मीं त्यांच्याशीं एकांतांत गोष्टी कराव्या, या प्रकारांना आजपर्यंत कांहीं तरी सबबी लागत त्याही आतां लागतनाशा झाल्या. मी आपल्यावर संतापलें, माझ्या धाकट्या जावेवर संतापलें, जगाच्या रीतीभातींवरही मी संतापलें. व मृत्यु आला तरी बेहेत्तर परंतु आपल्या गोषाच्या दिवाणखान्यांतून पुन्हां बाहेर म्हणून यावयाचें नाहीं असा मीं निश्चय केला.

सबंध दोन दिवस मी बाहेर आलें नाहीं. आणि मग मीं कोठपर्यंत पल्ला गांठला होता याची मला पहिल्यांदांच जाणीव झाली. मला जीवित बेचव वाटूं लागलें. अगदीं पायांच्या नखांपासून तों तहत केसांच्या अग्रांपर्यंत मी वाट पाहत आहें—कशाची तरी वाट पाहत आहें, कोणाची तरी वाट पाहत आहें, असें मला वाटलें. कसल्या तरी अपेक्षेनें माझें रक्त एकसारखें

उसळूं लागलें.

नेहमींपेक्षां जास्त काम करून स्वतःला गुंतविण्याचा मीं प्रयत्न केला. शय्यागृहाची भूमि अगदीं असावी तशी स्वच्छ होती. परंतु पुन्हां ती माझ्या नजरेखालीं झाडली पाहिजे असा मीं आग्रह धरला. खणांतून वस्तु एका पद्धतीनें ठेवल्या होत्या. मीं त्या सर्व बाहेर काढल्या आणि दुसऱ्याच पद्धतीनें पुन्हां रचून ठेवल्या. माझ्या केसांची सुद्धां वास्तपुस्त घ्यावयाला मला त्या दुपारीं वेळ झाला नाहीं. घाईघाईनें मीं सईलसा अंबाडा बांधला आणि कोठीच्या खोलींत जाऊन आरडाओरडा करून सर्वांना नकोसें केलें. कोठींतील वस्तु मला थोड्या अशा भासल्या आणि तेथून दाबादाबी नेहमीं चालली असावी अशी माझी पक्की खात्री झाली. परंतु मला कोणालाच धारेवर धरतां येईना. कारण 'आजपर्यंत तुमचे डोळे कोठें गेले होते' हा प्रश्न कोणाच्या तरी मनांत आला असेल किंवा येईल अशी मला भीति पडली.

एकंदरींत त्या दिवशीं मी एखाद्या भारलेल्या मनुष्याप्रमाणें वागलें. दुसऱ्या दिवशीं मीं थोडेंसें वाचण्याचा प्रयत्न केला. मीं काय वाचलें मला कांहीं माहीत नाहीं. परंतु कांहीं काळ शून्य मनःस्थितींत गेल्यावर मी पुस्तक हातांत घेऊन बाहेरच्या दिवाणखान्यांत जाणाऱ्या रस्त्यावरून भटकत भटकत चौकाच्या पलीकडे सोप्यांतील खोल्यांकडे खिडकींतून पाहत उभी आहें असें मला आढळून आलें. त्या खोल्यांपैकीं एक खोली वल्हवीत वल्हवीत दुसऱ्या तीराला येऊन थांबली होती असें

मला वाटलें. दोन दिवसांपूर्वीच्या माझ्या स्वतःचें मी भूत आहें. मला अनंत काळपर्यंत तेथेंच आकाशाकडे शून्य दृष्टीनें पाहत उभें राहिलें पाहिजे. परंतु वास्तविक मी तेथें नाहीं. अशी माझी भावना झाली.

मी तेथें उभी आहें तोंच संदीपबाबू हातांत एक वर्तमानपत्र घेऊन आपल्या खोलींतून बाहेरच्या सोप्यांत आले. त्यांना असामान्य त्रास झालेला होता हें मला सहज दिसलें. चौक आणि आपल्या पुढील कठडा यांच्यामुळें त्यांचा संताप जागृत होतोसें दिसलें. त्यांनीं इतक्या कांहीं त्वेषानें हातांतील वर्तमानपत्र फेंकून दिलें कीं, आपल्यापुढील वातावरणाला छिन्नविच्छिन्न करण्याची त्यांची इच्छा आहे कीं काय असें मला वाटलें.

आतां कांहीं आपल्याच्यानें यापुढें प्रतिज्ञा राखवत नाहीं असें वाटून आमच्या बसण्याच्या खोलीकडे जाण्यासाठीं मी निघणार तोंच माझी धाकटी जाऊ माझ्या मागून आली. "परमेश्वरा! आतां तर सर्वांवर ताण झाली" असे उद्गार काढून ती माझ्या शेजारून निघून गेली. मला बाहेरच्या दिवाणखान्याकडे जाववेना.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं जेव्हां माझी दासी "अहो राणी आई; कोठींतून सामान देण्याची वेळ होऊन गेली" असें म्हणत आली, तेव्हां तिच्या आंगावर किल्ल्या फेंकून मीं म्हटलें, "हरिमतीला सामान द्यावयास सांग." नंतर मी आपलें इंग्रजी पद्धतीचें एक जुनेंच विणकाम हातांत घेऊन

खिडकीशीं बसलें.

कांहीं वेळानें एक नोकर पत्र घेऊन आला. संदीपबाबूंकडून आणलें असें तो म्हणाला. किती अमर्याद धाष्टर्य हें! पत्र आणणाराला काय वाटलें असेल? वरचें आवरण फोडलें तेव्हां माझें हृदय भीतीनें थरारलें. आवरणावर पत्ता नव्हता. पत्रांत फक्त "कार्यासंबंधीं अत्यंत जरूरीचें काम.—संदीप." एवढींच अक्षरें होतीं.

मरोत तीं वस्त्राभरणें! मीं चटकन उठून आरशांत पाहून केस थोडे वळविले. लुगडें कायमच ठेवलें. फक्त चोळी बदलली. कारण माझ्या एका चोळीला इतिहास होता.—

मला ज्या पडवींतून जावयाचें होतें त्याच पडवींत माझी धाकटी जाऊ सकाळच्या प्रहरीं सुपारी कातरीत बसली होती. मी मुळींच लाजलें अथवा भ्यालें नाहीं. "कोणीकडे धाकट्या राणीसाहेब?" ती मोठ्यानें म्हणाली.

"बाहेरच्या बसण्याउठण्याच्या दिवाणखान्यांत."

"इतक्या लौकर? सकाळची भेट वाटतें!"

आणि मी जेव्हां कांहीं उत्तर न देतां पुढें चालती झालें तेव्हां ती मला लागेल असें एक गाणें गुणगुणूं लागली.

## २

मी खोलींत शिरलें तेव्हां संदीपबाबू रॉयल ॲकॅडेमीचीं चित्रें पाहत दाराकडे पाठ करून गढून गेलेले असे

बसले होते. मी खोलींत गेल्यावर माझी चाहूल त्यांना ऐकूं गेली हें मला पक्कें माहीत होतें. परंतु त्यांनीं आपणांस कांहींच ऐकूं आलें नाहीं असें दाखविलें. त्यांनीं आपली दृष्टि पुस्तकावरून ढळविली नाहीं.

कलेवरील त्यांच्या भाषणाचें मला मोठें भय वाटे. कारण ते ज्या चित्रांविषयीं बोलत त्यांविषयींची माझी आवड मला लपवितां येत नसे. ते ज्या गोष्टी बोलत त्यांविषयींही माझी अशीच स्थिति होई. आणि माझ्या हृदयांतील उमाळी लपविण्याकरितां ओढून ताणून आणलेली अज्ञानवृत्ति राखतां राखतां मला नको जीव होई. म्हणून मी आल्या पावलानें परत जाण्याच्या विचारांत होतें इतक्यांत संदीपबाबूंनीं एक दीर्घ उसासा टाकला आणि दृष्टि वर करून मला पाहतांच अत्यंत आश्चर्य वाटलेंसें दाखविलें. “ आं ! तुम्ही आलां ! ” असे त्यांनीं उद्गार काढले.

त्यांच्या शब्दांत, आवाजांत व दृष्टींत दाबून ठेविलेली निर्भर्त्सना जणूं काय उतूं चालली होती. जणूं काय त्यांनीं मजवर जें वर्चस्व मिळविलें होतें त्याच्या दृष्टीनें मी गेले दोनच दिवस गैरहजर राहिलें हा सुद्धां माझा मोठा अपराध झाला. त्यांनीं माझ्या बाबतींत अशा प्रकारची वृत्ति दाखविणें म्हणजे त्यांत माझा अपमान होता हें मी जाणत होतें, परंतु त्याबद्दल तिरस्कार व्यक्त करण्याची शक्ति माझ्या आंगीं नव्हती.

मीं उत्तर दिलें नाहीं. परंतु मी जरी दुसरीकडेच पाहत होतें तरी संदीपबाबूंची दृष्टि अगदीं थेट माझ्या चेहऱ्याशीं

भिडली असून माझी नकारवृत्ति ते कोणत्याही प्रकारें मान्य करणार नाहींत असें मला वाटलें. ते कांहीं तरी बोलतील तर बरें, म्हणजे मग त्यांच्या शब्दाआड आपल्याला लपतां येईल असें मला वाटूं लागलें. हें असें किती वेळ चाललें होतें कोण जाणे. पण मला कांहीं केल्या जास्त धीर धरवेना. "कोणत्या अशा महत्त्वाच्या बाबतींत तुम्हांला माझ्याशीं बोलावयाचें आहे?" असें मीं शेवटीं विचारलें.

संदीपबाबूंनीं आपल्याला आश्चर्य वाटलेंसें पुन्हां एकदां दाखविलें. ते म्हणाले, "प्रत्येक वेळीं कांहीं तरी बाबत पाहिजे ना? तर मग मैत्री हा एक गुन्हाच समजावयाचा काय? अरेरे! मधुराणी, जगांतील ह्या सर्वोत्तम गोष्टीविषयीं तुमच्या मनांत इतकी क्षुद्र भावना असावी ना! हृदयाची भक्ति केवळ एखाद्या कुतरड्याप्रमाणें आपण लाथाडणार काय?"

पुन्हां एकदां नेहमींप्रमाणें माझ्या हृदयाला कंप सुटला. आणीबाणीची वेळ अगदीं जवळ येऊन ठेपली, आतां ती टाळणें शक्य नाहीं, अशी माझी भावना झाली. आनंद आणि भीति वर्चस्वासाठीं माझ्या हृदयांत झगडूं लागलीं. त्या प्रसंगाचा धक्का सहन करण्याइतकें माझें हृदय कठिण होईल तर बरें असें मला वाटूं लागलें. नाहींतर त्यामुळें मी धडपडून पडून माझें मुख धुळींत मळविलें तर जाणार नाहींना अशी मला भीति वाटूं लागली.

माझें सर्वांग कांपत होतें. मोठा धैर्याचा प्रयत्न करून मीं

माझा कंप थांबविला आणि म्हटलें, "आपल्या कार्यासंबंधीं महत्त्वाच्या अशा कांहीं कामाकरितां तुम्हीं मला बोलाविलेंत. आणि म्हणून मी आपलीं घरांतील कामें टाकून इकडे आलें."

अगदीं शुष्क असें हास्य करून ते म्हणाले, "आणि त्याच कामासंबंधीं मी आपणांस विवरण करून सांगत होतों. मी आराधना करण्यासाठीं आलों हें आपणांस माहीत नाहीं काय? मीं तुम्हांला सांगितलेलें नाहीं का, कीं आमच्या देशाची शक्ति मला तुमच्या ठायीं दृश्य स्वरूपांत दिसते म्हणून? भूगोलवर्णन हेंच कांहीं एक सत्य नाहीं. केवळ नकाशासाठीं कोणीही आपलें जीवित अर्पण करणार नाहीं. तुम्ही जेव्हां मला दृष्टीसमोर दिसतां तेव्हां माझा देश किती सुंदर आणि प्रिय आहे हें मला समजून येतें. तुम्ही जेव्हां आपल्या स्वतःच्या हातांनीं मला अभ्यंग स्नान घालाल तेव्हां मला माझ्या कार्यांत माझ्या देशाची अनुमति मिळाली असें वाटेल; ती अनुमति हृदयांत बाळगून लढत असतां मी पडलोंच, तर नकाशांनीं बनविलेल्या भूमीवर धुळींत खास पडणार नाहीं. एखाद्या मनोहर रीतीनें पसरलेल्या पदरावर पडेन. तो पदर कशा प्रकारचा असेल याची तुम्हांला कल्पना आहे काय? परवां तुम्ही नेसलां होतां त्या प्रकारच्या रुंद आणि रक्तासारख्या लाल कांठाच्या व मातट तांबड्या आंगाच्या लुगड्याप्रमाणें तो पदर असेल. तें लुगडें मी कधीं तरी विसरेन काय? असल्या गोष्टीच्या दर्शनानें जीवितांत जोर उत्पन्न होतो; मृत्यूंत सौख्य उत्पन्न होतें."

बोलतां बोलतां संदीपबाबूंच्या नेत्रांतून अग्निस्फुलिंग बाहेर पडतातसें दिसलें. मग ते आराधनेमुळें उत्पन्न झालेले होते कीं विकारामुळें उत्पन्न झालेले होते, तें कांहीं मला सांगतां येत नाहीं. अगदीं प्रथम ज्या दिवशीं मीं त्यांचें भाषण ऐकलें त्या दिवशींची मला आठवण झाली. त्या दिवशीं ते एक मानुष व्यक्ति आहेत कीं स्वतः अग्नीची मूर्ति आहेत याचीच मला भ्रांति पडली होती.

मला एक शब्दही उच्चारण्याचें सामर्थ्य नव्हतें. मला अशी भीति वाटूं लागली कीं, स्वतःचें भान विसरून ते माझा हात धरतात कीं काय? इतके ते अग्निज्योतीप्रमाणें कांपत होते आणि त्यांच्या नेत्रांतून जहर अग्निस्फुलिंग वर्षत होते.

कांहीं वेळ थांबून त्यांनीं पुन्हां मोठ्यानें सुरवात केली. " तुमच्या क्षुद्र घरगुती कामाचे देव्हारे माजविण्याचा तुमचा अगदीं कायमचा निश्चय झाला काय? तुम्ही कांहीं एखादी क्षुद्र स्त्री नाहीं कीं, तुम्हीं अशा प्रकारचा निश्चय करावा. आम्हां पुरुषांना जगविणें अथवा मारणें तुमच्या हातांत आहे. हें तुमचें सामर्थ्य जनान्यांतच दडून रहावयाचें काय? ही असत्य लज्जा अगदीं टाकून द्या. तुमच्या आजूबाजूला कुरबूर होत असली तरी तिकडे अगदीं लक्ष देऊं नका अशी माझी तुम्हांला प्रार्थना आहे. तुम्ही आज बाह्य स्वातंत्र्यांत उडी घ्याच!"

संदीपबाबूंच्या प्रार्थनांमधून मजवरील भक्तीबरोबरच त्यांची स्वदेशावरील भक्ति अत्यंत कौशल्यानें मिश्रित होते तेव्हां मात्र माझें रक्त खरोखर उसळूं लागतें आणि माझ्या संकोचाचीं बंधनें

लटपटतात. संदीपबाबूंना कांहीं वाईट लागणारीं, घाणेरडीं उत्तरें देण्याचे प्रयत्न मीं केले असते; परंतु त्यांचीं कला, स्त्रीपुरुषभेद यांविषयींचीं बोलणीं, वास्तविक आणि अवास्तविक यांमध्यें ते दाखवीत तो फरक, वगैरे गोष्टींमुळें माझें मन तशीं उत्तरें द्यावयाला धजलें नाहीं. परंतु आजची त्यांची वृत्ति इतकी कांहीं चमत्कारिक तेजस्वी होती कीं, त्यामुळें माझा सगळा विरोध नाहींसा झाला. आपल्या तेजस्वी स्त्रीत्वामुळें आपल्याला देवतात्व प्राप्त झालें आहे अशी माझी समजूत झाली.

इतक्यांत एकाएकीं माझी मोलकरीण खेमा गडबडीनें केस पिंजारून आंत येऊन म्हणाली, " मला आपली माझी मजुरी द्या आणि मला जाऊं द्या. माझ्या सगळ्या आयुष्यांत मला कधीं असा—" तिचें पुढचें सगळें भाषण हुंदक्यांत दडपून गेलें.

" काय झालें तरी काय ? "

धाकटया जाऊबाईंच्या ठकू नांवाच्या दासीनें वाटतें तिला कांहींएक कारण नसतांना एकाएकीं अवाच्या सवा शिव्या दिल्या होत्या. तिची तर इतकी स्थिति झाली होती कीं, मीं या बाबतींत चौकशी करीन असें म्हणून तिला शांत करण्याचा प्रयत्न केला, पण अगदीं व्यर्थ !

स्त्रीरूपी सरोवराच्या कमलमय तटाखालीं कसा चिखल असतो तें उघड झालें. संदीपबाबूंना दीर्घ दर्शन देण्याचें सोडून मला घाईघाईनें आंत जावें लागलें.

३

माझी धाकटी जाऊ सुपारी कातरण्यांतच गढलेली होती. तिच्या ओठांवर थोडें स्मित खेळत असावें असें दिसलें; जणूं काय कांहीं विशेष घडलेंच नाहीं असा तिचा चेहरा दिसला. मी जातांना ज्या गाण्याला तिनें सुरवात केली होती तेंच ती अद्यापही गुणगुणत होती.

" तुमची ठकू माझ्या बिचाऱ्या खेमेला शिव्या कां देत होती ? " मीं जरा ठांसून विचारलें.

" खरेंच कीं काय ? किती द्वाड तरी ! मी तिला घरांतून पार काढून लावीन. तुम्हांला या अशा प्रशांत प्रातःकाळीं कोण हा त्रास ! सगळी मजा घालविलीन घाणेरडीनें ! आणि खेमा तरी ! कांहीं रीतभात तिला ! तुम्ही कामांत गुंतलां असतांना तुम्हांला तिनें असा त्रास द्यावयाचा का ? जाऊं द्या कीं धाकट्या राणीसाहेब. तुम्ही या घरगुती खरकट्यांकडे पाहूं नका. तीं आपलीं राहूं देत मजकडे. तुम्ही आपल्या आपल्या मित्राकडे जा. "

आपल्या मनोरूपी शिडांतील वारा किती एकदम बदलतो व आपला मार्ग फिरवितो ! हें माझें संदीपबाबूंना बाहेर भेटावयाला जाणें जनान्याच्या कायद्याच्या दृष्टीनें इतकें चमत्कारिक आणि रीतीविरुद्ध होतें कीं, जावेच्या ह्या म्हणण्यावर मला कांहीं उत्तर न सुचून मी तडक माझ्या

खोलींत गेलें. मला समजून चुकलें कीं, हें सगळें माझ्या धाकट्या जावेचें कृत्य होतें. तिनेंच आपल्या दासीला फूस देऊन हा सगळा प्रकार घडवून आणला होता. परंतु वातावरणांत मी इतक्या समतोल स्थितींत जाऊन पडलें होतें कीं, मला भरारी मारणें शक्यच नव्हतें.

परवांच नाहीं का? मीं जेव्हां माझ्या पतींना त्या नानकूला काढून टाकण्यासंबंधीं हट्टानें सांगितलें, त्यावेळींच आपल्याला आपला अढळ ताठा शेवटपर्यंत जसाच्या तसा कायम ठेवतां येत नाहीं हें मला कळून चुकलें. धाकटी जाऊ जवळ येऊन जेव्हां म्हणाली, " भावोजी, हा सगळा माझा दोष आहे. आम्ही आपलीं जुन्या चालीचीं माणसें. मला कांहीं त्या तुमच्या संदीपबाबूचें वर्तन ठीक वाटलें नाहीं, म्हणून मीं देवडीवाल्याला सांगितलें. मला काय ठाऊक कीं, त्यामुळें आमच्या धाकट्या राणीसाहेबांना आपला अपमान झालासें वाटेल? मला वाटलें, त्यांना त्याच्या उलटच वाटेल आणि सर्व कांहीं ठीक जुळेल. काय माझा कोडगा मूर्खपणा हा!" तेव्हां मी लज्जेनें अगदीं चूर होऊन गेलें.

एकच गोष्ट; देशकार्याच्या उंचीवरून जी अत्यंत भव्य आणि तेजस्वी वाटते तीच खालून तळांतून पाहिली कीं किती घाणेरडी चिखलट दिसूं लागते! असें झालें म्हणजे मग मनुष्याला राग येतो आणि त्याचें पर्यवसान मनस्तापांत होतें.

मी स्वतःला खोलींत कोंडून घेऊन खिडकीशीं जाऊन बसलें. मनांत विचार आला कीं, आपल्या सभोंवारच्या परिस्थितीशीं

मनुष्याला एकतानता ठेवतां आली तर जीवित–संसार–किती सोपें होऊन जाईल ! माझी धाकटी जाऊ पडवीमध्यें आपली सुपारी घेऊन किती सहज आणि खुल्या दिलानें बसते! आणि मलाच माझीं रोजचीं कामें स्वाभाविकपणें कां साधत नाहींत ? याचा शेवट कोठें होणार असा मीं आपल्या अंतःकरणाला प्रश्न केला. मनुष्य उन्मादवायूंतून शुद्धीवर येतो तशी मी कधीं तरी शुद्धीवर येऊन सर्व कांहीं विसरेन का ? कीं मी अशीच खोल खोल जाऊन इतकी खोल जाणार कीं, मग या आयुष्यांत तेथून सुटका होणें शक्यच नाहीं ! पण माझें सुदैव पळवून लावून माझ्या जीविताची ही नासाडी करण्याला कारणीभूत माझी मीच झालें ना ? आज नऊ वर्षांपूर्वीं मीं ज्या शय्यागृहांत वधू म्हणून प्रवेश केला, त्या माझ्या शय्यागृहांतील या सगळ्या भिंती माझ्याकडे निराशेनें पाहत आहेत.

माझे पति जेव्हां एम.ए.ची परीक्षा देऊन घरीं आले, तेव्हां बरोबर सातां समुद्रांपलीकडील लांबच्या अशा प्रांतांत तयार झालेलें असें हें फुलझाड त्यांनीं माझ्यासाठीं आणलें होतें. या थोड्याशा लहान पानांखालून पुष्पांचा असा कांहीं धोत सुरू झाला कीं, त्यामुळें सौंदर्याचें पात्र कलंडून त्यांतून सौंदर्य वाहत आहे कीं काय असा भास होऊं लागला. आम्हीं दोघांनीं मिळून तें येथें ह्या खिडकीवर टांगून ठेवण्याचें ठरविलें. त्याला तेव्हांच काय तीं एकदां फुलें आलीं; आणि आम्हांला आपली एकसारखी आशा लागून राहिली आहे कीं, त्याला

पुन्हां एकदां तरी फुलें यावीं. चमत्काराची गोष्ट ही कीं, संवयीमुळें मी त्याला हल्लीं सुद्धां पाणी घालीत असतें आणि तें अद्याप हिरवें आहे.

आज चार वर्षें झालीं; मीं माझ्या पतींचा फोटोग्राफ हस्तिदंताच्या चौकटींत बसवून घेतला आणि तो तेथें त्या कोनाड्यांत ठेवून दिला. माझी दृष्टि तिकडे गेलीच तर मला हल्लीं खालीं बघावें लागतें. गेल्या आठवड्यापर्यंत मी नियमानें सकाळीं स्नान झाल्यावर त्याची पूजा करून त्यावर फुलें वाहत असें. त्याबद्दल माझे पति माझ्यावर नेहमीं रागावत.

" ज्या उच्च स्थानाला मी पात्र नाहीं त्यावर तूं मला नेऊन ठेवतेस यामुळें मला लाज वाटते. " एक दिवस ते म्हणाले.

" छे ! कांहीं तरी ! "

" मला नुसती लाजच वाटून राहत नाहीं तर मत्सरही वाटतो. "

" ऐका तर खरें ! कोणाचा मत्सर वाटतो आपणांला ? "

" त्या बनावट अशा माझा ! तुझ्या या वर्तनावरून हें मात्र स्पष्ट दिसतें कीं, मी तुला अगदीं क्षुद्र वाटतों; आणि वरिष्ठत्वाचें नातें तुझ्यावर गाजवील अशा मनुष्याची तुला जरूरी आहे. आणि म्हणून तूं बनावट अशा माझा--माझ्या प्रतिमेचा--आश्रय करून आपली हौस पुरवून घेतेस. "

" या आपल्या बोलण्यानें मला राग मात्र येतो. " मीं म्हटलें.

" माझ्यावर रागावून काय उपयोग ? " त्यांनीं उत्तर दिलें.

“ आपल्या नशिबाला दोष दे. त्यानें तुला निवड करण्यास संधि दिली नाहीं. डोळे बांधून माझा स्वीकार करावयास लावलें. त्याचमुळें तूं त्याची ही चूक दुरुस्त करण्याचा एकसारखा प्रयत्न करतेस आणि माझें हें असें नसतें स्तोम प्रतिमारूपानें माजवीत असतेस. ”

या कल्पनेनें मला इतकें दुःख झालें कीं, त्या दिवशीं माझ्या नेत्रांत अश्रू उभे राहिले. आणि त्यासंबंधीं विचार मनांत आला रे आला कीं, माझी दृष्टि त्या कोनाड्याकडे कांहीं केल्या जातच नाहीं.

कारण आतां माझ्या रत्नमय चौकटींत दुसरा एक फोटोग्राफ आहे. परवां एक दिवस मी आमच्या बैठकीच्या दिवाणखान्यांत व्यवस्था लावीत होतें त्यावेळीं तेथून ती दुहेरी फोटोची चौकट आणली. तिकडच्या फोटोशेजारीं तिच्यांतच संदीपबाबूंचा फोटो आहे. या प्रतिमेची पूजा करतांना वाहण्यास मजजवळ फुलें नाहींत; परंतु ती माझ्या रत्नांखालीं झांकून गेली आहे. गुप्त ठेवल्यामुळें तिच्यांत जास्तच आकर्षकता आली आहे. दारें लावून मी मधून मधून वारंवार तिच्याकडे पाहतें. रात्रीची मी दिवा लावतें आणि ती हातांत घेऊन तिच्याकडे एकसारखी टक लावून पाहतच राहतें. प्रत्येक रात्रीं ती दिव्यावर जाळून टाकून तिची कायमची वाट लावावी असें माझ्या मनांत येतें. परंतु प्रत्येक रात्रीं मी एक उसासा टाकतें आणि तिला माझ्या मोत्यांत व रत्नांत गुरफटून ठेवतें.

अरेरे ! दुर्दैवी स्त्रिये ! तुला हीं रत्नें कोणीं दिलीं ? त्यांपैकीं प्रत्येकाच्या भोंवतीं प्रेमपूर्ण चुंबनांचीं कित्येक आवरणें बसलेलीं आहेत ! तींच चुंबनें, आलिंगनें, आज लज्जेनें तोंड फिरवीत आहेत नव्हे ? अगाई ! मी मेलें कां नाहीं ?

## प्रकरण आठवें

### संदीपची आत्मकथा

आज थोडे दिवस माझें मन एका प्रश्नानें ग्रस्त झालें आहे. मी माझें जीवित विमलेशीं कां गुंतूं देत आहें ? वाटेल त्या अडचणीनें अडणारा असा मी पाण्याबरोबर वाहत जाणारा एखादा लांकडाचा तुकडा आहें कीं काय ?

विमल मला हवीशी वाटूं लागली आहे याबद्दल मला खरी खोटी लज्जा वाटते अशांतला मुळींच भाग नाहीं. माझी ती किती तीव्रतेनें इच्छा करते तें अगदीं स्पष्ट आहे. आणि म्हणून तिला मी अगदीं हक्कानें माझी अशी समजतों. पिकलेलें फळ कांहीं आपल्या कुजूं लागणाऱ्या डेखाशींच जन्मभर संलग्न राहूं शकत नाहीं. त्याच्यांत जो हा सगळा मधुरपणा सांठविलेला आहे तो केवळ माझ्यासाठीं आहे; आपण होऊन माझ्या स्वाधीन होणें हेंच त्याच्या जन्माचें कारण आहे; तोच त्याचा खरा स्वभाव, त्याची खरी नीति आहे आणि म्हणून मीं तें तोडलें पाहिजे. त्याचा जन्म निरर्थक करणें मला

शोभणार नाहीं.

परंतु माझ्या मनाला त्रास होतो तो हा कीं, मी गुंतत चाललों आहें. सत्ता गाजविण्याकरितांच मी जन्माला आलों. माझा योग्य वारू जी जनता तिच्यावर आरूढ होऊन लगाम माझ्या हातांत, मुक्कामाचें ठिकाण फक्त मला माहीत, त्याच्या नशिबांत फक्त मार्गांतील कांटे आणि खांचखळगे, अशा प्रकारें त्याला दामटण्यासाठींच माझा जन्म झाला. हा वारू आतां दाराशीं खुरानें जमीन उकरीत, काय थोडें फार नशिबानें मिळेल तें तोंडानें चावीत आणि आकाशांत भरेल अशा आवाजानें खिंकाळत माझी वाट पाहत आहे. परंतु मी कोठें आहें ? आणि कशाच्या पाठीमागें लागलों आहें ? दिवसेंदिवस मी सोन्यासारखी संधि हातची गमावीत नाहीं काय ?

मला वाटत असे कीं, मी केवळ तुफानासारखा आहें; जोरानें वाहत असतांना कुसकरून फेंकलेल्या पुष्पांनीं माझा मार्ग भरला असला तरी त्यामुळें माझ्या मार्गांत अडथळा येणें शक्य नाहीं. पण हल्लीं मी आपला एका फुलाच्या भोंवतीं एखाद्या भुंग्यासारखा—माझा तुफानीपणा कोठेंच पळाला—गिरक्या खातों आहें. शेवटीं मी म्हणत असें तेंच खरें. मनुष्य आपल्या कल्पनांना जो भपकेबाज रंग देतो तो केवळ बाह्य आणि तात्पुरता होय; आंत मनुष्य अगदीं सामान्य मनुष्यासारखाच रहातो. ज्याला माझा स्वभाव अगदीं अंतरंगापासून समजलेला आहे असा एखादा कोणी माझें चरित्र

लिहील तर तो माझें चित्र त्या शुंभ पंचूसारखें किंवा खुद्द निखिलसारखेंच रेखाटील.

काल रात्रीं मी आपली रोजनिशी चाळीत होतों. मी नुकताच बी. ए. झालों होतों आणि तत्त्वज्ञान माझ्यांत जणूं उसळ्या मारमारून बाहेर येऊं पाहत होतें. त्या इतक्या लहान वयांत मीं प्रतिज्ञा केली होती कीं, स्वतःच्या कल्पनेचे असोत अथवा दुसऱ्याच्या कल्पनेचे असोत परंतु भ्रम म्हणून ठेवावयाचे नाहींत. आपलें जीवित अगदीं वास्तविकतेच्या—जडतेच्या—भक्कम पायावर उभारावयाचें. परंतु त्या दिवसापासून आजपर्यंत खरी गोष्ट काय घडली? माझ्या जीविताचा भक्कमपणा कोठेंसा आहे? खरें पाहिलें तर माझें जीवित म्हणजे एक जाळें झालें आहे; त्यांतील तंतु जरी प्रथमपासून सारखा एकच असला तरी जाळ्यांतली जास्त जागा छिद्रांनींच अडविली आहे आणि मी त्या छिद्रांशीं कितीही झगडलों तरी आपण पराजित झालों असें तीं कधींही कबूल करणार नाहींत. मी मारे त्या एकाच तंतूवरून जात असल्याबद्दल स्वतःची पाठ थोपटून घेत होतों. इतक्यांत मी थोडासा एका छिद्रांत अडकल्यासारखा झालों.

कारण हल्लीं मी थोडथोडा अनुतापाला वश होऊं लागलों आहें. मला एका वस्तूची जरूरी आहे; ती वस्तु ही येथें आहे; तेव्हां ती घेण्यास मला मुळींच हरकत नाहीं. अशी माझी निधडी आणि स्पष्ट वागण्याची पद्धत आहे. या पद्धतीप्रमाणें जे जोरानें वागतील त्यांचा अंतीं जय

झाल्याखेरीज राहणारच नाहीं. परंतु असला हा प्रवास सोप्या तऱ्हेनें पार पडावा हें देवांना आवडत नाहीं; आणि म्हणूनच प्रवाशाचें मन त्याच्या उद्दिष्टावरून उडविण्याकरितां त्याची दृष्टि आपल्या अश्रुपूर्ण धुक्यानें व्याप्त करण्यासाठीं सहानुभूति नांवाची एक अप्सरा ते पाठवितात.

विमला जाळ्यांत सांपडलेल्या हरिणीप्रमाणें धडपडत आहे हें मला दिसत आहे. तिच्या नेत्रांत किती करुणास्पद धास्ती भरलेली आहे ! आपल्या बंधनांशीं ओढाताण करून ती किती बुचकारली आहे ! या देखाव्यानें वास्तविक पाहतां पारध्याला अंतःकरणापासून आनंद झाला पाहिजे. मला तसा आनंद होतोही; पण माझ्या अंतःकरणांत थोडीशी अनुकंपाही उत्पन्न होते; आणि याच कारणास्तव अगदीं कांठावर उभा राहूनही मी अळं टळं करतों आणि गळ चटकन वर ओढण्यास कचरतों.

कित्येक क्षण असे आले होते कीं, त्या वेळीं मी तिच्यावर झांप टाकूं शकलों असतों; तिचा हात दाबूं शकलों असतों आणि तिला हृदयाशीं घट्ट धरून ठेवूं शकलों असतों; व या सर्वांस तिनें मुळींच विरोध केला नसता. ही सर्व गोष्ट मी जाणतों. परंतु ते क्षण मीं घालविले. 'अगदीं बहुतकरून' असें कंपमय स्वरूप ज्या गोष्टीला होतें, तिला मी 'सर्वस्वीं असेंच' अशा प्रकारचें स्वरूप देऊं शकलों नाहीं. आतां मला असें स्पष्ट दिसूं लागलें आहे कीं, माझ्या स्वभावांतील कांहीं प्रच्छन्न तत्त्वांनीं उघड उघड माझ्या विरुद्ध जाऊन माझ्या

मार्गांत विघ्नें उत्पन्न करण्यास प्रारंभ केला आहे.

ज्या रावणाला मी रामायणांतील वास्तविक नायक समजतों त्याची अगदीं अशीच स्थिति होऊन त्याला आपलें दुर्दैव भोगावें लागलें. त्यानें सीतेला अशोकवनांत ठेवली आणि तिच्या खुशीची तो वाट पाहत बसला; थेट आपल्या अंतःपुरांत त्यानें तिला नेलें नाहीं. त्याच्या स्वभावांतील ह्या कमकुवत स्थानामुळें सीताहरणाचा सर्व व्यूह निष्फळ झाला. दुसऱ्या एका प्रसंगीं त्यानें असाच हृदयाचा कमकुवतपणा दाखविला. आपल्या विश्वासघातकी भावाच्या वर्तणुकीकडे त्यानें दुर्लक्ष करून त्याच्यावर दया दाखविली. परंतु या सर्व मूर्खपणाचें फळ त्याला स्वतःच्या मृत्युरूपानें भोगावें लागलें.

अशा रीतीनें आयुष्यांतील अनिष्ट आपलेंसें करतें. सुरवातीला तें अगदीं क्षुद्र भासतें आणि एखाद्या अंधाऱ्या भुयारांत पडून रहातें. परंतु शेवटीं तें वर येऊन वरील सर्व बांधबांधणीला उलथून देतें. सगळ्यांत खरें दुःख हें कीं, आपण वास्तविक कशा प्रकारचे आहों हें मनुष्याला समजत नाहीं.

त्यानंतर आमचा एक निखिल आहे. तो किती जरी चिरचिरा असला, त्याला मी कितीही हंसलों, तरी तो माझा मित्र आहे ही कल्पना मला सोडीत नाहीं. प्रथम मीं त्याच्या दृष्टीकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं; परंतु अलीकडे मला याबद्दल लाज आणि दुःख वाटूं लागलें आहे. यामुळें त्याची दृष्टभेट न होईल तर बरें असें मला वाटूं लागलें

आहे; आणि म्हणून तो हजर असला कीं मला कसेंसेंच होतें.

हीं सर्व कमकुवतपणाचीं चिन्हें आहेत. चुकीची शक्यता कबूल केली रे केली कीं, चूक वास्तविक झालेली दृष्टीस पडते आणि गळचेपीस बसते. मग ती झालीच नाहीं अशी मनाची समजूत करून घेण्याचा कितीही प्रयत्न केला तरी तो व्यर्थ. निखिलला उघड उघड सांगावेंसें वाटतें कीं, असल्या गोष्टी घडतात त्यांजकडे वस्तुदृष्ट्या—मोठमोठीं सत्यें म्हणून—पाहिलें पाहिजे. आणि जी गोष्ट सत्य आहे ती दोन खऱ्या मित्रांच्या मध्यें येऊं नये !

मी खरोखर थोडा कमजोर झालों आहें यांत मुळींच संशय नाहीं. विमलला वश केली ती कांहीं कमजोरपणानें नव्हे. माझ्या निधड्या पुरुषत्वाच्या पूर्णशक्तीच्या ज्योतींतच तिनें आपले पंख जाळले. त्या ज्योतीचें तेज धुरामुळें कमी झालें कीं, लगेच ती गोंधळते आणि मागें घेते. मग तिच्या भावनांत पूर्ण क्रांति होते आणि माझ्या मानेभोंवतीं घातलेला हार काढून घ्यावा अशी तिला जबर इच्छा उत्पन्न होते; परंतु ती तिला कृतींत मात्र उतरवत नाहीं. मग ती आपले डोळे मिटते; हेतु हा कीं, तो हार आपल्या डोळ्यांआडच करावा !

परत फिरण्याचा मार्ग आतां आम्हां दोघांनाही पूर्णपणें बंद झाला आहे. आम्ही एकमेकांला नाडूं; एकमेकांचा तिरस्कार करूं लागूं; परंतु यापुढें आम्ही आतां स्वतंत्र होणें मात्र शक्य नाहीं !

## निखिलची आत्मकथा

## १

मला वाटतें कीं एक गोष्ट मला अगदीं आतां समजण्याच्या बेतांत आली आहे. मनुष्यानें स्त्रीपुरुषांच्या प्रेमाची ज्योत इतकी भडकविली आहे कीं, ती आतां आपली योग्य मर्यादा सोडून भलतीकडेच भडकली आहे; आणि आतां खुद्द मानुषता तरी शिल्लक राहावी म्हणून त्या ज्योतीला आपल्या कह्यांत आणण्याचे तो प्रयत्न करीत आहे, तरी त्यास मुळींच यश येत नाहीं. मनुष्याच्या भक्तीनें त्याच्या विकारांना मूर्त देवतांचें स्वरूप प्राप्त करून दिलें आहे. परंतु त्या मूर्तींच्या पुढें आतां मनुष्ययज्ञ पुरे झाले असें माझें म्हणणें आहे. गीत आणि कथा, लाजणें आणि मुरकणें, हंसणें आणि रडणें, इत्यादि प्रकारांनीं त्या मूर्तींनें जी आपल्यावर मोहिनी टाकली आहे ती आतां दूर सारून आम्हीं मोकळें झालें पाहिजे.

आज सकाळीं मी माझ्या शय्यागृहांत एक पुस्तक आणण्याकरितां गेलों होतों. आज किती तरी दिवसांनीं मी तेथें दिवसा गेलों. प्रातःकाळच्या प्रकाशांत मीं तेथें सभोंवार पाहिलें तेव्हां माझ्या कपड्यांच्या मांडणीवर, नेसण्यासाठीं निऱ्या करून ठेवलेलें असें एक विमलेचें लुगडें लोंबत होतें. वेणीफणीच्या टेबलावर तिचे सुगंधी पदार्थ, तिची फणी आणि तिची शेंदराची पेटी होती. टेबलाखालीं तिचे बारीक सोनेरी वरकाम केलेले स्लिपर होते.

अगदीं पूर्वींची गोष्ट. त्यावेळीं अजून विमलेचा जोडे घालण्यासंबंधींचा विरोध नाहींसा झाला नव्हता. म्हणून तिला भुलविण्यासाठीं हे बूट मीं मुद्दाम लखनौहून आणले होते. अगदीं पहिल्यांदा ते घालून खोलींतून पडवीपर्यंत जातांना सुद्धां तिची लाजेनें किती मुरकुंडी वळे ! त्या वेळेपासून तिनें कित्येक बूट जोडे वापरले असतील; परंतु हा जोड तिनें अगदीं जपून ठेवला आहे. हे बूट तिला दाखवितेवेळीं मीं तिच्या एका संवयीसंबंधीं नापसंती व्यक्त केली. मी म्हणालों, " मी निजलों आहें असें समजून माझ्या पायाची धूळ घेतांना मीं तुला कित्येकदां पकडलें आहे. माझ्या जागृत देवीच्या पायाला धूळ मुळींच लागूं नये म्हणून मीं मोठ्या भक्तीनें हे तिला अर्पण केले आहेत. " ती रागावून म्हणाली, " गडे, असल्या गोष्टी आपण बोलूं नये; नाहींतर हे बूट मी मुळींच वापरणार नाहीं. "

हें माझें शय्यागृह. येथील वातावरण मोठें दगलबाज

असून तें माझ्या अगदीं हृदयाला भिडतें. माझ्या तृषित हृदयांतून बारीक बारीक मुळकुंड्या निघून येथील प्रत्येक ओळखीच्या वस्तूशीं कशा गुरफटत होत्या याची जाणीव स्पष्टपणें मला आजच्यासारखी कधींच झाली नव्हती. आज मला समजलें कीं, मुख्य मुळी तोडूनच केवळ मनुष्य संसारांतून मुक्त होत नाहीं. हे बारीकसे बूट सुद्धां मनुष्याला मागें खेंचून धरूं शकतात.

माझे डोळे एकाएकीं कोनाड्याकडे वळले. माझा फोटो तेथें होता; आणि त्याच्यावर वाहिलेलीं फुलें कुजून काळीं पडण्याच्या बेतांत आलीं होतीं, तरी सुद्धां तो अगदीं पहिल्यासारखाच दिसत होता. खोलींतील इतर सगळ्या वस्तूंपेक्षां या फुलांनीं केलेलें स्वागत मला जास्त कळकळीचें वाटतें. तीं काढून टाकण्याची कोणाला जरूरी सुद्धां वाटली नाहीं म्हणूनच तीं अद्याप येथें आहेत. हरकत नाहीं; सत्य, मग तें कशाही उग्र, विद्रूप आणि दुःखद स्वरूपांत पुढें आलें, तरी त्याचें स्वागत मला केलेंच पाहिजे. एवढेंच कीं, माझ्या फोटोग्राफाप्रमाणें मला त्याचें स्वागत विकाररहित मनानें कसें करतां येईल याचीच तयारी करण्याचा निश्चय केला पाहिजे.

मी तेथें उभा होतों तों मागच्या बाजूनें विमल आंत आली. मी झटकन कोनाड्यावरची दृष्टि काढून ती फळ्यावर लावली आणि गुणगुणलों, “ मी ‘एमिएल्स जर्नल’ न्यावयाला आलों होतों. ” आपण होऊन माझ्या येण्याचें कारण सांगण्याची मला काय गरज पडली होती ? मी अपराधी

आहें, मी आगांतुक आहें, माझ्यापासून दूर ठेवण्याजोगें असें रहस्य शोधण्याकरितां मी आलों आहें, असें मला वाटलें. मला विमलच्या तोंडाकडे पाहवेना. मीं तेथून पळ काढला.

२

माझ्या बाहेरच्या खोलींत बसून वाचण्याचा आव घालणें अगदीं कुचकामाचें होय; तसेंच कोणत्याही कामाकडे लक्षपूर्वक पाहून वेळ घालविणें माझ्या आवांक्याबाहेरचें झालें आहे. आणि यामुळें माझे भावी दिवस एक गट्ठा बनून माझ्या हृदयावर मोठें थोरलें दडपण पडणार हें मला अगदीं जेव्हां समजून चुकलें त्याच सुमारास माझ्या शेजारच्या जमीनदाराचें कूळ असणारा पंचू मजकडे आला. त्यानें बरोबर टोपलीभर नारळ आणले होते; ते मजपुढें ठेवून त्यानें मला लवून नमस्कार केला.

" कसें काय पंचू, बरें आहेना ? " मी म्हणालों; " आणि हें कशासाठीं ? "

माझी पंचूशीं ओळख गुरुजींमार्फत झाली होती. तो अत्यंत दरिद्री होता आणि त्याच्यासाठीं मला कांहीं करतां येण्याजोगेंही नव्हतें. तेव्हां ही भेट मजपासून थोडीफार मदत मिळवून या महिन्याची त्या महिन्यास गांठ घालण्याच्या उद्देशानें त्यानें आणली असावी अशी माझी समजूत झाली. मीं पिशवींतून थोडेसे पैसे काढले आणि ते त्याच्यापुढें केले.

परंतु तो दोन्ही हात जोडून मान हालवून म्हणाला, "मला हें घेतां येत नाहीं साहेब."

"कां बरें? काय हरकत आहे?"

"सगळें कांहीं उघडें हृदय करून सांगतों साहेब. मध्यें एकदां माझी अगदीं हलाखीची स्थिति झाली; घरांत कांहीं खावयाला नव्हतें. त्यावेळीं मीं आपल्या या बागेमधून थोडेसे नारळ चोरून नेले होते. मी म्हातारा होत चाललों आहें आणि केव्हां मरेन याचा नेम नाहीं. तेव्हां ते नारळ परत करण्याकरितां मी आलों आहें."

'एमिएल्स जर्नल' या पुस्तकानें कांहीं त्या दिवशीं माझी करमणूक केली नसती. परंतु पंचूच्या या शब्दांनीं माझें अंत:करण प्रस्फुरित आणि आनंदित झालें. स्त्री व पुरुष यांचा संयोग अथवा वियोग यापेक्षां खरोखर जगांत पुष्कळ गोष्टी आहेत. ही भव्य सृष्टि त्यापेक्षां फार दूरवर पसरलेली आहे. आणि मनुष्य तिच्यामध्यें उभा राहून त्यानें एकदां चोहोंकडे नजर फेंकली म्हणजे मग त्याला आपलीं सुखदु:खें नीट मोजतां येतात.

पंचूची माझ्या गुरुजींवर अकृत्रिम भक्ति होती. तो संसार कसा चालवतो हें मला चांगलें ठाऊक होतें. जेमतेम एक वेळची भाकरी मिळण्यापुरतें तो कसेंबसें कसें मिळवी हेंही मला माहीत होतें. तो दिशा फांकण्यापूर्वी उठतो आणि एका टोपलीमध्यें खावयाचीं पानें, तंबाखूच्या विड्या, रंगीत सूत आणि खेडवळ स्त्रियांना प्रिय असलेले बारीक सारीक—लहान

लहान फण्या, आरसे, अशा प्रकारचे-जिन्नस भरून, ती टोंपली डोक्यावर घेऊन या दलदलींतून गुडघा गुडघा चिखलांतून धडपडत नामशूद्र लोकांच्या वस्तींत जातो. तेथें तो ते जिन्नस देऊन तांदूळ घेतो आणि त्याला यामुळें त्यांच्या नाण्यांतील किंमतीपेक्षां थोडी जास्त प्राप्ति होते. तो जर लवकर परत आला तर कसाबसा एकदां घाईनें जेवण उरकतो आणि पुन्हां मिठाईवाल्याकडे जाऊन पुऱ्यांकरितां पीठ मळतो. तेथून परत आला कीं, तो लगेच शिंपांच्या बांगडया करावयास बसतो आणि मग कधीं कधीं मध्यरात्रीपर्यंतही तो जागत बसतो. हे इतके श्रम करूनहीं त्याला आणि त्याच्या कुटुंबाला वर्षांतून सहा महिने सुद्धां दोनदां धड जेवावयास मिळत नाहीं. जेवावयाचें म्हणजे प्रथम तो एक लोटाभर पाणी पितो आणि अत्यंत भिकार अशा धान्याची थोडीशी भाकरी खातो. आणि हें अशा पद्धताचें जेवण त्याच्या कुटुंबाला उभ्या वर्षांत रोज फक्त एक वेळच मिळतें.

एकदां माझ्या मनांत असें आलें कीं, त्याला कांहीं नियमित मदत करावी. परंतु माझे गुरुजी म्हणाले, "तुझ्या मदतीमुळें त्या मनुष्याचा मात्र नाश होईल. त्याच्या नशिबांतील हाल अपेष्टांचा कांहीं नाश होणार नाहीं. माता बंगालजवळ कांहीं हा एकटाच पंचू नाहीं. तिच्या स्तनांतीलच दूध जर आटून गेलें असेल तर मग त्याची वाण बाहेरच्या दुधानें भरून निघणें शक्य नाहीं."

हे प्रश्न असे आहेत कीं त्यामुळें मनुष्य थांबून विचार करूं

लागतो. निदान मीं तरी त्यांविषयीं विचार करून त्यांचा निकाल लावण्याचा निश्चय केला. त्याच दिवशीं मीं विमलला म्हटलें, "आपल्या देशांतील दुःखाचें मूळ काय आहे हें शोधण्यासाठीं आपण आपलें जीवित अर्पण करूं या."

थोडें स्मित करून ती म्हणाली, "आपण माझे राजकुमार सिद्धार्थ आहां हें मी जाणतें. परंतु आपल्या भावनांच्या ओघाबरोबर मला बिचारीला वाहवून नाहीं नेली म्हणजे बरें!"

"सिद्धार्थानें आपलीं व्रतें एकट्यानेंच पतकरलीं. परंतु आपण दोघांनीं मिळून हें व्रत स्वीकारावें अशी माझी इच्छा आहे."

ती कल्पना गप्पांमध्यें केव्हांच जिरून गेली. वास्तविक गोष्ट अशी आहे कीं, विमल अंतःकरणानें 'बाईसाहेब' आहे. तिच्या माहेरची मंडळी कांहीं विशेष श्रीमंत नसली तरी स्वतः ती जन्मतःच 'राणी' आहे. खालच्या वर्गाचीं दुःखें आणि अडचणी मोजण्याचें माप नेहमीं हलकें–लहानच–असावयाचें याबद्दल तिच्या मनांत मुळींच संशय नाहीं. कमतरता ही त्यांच्या जीवितांतील शाश्वत खूण आहे; परंतु त्यांना ती कमतरता भासतेच असें मात्र नाहीं. त्यांच्या क्षुद्रपणानेंच त्यांचें संरक्षण होतें. एवढ्या मोठ्या नदीला लहानसे कांठ बंधारा घालीत नाहींत काय? तिचें पात्र रुंद केलें तर चिखल मात्र उघडा पडतो!

वास्तविक अशी गोष्ट आहे कीं विमल नुसती माझ्या गृहांत आली आहे. माझ्या जीवितांत तिचा प्रवेश झालेला नाहीं.

## प्रकरण दहावें

## विमलेची आत्मकथा

### १

माझ्या अंतरंगांत ज्या गोष्टीचें काहूर माजलें होतें ती केवळ देशामध्यें या टोंकापासून त्या टोंकापर्यंत ज्या तुफानाचा उद्भव झालेला होता त्याचेंच एक विशिष्ट स्वरूप होती. माझ्या नशिबाचीं सूत्रें ज्याच्या हातांत आहेत त्याचा रथ वेगानें जवळ येत होता आणि त्या रथाच्या चाकांच्या आवाजानें माझें सर्व शरीर प्रतिध्वनित होत होतें. मला आपलें एकसारखें वाटे कीं, ज्याची जबाबदारी मजवर मुळींच नाहीं--ज्याचें कर्तृत्व मजकडे मुळींच येत नाहीं--असें कांहीं तरी असामान्य केव्हां कोणत्या क्षणीं घडेल कोणास ठाऊक ! चांगलें आणि वाईट, अथवा दुसऱ्यांच्या भावना, यांचा ज्या ठिकाणीं विचार करावा लागतो त्या पातळीपेक्षां मी वर चढलें नव्हतें काय ? असें व्हावें अशी मीं कधीं तरी इच्छा

केली होती काय ? अशा तऱ्हेची गोष्ट घडणार म्हणून कधीं मी प्रतीक्षा करीत बसलें होतें काय ? माझ्या गत आयुष्याकडे पाहा आणि मग या स्थितीला येण्यास मी स्वत: मुळीं तरी निमित्त झालें होतें कीं काय याचा विचार करा.

माझ्या सर्व गत आयुष्यामध्यें माझी भक्ति व आराधना सुसंगत होती. परंतु जेव्हां वरप्रदानाची वेळ आली तेव्हां अगदीं निराळाच देव पुढें उभा राहिला. आणि ज्याप्रमाणें आमचा आतांच जागृत झालेला देश आपल्या अप्राप्त उज्ज्वल भविष्यकाळाचें ' वंदे मातरम्' या जयघोषानें थरारून जाऊन स्वागत करीत आहे त्याचप्रमाणें ज्याच्याविषयीं मनांत आजपर्यंत यत्किंचित्‌ही विचार नव्हता, जो आजपर्यंत अगदीं अज्ञात होता, अशा या आग्रही अभ्यागताचें स्वागत माझ्या सर्व नाड्या, शिरा, धडाडीनें करीत आहेत.

एके दिवशीं रात्रीं मी अंथरुणावरून उठलें आणि कोणाला न कळत उघड्या गच्चीवर गेलें. आमच्या बागेच्या कुंपणापलीकडे नुकत्याच पिकावयास लागलेल्या भातांचीं शेतें आहेत. दक्षिणेकडच्या खेड्यांतील आंबरायांमधील मोकळ्या जागांतून नदीचें अंधुक दर्शन होत होतें. हा देखावा पाहून भावी सृष्टीचा अंधारांत निजलेला हा गर्भपिंडच आहे असें मला वाटलें.

त्या भावी सृष्टींत मला असें दिसलें कीं, माझा देश माझ्या सारखीच एक स्त्री असून ती कोणाची तरी वाट पाहत उभी आहे. कांहीं तरी अज्ञात अशा गोष्टीच्या आकस्मिक

हांकेसरशी ती आपल्या घराचा कोंपरा सोडून उत्सुकतने बाहेर आली आहे. थांबावयाला, विचार करावयाला अथवा मार्ग पाहण्यासाठीं दिवा लावण्यास तिला वेळ मिळाला नाहीं. ती तशीच तडक बाहेर घुसलेली आहे. तिला लांबून वेणुनिनादाप्रमाणें हांका येत होत्या तिकडे तिचा सर्व आत्मा आकर्षला जात होता हें मीं जाणलें. त्या निनादासरसा तिचा उरोभाग कसा खालींवर होत होता, आपण त्या आवाजाच्या अगदीं जवळ आहोंत असा तिला कसा भास होत होता, तो आतां अगदीं आपल्या आधीन झाला असून आतां आपल्याला डोळे बांधून वाटेल तिकडे धांवण्यास हरकत नाहीं असें तिला कसें वाटत होतें, हेंही मला समजलें. तिचें मातृत्व नष्ट झालें होतें. बाळांनीं क्षुधित होऊन मारलेल्या हांका तिला ऐकूं येत नव्हत्या; संध्यासमयीं दिवे लावावयाला तिला गृह राहिलें नव्हतें; तिला घरगुती काम मुळींच नव्हतें. छे! ती संकेतस्थानीं जाण्यासाठीं त्वरा करीत होती. कारण हा वैष्णव कवींची भूमि आहे. तिनें गृह सोडलेलें होतें; घरगुती कामांना ती विसरली होती. तिच्याजवळ आतां फक्त एक गाढ उत्कंठा शिल्लक राहिली होती; आणि तिच्याबरोबर ती धांवत होती. मग मार्ग कोठचा, जावयाचें कोठें, याची तिला मुळींच क्षिति राहिली नव्हती!

मला सुद्धां असल्याच एका उत्कंठेनें घेरलें आहे. माझें सुद्धां गृह असेंच हरवलें आहे व माझा मार्गही असाच चुकला आहे. ध्येय आणि मार्ग दोन्हीही माझ्या दृष्टीला सारखींच

अस्पष्ट झालीं आहेत. माझ्याजवळ फक्त ती एक उत्कंठा शिल्लक आहे व दुसरी तिजबरोबरची धांवपळ शिल्लक आहे. हे दुर्भाग्ये नीचाचरणी ! प्रभात आरक्त झाला म्हणजे मग परत फिरण्याचा मार्ग तुला दिसणार नाहीं. परंतु परत फिरण्याचें काय कारण ? मृत्यूनें सुद्धां काम भागेल. ज्या अंधारानें हा वेणुनिनाद केला तो अंधार जर शेवटीं नाशच करणार असेल तर परजन्माची काळजी कशाला करा ? नाशाच्या काळोखींत मी एकदां मग्न झालें म्हणजे मी अथवा चांगलें वाईट, हास्य अथवा अश्रु, यांपैकीं कांहींच शिल्लक राहणार नाहीं.

२

बंगालमध्यें एकाएकीं कालयंत्र इतक्या जोरानें आणि पूर्ण वेगानें फिरविलें गेलें कीं, कठिण गोष्टी एकदम सोप्या झाल्या आणि एकामागून एक त्या भराभर घडूनही आल्या. कोणतीही गोष्ट कोठेंच, आमच्या इस्टेटीच्या भागांत सुद्धां, मागें म्हणून ठेवली जाईना. प्रथम प्रथम आमचा जिल्हा मागासलेला होता; कारण खेडेगांवच्या रहिवाशांवर बाह्य वजन वालण्याचें माझ्या पतींच्या मनांत नव्हतें. ते म्हणत कीं, "जे खरोखर केवळ देशासाठीं त्याग करतात ते खरे देशसेवक होत. परंतु जे देशाच्या नांवाखालीं दुसऱ्याला तसें करण्यास भाग पाडतात ते देशाचे शत्रु होत. स्वातंत्र्याचें शिखर गांठण्यासाठीं ते

स्वातंत्र्याचें मूळच तोडण्यास कचरत नाहींत."

परंतु संदीपबाबू जेव्हां येथें येऊन राहिले व त्यांचे अनुचर सर्व प्रांतभर गांवांतून आणि बाजाराच्या जागांवरून व्याख्यानें देत इकडे तिकडे हिंडूं लागले तेव्हां खळबळीच्या लाटा आमच्यापर्यंत सुद्धां येऊन थडकल्या. आमच्या प्रदेशांतील कांहीं तरुणांची टोळी त्यांच्या स्वामित्वाखालीं राहण्यास कबूल झाली; यांपैकीं कित्येक तरुण आपआपल्या गांवाला छळवादी आणि अपमानास्पद होऊन बसलेले असे होते. परंतु आपल्या खऱ्या उत्साहाच्या ज्योतीनें ते अंतर्बाह्य सारखेच प्रकाशित झाले. मोठ्या आनंदाचे आणि आशेचे पवित्र वायुप्रवाह सर्व प्रदेशावरून वाहतात त्यावेळीं सगळी कुजकीनासकी घाण पार नाहींशी होऊन जिकडे तिकडे स्वच्छ होतें हें त्यावरून अगदीं स्पष्ट दिसून आलें. खरोखरच देश जेव्हां उदासीनपणा आणि खिन्नता यांच्या तावडींत सांपडलेला असतो अशा वेळीं त्यांतील पुरुष मोकळ्या मनाचे, सद्वर्तनी आणि निरोगी कसे होणार ?

मग मात्र सगळ्या लोकांचे डोळे माझ्या पतींकडे वळले; कारण आमच्याच इस्टेटींतून फक्त अद्याप विलायती साखर, मीठ आणि कापड यांची हकालपट्टी झाली नव्हती. इस्टेटींतील नोकरांना सुद्धां या गोष्टीबद्दल कसेंसेंच वाटून लाज वाटूं लागली. आणि असें असूनही कांहीं दिवसांपूर्वीं जेव्हां माझ्या पतींना आपल्या देशांतच तयार झालेल्या वस्तु आमच्या गांवांत आणण्याचा प्रयत्न केला तेव्हां वृद्ध आणि तरुण

या सर्वांनीं त्यांची पाठीमागें आणि समोर सारखीच मूर्ख अशी चेष्टा केली होती. जेव्हां स्वदेशी म्हणजे एक फुशारकीची गोष्ट झाली नव्हती तेव्हां तिचा ते अगदीं मनापासून तिरस्कार करीत असत.

माझे पति अजूनही हिंदुस्तानांत तयार झालेल्या शिसपेन्सिली हिंदुस्तानांत तयार झालेल्या चाकूनेंच ताशीत असतात. त्यांचें लिहिणें अद्यापही बोरूच्या लेखणीनेंच होतें. पाणी ते पितळेच्या फुलपात्रांतूनच पितात आणि रात्रीं काम करावयाचें असलें म्हणजे जुन्या पद्धतीच्या एका गोड्या तेलाच्या दिव्याशींच बसतात. त्यांची ही उदास आणि दूध-पाणी-मिश्रित स्वदेशी आम्हांला कधींच पटत नसे. उलट त्यांच्या भेटीच्या खोलींतील बेढब आणि लोकरीतिबाह्य सामानसुमानाची आम्हांला लाजच वाटे; एखादा मॅजिस्ट्रेट अगर युरोपियन गृहस्थ भेटीस आला म्हणजे तर त्याबद्दल आम्हांला विशेषच लाज वाटे.

माझ्या नापसंतीकडे ते कानाडोळा करीत असत. मला हंसून ते म्हणत, “ या असल्या क्षुद्र गोष्टी तूं मनाला कां लावून घेतेस ? ”

“ आम्ही रानटी आहों, निदान आम्हांला शिष्टाचारसंपन्नतेची ओळखच नाहीं, असें लोकांना वाटेल. ”

“ असें त्यांना वाटलें तर मी मनाशीं म्हणेन कीं, त्यांची शिष्टाचारसंपन्नता त्यांच्या पांढऱ्या कातडीच्या आंत कांहीं शिरूं शकत नाहीं व अशा रीतीनें मी त्यांच्या त्या वाटण्याला

उत्तर देईन."

त्यांच्या लिहिण्याच्या टेबलावर एक साधें पितळेचें भांडें होतें त्याचा ते पुष्पपात्राप्रमाणें उपयोग करीत असत. कित्येकदां असें झालेलें आहे कीं, एखादा युरोपियन पाहुणा त्यांच्या भेटीस येणार आहे असें कळलें कीं, मी हळूच न कळत खोलींत जाऊन त्या पितळेच्या भांड्याऐवजीं टेबलावर कांचेचें पुष्पपात्र नेऊन ठेवीत असें.

शेवटीं एकदां त्यांचेकडून मला हरकत झाली. त्यांनीं म्हटलें कीं, "हें पहा विमल, हीं फुलें जितकीं अजाण आहेत तितकेंच हें पितळेचें भांडें अजाण आहे; परंतु हें कांचपात्र आपलें अस्तित्व इतक्या भपक्यानें आणि जोरानें जाहीर करतें कीं, तें फक्त कृत्रिम फुलांच्याच उपयोगाचें आहे."

माझी धाकटी जाऊ—दुसरी राणी—मात्र त्यांच्या लहरींना प्रोत्साहन देत असे. एकदां ती धांपा टाकीतच येऊन म्हणाली, "भावोजी, ऐकलेंत का? किती सुंदर हिंदी साबण बाहेर पडले आहेत! माझे ऐश्वर्योपभोगाचे दिवस आतां निघून गेले आहेत. तरी पण त्या साबणांत जर चरबी नसेल तर कांहींचा उपयोग करून पाहण्याची माझी इच्छा आहे—"

अशा तऱ्हेची गोष्ट घडली कीं त्यांचा चेहरा कसा आरक्त होतो आणि मग सगळें घर हिंदी अत्तरांनीं आणि साबणांनीं कसें भरून जातें! काय पण साबू! त्यांना कॉस्टिक सोड्याचे केवळ गोळे म्हटलें तर जास्त शोभेल! आणि मला

पक्कें ठाऊक आहे कीं, माझी जाऊ वापरते ते पूर्वीच घेतलेले युरोपियन साबू असून हे देशी साबू कपडे धुण्याकरितां दासींच्या हातांत पडतात.

पुन्हां एखादे वेळेस माझी धाकटी जाऊ म्हणते, " भावोजी, तेवढे ते नवीन हिंदी टांक आणा हो. "

तिचे भावोजी नेहमींप्रमाणें प्रफुल्लित होतात व मग 'स्वदेशी टांक' या नांवाच्या सर्व प्रकारच्या काटक्यांनीं माझ्या धाकट्या जावेची खोली चित्रित होते. त्यामुळें तिच्या जीवितांत फरक पडतो असें मुळींच नाहीं; कारण वाचन आणि लेखन हें तिच्या मार्गांत नव्हतें. तरी पण तिच्या लिहिण्याच्या खणांत तो जुना पूर्वींचा हस्तिदंती टांकच आहे; आणि तिनें कधीं हात लावला तर तो त्यालाच लागतो.

यांतली खरी मख्खी ही आहे कीं, त्यांच्या या असल्या लहरींत मी सामील होत नसें यासाठीं मला टोमणे म्हणून ती हें सर्व करीत असे. माझ्या धाकट्या जावेजवळ कळकळ मुळींच नव्हती असें दाखवून कांहीं फायदा नव्हता; कारण त्या विषयाला नुसता आरंभ करतांच माझ्या पतींचे डोळे केवढाले होत ! असल्या लोकांना कोणीं फसवूं नये म्हणून प्रयत्न करूं गेल्यास स्वतःच भानगडींत पडण्याची वेळ येते !

माझ्या धाकट्या जावेला शिवणेंटिपणें आवडतें. एक दिवस मला अगदीं राहवेचना; मी तोंडांतल्या तोंडांत म्हणालें, " किती ढोंगी आहां बाई तुम्ही ! तुमचे भावोजी हजर असले म्हणजे स्वदेशी कात्रीचें नुसतें नांव काढतांक्षणींच

तुमच्या तोंडाला पाणी सुटतें. परंतु तुम्ही शिवावयाला बसतां तेव्हां पाहतें तों तुमच्या हातांत इंग्रजी कात्रीच असते."

"काय हरकत आहे?" त्यांनीं उत्तर दिलें. "माझ्या तशा वर्तणुकीमुळें त्यांना किती आनंद होतो तुम्ही नाहीं पाहत? ते लहान मूल होते तेव्हांपासून आम्ही या घरांत एकत्र वाढलों आहों. त्यांच्या तोंडावरून हास्य नाहींसें झालें कीं, तें मला तुमच्यासारखें कांहीं केल्या सहन होत नाहीं. काय करतील बिचारे! त्यांना त्या दुकानदारीखेरीज सुखाचें स्थानच नाहीं! तुमच्याकरितां ते केवळ हपापलेले असतात; पण तुम्हीच शेवटीं त्यांच्या नाशास कारणीभूत होणार आहां."

"तुम्ही कांहीं म्हणालांत तरी दुतोंडेपणा कांहीं चांगला नाहीं." मीं टोमणा दिला.

माझ्याकडे पाहून माझी जाऊ पोटभर हंसली. "धाकट्या राणीसाहेब, तुम्ही अगदीं निष्कपट, शाळामास्तराच्या रुळाप्रमाणें अगदीं सरळ, आहां नाहीं? परंतु स्त्रीची रचनाच त्या प्रकारची नाहीं. ती मऊ आणि लवचीक आहे व म्हणूनच वांकडी झाल्याशिवाय ती वांकू शकते."

"तुम्ही त्यांच्या सुखांतील कांटा आहां, आणि शेवटीं त्यांच्या नाशास कारणीभूत होणार आहां" हे शब्द मी विसरूं शकलें नाहीं. आज मला त्यांचें सत्यत्व पटत आहे; पुरुषाला धुंदीची जरूर असेल तर ती स्त्रीची तरी नसावी.

३

आमच्या इस्टेटींतील 'सुक्सार' हें जिल्ह्यांतील व्यापाराचें सर्वांत मोठें केंद्र आहे. तेथेंच एक पाण्याचा पट्टा आहे. त्याच्या एका बाजूला रोजचा बाजार भरतो आणि पलीकडच्या बाजूला आठवड्याच्या बाजाराची जागा आहे. पावसाळ्यांत जेव्हां हा पट्टा नदीशीं संलग्न होतो आणि बोटी अगदीं थेट वरपर्यंत येऊं लागतात तेव्हां पुढच्या हिंवाळ्यासाठीं म्हणून कापसाच्या कापडाचे गठ्ठे व लोंकरीच्या वस्तु त्या ठिकाणीं पुष्कळ विक्रीस येतात.

आमच्या उत्साहाच्या भरांत संदीपबाबूंनीं आज्ञा केली कीं, "आमच्या प्रदेशांतून सर्व परदेशी वस्तु आणि त्याचबरोबर परदेशी वर्चस्व पार घालवून टाकलें पाहिजे."

"अगदीं अवश्य" असें म्हणून मी जणुं काय झगडण्यासाठीं सज्ज होऊं लागलें.

संदीपबाबू म्हणाले, "निखिलजवळ मीं या बाबतींत गोष्ट काढली होती. व्याख्यानांना त्याची हरकत नाहीं. परंतु जबरदस्तीला त्याची बिलकूल संमति नाहीं."

सामर्थ्याची मोठी जाणीव दाखवून मीं ताठ्यानें म्हटलें, "मी बघून घेईन तें." मजवरील तिकडचें प्रेम किती गाढ होतें हें मी जाणत होतें. मी जर शुद्धीवर असतें तर आपले राई एवढाले तुकडे झाले तरी हरकत नाहीं परंतु त्यांच्या

प्रेमावर ही धोंड घालूं नये असेंच मला वाटलें असतें. पण संदीपबाबूंना मला आपली शक्ति दाखवून चकित करावयाचें होतें ना ?

सृष्टीची शक्ति प्रत्येक मनुष्याला कांहीं ना कांहीं विशेष संबंधानें कशी दृश्य होते हें संदीपबाबूंनीं आपल्या अमोघ पद्धतीनें मला पटवून दिलें होतें. आणि त्यांचे दृष्टांत ऐकून मी केवळ साधी विमला आहें हें मी विसरून गेलें होतें. मी शक्ति बनलें होतें, त्याचप्रमाणें सार्वत्रिक आनंदाची मी दृश्य मूर्ति झालें. मला कशाचेंही बंधन नव्हतें; मला कांहींही अशक्य नव्हतें. मी ज्याला स्पर्श करीन त्याला नवीन जीवित प्राप्त होणार ! माझ्या सभोंवतालचें जग ही माझीच नूतन सृष्टि होती. कारण, पहा; माझ्या हृदयांतील समाधानाचा जोंपर्यंत स्पर्श झाला नव्हता तोंपर्यंत शरदृतूंतील या आकाशांत सोनेरी रंगाची विपुलता मुळींच नव्हती ! आणि हा वीर, हा देशाचा खरा सेवक, हा माझा भक्त, ही जळजळीत बुद्धि, ही देदीप्यमान शक्ति, ही तेजस्वी प्रतिभा, यांना सुद्धां प्रतिक्षणीं मीच घडवीत होतें. माझ्या दर्शनानें प्रत्येक वेळीं त्यांच्यामध्यें नवजीवनाचा कसा संचार होतो हें मीं पाहिलें नाहीं काय ?

परवां संदीपबाबूंनीं आपल्या एका उत्कट तरुण शिष्याचें स्वागत करण्यास मला सांगितलें. एका क्षणांत मला त्याच्या नेत्रांतून निराळेंच तेज बाहेर पडूं लागलेलें दिसलें. त्याला शक्तीचें प्रत्यक्ष दर्शन झालें आणि माझ्या उत्पादक शक्तीचा

त्याच्या रक्तावर परिणाम होतोसें मला दिसून आलें. "काय तुमची जादूगिरी ही!" दुसऱ्या दिवशीं संदीपबाबू म्हणाले, "तो मुलगा आतां पूर्वींचा मुलगा राहिला नाहीं. त्याच्या जीविताची ज्योत आतां झगझगीत पेटूं लागली आहे. तुमच्याच घरांत तुमचें तेज कोण लपवूं शकणार? त्यांच्यापैकीं प्रत्येकाला त्या तेजाचा स्पर्श करविला पाहिजे केव्हां ना केव्हां तरी. आणि मग सर्वांच्या ज्योति नीट पेटल्यावर देशामध्यें आपणांला केवढी दिवाळी पाहावयास सांपडेल?"

माझ्या स्तुतीच्या तेजानें मी अंध झालें आणि माझ्या भक्ताला तो वर देण्याचें मीं कबूल केलें. मला अगदीं चढेलपणानें खात्री वाटत होती कीं मला काय हवें तें मजपासून कोणीही मागें ठेवूं शकणार नाहीं. संदीपबाबूंशीं बोलून मी आपल्या खोलींत गेलें आणि केस सोडून ते पुन्हां बांधले. मानेवर विंचरून सर्व केस एका ठिकाणीं गोळा करून त्यांचा अगदीं डोक्याच्या मध्यावर अंबाडा बांधण्यास मला मिस् गिल्बीनें शिकविलें होतें. केस वळविण्याची ही पद्धति माझ्या पतींची फार आवडती होती. एकदां त्यांनीं म्हटलें, "स्त्रीच्या मानेंत काय काय चमत्कार आहेत तें शोधून काढण्याचें काम कविकुलगुरु कालिदासाला सांगण्याच्या ऐवजीं भवितव्यतेनें तें माझ्या गळ्यांत टाकलें ही किती अप्रयोजक गोष्ट झाली! त्या कवीनें बहुधा मानेला फुलाच्या दांड्याची उपमा दिली असती. परंतु मला वाटतें ती एक मशाल असून ती तुझ्या दाट केसांचें अप्रतिम तेज पसरीत आहे."

असें बोलून त्यांनीं—पण कशाला ! त्या जुन्या गोष्टींची आठवण मी कशाला काढतें ! !

मीं त्यांना बोलावणें पाठवलें. पूर्वी चांगल्या वाईट अशा शेकडों युक्त्या त्यांना मजकडे आणण्यासाठीं मला सुचत असत. परंतु आज कित्येक दिवसांपासून हें सगळें बंद पडलें होतें. आतां हिकमतींची कला मजजवळून नष्ट झाली होती.

## प्रकरण अकरावें

## निखिलची आत्मकथा

### १

पंचूची बायको नुकतीच दीर्घक्षयानें वारली होती. स्वतःला पवित्र करण्यासाठीं व जातीला संतुष्ट करण्यासाठीं पंचूनें प्रायश्चित्तविधि करणें जरूर होतें. जमातीनें गणित करून त्याला कळविलें आहे कीं तूं २३५० रुपये खर्च केले पाहिजेस.

मी खूप संतापून म्हणालों, "किती विचित्र ! पंचू, तूं त्यांच्या म्हणण्यास मुळींच कबूल होऊं नको. काय करणार आहेत ते तुझें ?"

ओझ्यानें भारावून दमलेल्या पशूप्रमाणें झालेले आपले डोळे मजकडे वर करून तो म्हणाला, "साहेब, माझी मोठी मुलगी आहे, तिचें लग्न झालें पाहिजे. आणि माझ्या बिचाऱ्या बायकोचे प्रेतविधिही अजून उरकावयाचे आहेत."

मी मोठ्यानेंच गुणगुणलों, "पंचू, अगदीं तुझा गुन्हा

होता असें धरून चाललें तरी त्याबद्दल तुझ्या हातून भरपूर भरपाई झाली आहे."

"अगदीं खरें महाराज." तो निष्कपटपणें म्हणाला, "डाक्टरचे पैसे चुकविण्यासाठीं मला माझी कांहीं जमीन विकावी लागली आणि बाकीची गहाण टाकावी लागली. परंतु ब्राह्मणांना मीं जें दान द्यावयाला हवें आहे त्यांतून माझी सुटका होणें शक्य नाहीं."

वादविवाद करून काय उपयोग होणार होता? जे अशा प्रकारचीं दानें स्वीकारतात त्या ब्राह्मणांनाच त्याबद्दल प्रायश्चित्त घेण्याची कधीं वेळ येणार आहे कीं नाहीं हेंच मला कोडें पडलें.

पंचू आजपर्यंत उपासमारीच्या एका टोंकावर पाय कांपत उभा होता. त्याच्या बायकोचें आजारीपण आणि प्रेतसंस्कार यानंतर तो उपासमारीच्या अगदीं अत्यंत खोल अशा खड्ड्याच्या तळाशीं गेला. कांहींतरी तऱ्हेचें समाधान मिळविण्याचा शेवटचा नैराश्यपूर्ण प्रयत्न करीत असतां एका भटक्या बैराग्याच्या पायांशीं बसून राहण्याचें त्याला वेड लागलें. आणि घरीं आपलीं मुलें उपाशीं तडफडत आहेत हें विसरण्याइतकें तत्त्वज्ञान तो त्याच्यापाशीं शिकला. जग हें मिथ्या आहे आणि त्याच्यांत ज्याप्रमाणें सुख नाहीं त्याप्रमाणें दुःख हीही एक माया आहे, या कल्पनेंत तो कांहीं दिवस रमून गेला. मग शेवटीं त्यानें आपलीं लहानगीं मुलें त्या पडक्या झोंपडींत सोडून दिलीं आणि आपण स्वतः भटकण्यासाठीं

बाहेर पडला.

मला त्या वेळीं या विषयीं कांहीं वार्ता समजली नाहीं; कारण तेव्हां माझ्या स्वतःच्या मनांत देवदानवांचें समुद्रमंथन चालू होतें. आणि गुरुजी जरी घरांत एकटे होते व त्यांना सर्व दिवसभर पाठशाळेंत शिकवावें लागे तरी सुद्धां आपण पंचूचीं मुलें आपणांजवळ ठेवलीं असून त्यांचें आपण पालनपोषण करीत असतों याची दाद गुरुजींनींही मला लागूं दिली नाहीं.

एक महिन्यानें पंचू परत आला. त्याची साधुवृत्तीची तीव्रता बरीच नाहींशी झाली होती. त्याची मोठी मुलगी आणि मोठा मुलगा त्याजकडे चोरून जाऊन म्हणालीं, "बाबा, तुम्ही इतके दिवस कोठ होतां ?" त्याचा धाकटा मुलगा त्याच्या मांडीवर बसला व त्याच्या दुसऱ्या मुलीनें त्याच्या पाठीस विळखा घातला आणि तीं सर्व जण एकदम शोक करूं लागलीं. शेवटीं हुंदके देत देत पंचू माझ्या गुरुजींना म्हणाला, "साहेब, या लहानग्यांना पोटभर खावयाला देण्याचें सामर्थ्य माझ्या आंगांत नाहीं—त्यांच्यापासून पळून जाण्यासही मी मोकळा नाहीं. असें कोणतें पाप मीं केलें कीं ज्यामुळें मी गांजला गेलों आहे, हातांपायांनीं जखडला गेलों आहें !"

एवढ्या अवधींत पंचूच्या लहानशा व्यापाराचा धागा तुटला होता आणि तो पुन्हां सुरू करणें शक्य नाहीं असें त्याला आढळून आलें. तो माझ्या गुरुजींच्या घरांतच चिकटला आणि आपल्या घरीं परत जाण्याचें तो नांवही काढीना.

सरतेशेवटीं नाइलाज होऊन माझे गुरुजी म्हणाले, “ हें पहा पंचू, तूं जर आपल्या झोंपडीची मुळींच काळजी घेतली नाहींस तर ती अगदींच कोसळून जाईल. मी तुला थोडेसे कर्जाऊ पैसे देतों, ते घेऊन तूं आपलें फेरीवाल्याचें काम चालू कर आणि माझे पैसे हलके हलके फेड. ”

पंचूला हें ऐकून कांहीं मोठासा आनंद झाला नाहीं; उलट जगांत धर्म–दान–अशी कांहीं वस्तूच नाहीं कीं काय, असा त्याच्या मनांत विचार आला. आणि माझ्या गुरुजींनीं जेव्हां त्याच्याजवळ पैशांबद्दल प्रामिसरी नोट लिहून मागितली तेव्हां ही असली परतवाण मागणारी कृपा न केली तरी पुरविली असें त्याला वाटलें. बाहेरून बक्षीस देऊन आंतून उपकाराचें ओझें ठेवण्याची माझ्या गुरुजींची मुळींच इच्छा नव्हती. स्वाभिमान नष्ट करणें म्हणजे जातिवंतपणा नष्ट करणें होय अशी त्यांची कल्पना होती.

प्रामिसरी नोटीवर सही केल्यानंतर पंचूनें गुरुजींना नमस्कार केला त्यांत त्याचा गुरुजींविषयींचा आदर किती तरी कमी झालेला दिसून आला ! पायाची धूळ घेण्याची त्याची अजीबात राहून गेली. हें पाहून गुरुजी हंसले. शिष्टाचार याही पेक्षां कमी क्षुद्रता दाखविणारा असावा असेंच त्यांचें मत होतें. “ मान दिला आणि घेतला म्हणजे मनुष्यांमधील जमाखर्च शिल्लकबाकीविरहित असा होतो. परंतु श्रद्धा–आदरबुद्धि–व्यक्त करणें म्हणजे मात्र वाजवीपेक्षां जास्त देणें होय ” असें ते म्हणत.

पंचूनें बाजारांतून कापड विकत आणून तें खेडेगांवांत डोक्यावरून हिंडविण्यास सुरवात केली. त्याला नाणीं फारशीं मिळत नसत हें खरें, परंतु त्याला जें धान्य आणि इतर शेतांतील उत्पन्न कापडाच्या मोबदला मिळे तें सगळें त्याचा जमाखर्च मिळता करण्यांत जात असे. कर्जफेडीच्या दोन महिन्यांत त्यानें हप्त्याहप्त्यानें माझ्या गुरुजींचे पैसे फेडले आणि त्या बरोबर नमस्कार करतांना त्याची कंबर कमी वांकूं लागली. द्रव्यसंचयाच्या मोहांतून सुटून जाण्याइतका सुद्धां जो मनुष्य वरच्या पदवीला पोंचला नाहीं त्याला मोठा साधु साधु समजून आपण उगाच आदरीत होतों असें त्याला वाटलें असेल !

पंचू अशा तऱ्हेनें धंदा करीत असतांना स्वदेशीचा पक्का धक्का त्याला बसला.

२

सुटीचे दिवस होते. आमच्या गांवांतील आणि आसपासचे शाळाविद्यार्थी अथवा कॉलेजविद्यार्थी पुष्कळ आपआपल्या घरीं परत आले होते. ते संदीपच्या पुढारीपणाखालीं मोठ्या उत्साहानें गोळा झाले आणि त्यांच्यापैकीं कांहींनीं उत्साहातिरेकाच्या भरांत अभ्यासक्रमही कायमचे सोडून दिले. माझी येथें एक फुकट शाळा आहे त्यांतल्या विद्यार्थ्यांपैकीं यांत पुष्कळ मुलें होतीं आणि कांहीं मजकडून शिष्यवृत्त्या घेऊन कलकत्त्यास कॉलेजमध्यें शिकत होतीं. ते एकत्र होऊन

मजकडे भेटण्याकरितां आले आणि ‘तुमच्या सुक्सारच्या बाजारांतून तुम्हीं परदेशी माल बहिष्कृत करा’ अशी त्यांनीं मजजवळ मागणी केली.

मला हें करतां येणार नाहीं असें मीं त्यांना सांगितलें.

ते जरा वक्रोक्तीनें म्हणाले, “कां बरें महाराज? त्यामुळें होणारा तोटा आपल्याला सहन करवणार नाहीं काय?”

त्यांच्या स्वरांत जी तिरस्कारव्यंजकता स्पष्ट दिसून येत होती तिजकडे मुळींच लक्ष न देतां ‘तोटा माझा न होतां गरीब बिचाऱ्या दुकानदारांचा व त्यांच्या गिऱ्हाइकांचाच होईल,’ असें उत्तर मी देणार होतों, इतक्यांत गुरुजी जवळच होते ते मध्यें पडून म्हणाले,

“होय, बरोबर आहे; तोटा त्याचा होणार आहे; तुमचा कांहीं नाहीं हें तर अगदीं उघड आहे.”

“परंतु स्वतःच्या देशाकरितां—”

गुरुजी पुन्हां आड पडून म्हणाले, “देश म्हणजे कांहीं केवळ माती नाहीं. देश म्हणजे त्यांतील मनुष्यें हींच होत. आजपर्यंत त्या मनुष्यांची काय अवस्था होत आली आहे इकडे तुम्हीं पूर्वीं कधीं क्षणभर तरी दृष्टी टाकली आहे काय? परंतु आतां मात्र त्यांनीं कसलें मीठ खावें, कुठले कपडे वापरावे, या संबंधांत तुम्ही हुकूम गाजविणार! त्यांनीं असल्या जुलुमाला मान कां लववावी आणि आम्हीं तरी त्यांना कां लववूं द्यावी?”

“परंतु आम्ही स्वतः सुद्धां हिंदी मीठ, साखर आणि

कपडे यांचाच उपयोग करीत आहों. ”

“ आपला संक्षोभ कायम ठेवण्याकरितां व आपलें वेड कायम राखण्यासाठीं तुम्ही स्वतः काय पाहिजे तें करा. तुम्ही घरचे सुखी आहां. तुम्हांला किंमतीचा प्रश्न नाहीं. गरीब लोक कांहीं तुमच्या मार्गांत आड येणार नाहींत. परंतु त्यांनीं तुमच्या सक्तीला कबूल व्हावें असा हट्ट तुम्ही कां धरतां ? त्यांची स्थिति अशी आहे कीं, प्रत्येक क्षणीं त्यांना जेमतेम पोटापुरतें मिळविण्यासाठीं जीवापाड धडपड करावी लागत आहे. किंमतींत थोड्याशा पैशांचा फरक म्हणजे त्यांना केवढा भयंकर वाटेल याची तुम्हांला कल्पनाही यावयाची नाहीं, इतकें तुमच्यात्यांच्यांत जमीनअस्मानाचें अंतर आहे. तुम्हीं आपलें सर्व गत आयुष्य उच्च गृहांत घालविलें आहे आणि तुम्ही खालीं येऊन आपला संताप व्यक्त करण्यासाठीं त्यांना आपलीं हत्यारें–बाहुलीं–करूं पाहत आहां. मी याला भित्रेपणा–कमकुवतपणा– म्हणतों. ”

ते सर्व जण गुरुजींचे जुने शिष्य होते आणि संतापानें जरी ते अगदीं शिजत होते तरी गुरुजींचा उपमर्द करण्यास कोणीही धजेना. तेव्हां ते माझ्याकडे वळले. “ तर मग महाराज, देश जें मिळविण्याच्या मार्गांत आहे त्यांत तुम्ही एकटेच आडकाठी घालणार ना ? ”

“ असा कोण मी आहें कीं, मीं देशाच्या कार्याच्या आड यावें ! माझी तर त्यासाठीं जीवित सुद्धां सोडण्याची इच्छा आहे. ”

त्यांत एक एम.ए. चा विद्यार्थी होता. तो छद्मी हास्य करून म्हणाला, " तुम्ही खरोखर देशकार्याला मदत होईल असें हल्लीं काय करीत आहां असें मी नम्रपणें विचारतों. "

" हिंदी गिरण्यांत तयार झालेलें सूत आयात करून तें मीं माझ्या सुक्सार येथील बाजारांत विक्रीस ठेवलें आहे आणि इतर जमीनदारांकडेही कांहीं गठ्ठे पाठवले आहेत. "

तोच विद्यार्थी जरा ओरडून म्हणाला, " परंतु महाराज, आम्ही तुमच्या सुक्सार येथील बाजारांत गेलों होतों; तेथें तुम्ही म्हणतां तें सूत कोणीही विकत घेत नाहीं. "

" हा कांहीं माझा दोष नाहीं अथवा माझ्या बाजाराचाही दोष नाहीं. तुमची शपथ सर्व देशानें घेतली नाहीं एवढेंच त्यावरून दिसून येतें. "

" एवढेंच नव्हे, " गुरुजी माझें भाषण पुढें चालवून म्हणाले, " त्यावरून असेंही दिसतें कीं, तुम्हीं फक्त दुसऱ्यांना उपद्रव देण्याची दीक्षा घेतली आहे. ज्यांनीं तुमची शपथ घेतली नाहीं अशा कोष्टयांनीं त्याचें कापड विणून तयार केलें पाहिजे. ज्यांनीं तुमची शपथ घेतली नाहीं त्या व्यापाऱ्यांनीं सुद्धां तें कापड विकत घेतलें पाहिजे. ज्यांनीं तुमची शपथ घेतली नाहीं अशा गिऱ्हाइकांवर सुद्धां तेंच लादलें जावें ही तुमची इच्छा! आणि याला मार्ग?—तुमची दंगल आणि आरडाओरड व जमीनदारांचा जुलूम! आणि याचा परिणाम?—सगळा भलेपणा तुमच्या पदरांत आणि सर्व प्रकारची उपासमार गिऱ्हाइकांच्या पदरांत! "

एका सायन्स विद्यार्थ्यानें आणखी एक प्रश्न केला. तो म्हणाला, "महाराज, आम्हांला आणखी असें विचारावयाचें आहे कीं, स्वदेशीच्या कार्यांत आपण स्वतः अशी कोणती घस सोसली आहे ?"

गुरुजींनींच उत्तर दिलें; "तुम्हांला हें जाणण्याची इच्छा आहे काय ? ऐका तर. हिंदी गिरण्यांतील हें जें सूत बाजारांत आणलें आहे तें सगळें निखिलला स्वतः विकत घ्यावें लागतें. त्याचें कापड विणण्यासाठीं त्याला एक विणकामाची शाळा काढावी लागली आहे. आणि आजपर्यंतच्या त्याच्या धंद्याच्या पराक्रमावरून त्याचें कापसाचें कापड मागांवरून बाहेर पडल्यावर त्या कापडाला जरीच्या कापडाची किंमत पडेल इतकें तें महाग होईल. मग कदाचित त्यानें स्वतःच त्याचे पडदे करून दिवाणखान्यांत लावलेन तर; बाकी त्यामुळें तो झांकला जाणार नाहीं हें खास ! तुम्ही एकदां आपल्या शपथेला कंटाळलांत म्हणजे त्या पडद्यांकडे पाहून त्यांतील कलेच्या परिणतीला तुम्हीच मोठमोठ्यानें हंसाल आणि त्यांतील कारागिरी जर कधीं कोणाला आवडली तर ती विदेशीयांनाच आवडेल !"

आज लहानपणापासून मी गुरुजींनां ओळखतों; परंतु आजच्या इतके संतापलेले मीं त्यांना कधींच पाहिलें नव्हतें. माझ्यावरील त्यांच्या अतितर प्रेमामुळें त्यांच्या हृदयांत हें दुःख बरेच दिवस जमा होत असावें आणि म्हणून त्यांचा स्वतःवरील ताबा इतक्या गुप्तपणें नाहींसा होण्याच्या बेतांत

आला असावा.

एक वैद्यकीय विद्यार्थी म्हणाला, " आपण आमच्यापेक्षां मोठे आहां; तुमच्याशीं वाद घालीत बसणें आम्हांला शोभत नाहीं. परंतु परदेशी वस्तु आपल्या बाजारांतून घालवावयाच्या नाहींत असा तुमचा निश्चय झाला आहे कीं काय, हें कृपा करून आम्हांला एकदां शेवटचें सांगा. "

मी म्हणालों, " मी त्या वस्तूंना घालविणार नाहीं; कारण त्या माझ्या नाहींत. "

" त्यामळें तुम्हांला नुकसान पोंचेल म्हणून ! " असें बोलून एम. ए. च्या विद्यार्थ्यानें स्मित केलें.

" ज्याचें नुकसान होतें त्याला त्याची खरी जाणीव असते म्हणून ! " असा गुरुजींनीं टोला मारला.

'वंदे मातरम्'ची एक आरोळी ठोकून ते आमच्या येथून निघून गेले.

२

त्यानंतर कांहीं दिवसांनीं गुरुजी पंचूला घेऊन मजकडे आले. त्याच्या जमीनदारानें त्याला शंभर रुपये दंड केला असून शिवाय बाहेर हांकून देण्याची धमकीही दिलेली होती असें त्याच्या सांगण्यावरून दिसून आलें.

" कोणत्या अपराधामुळें ? " मीं विचारलें.

गुरुजी म्हणाले, " कारण असें सांगतात कीं, तो विलायती

कापड विकीत असतांना आढळला. मीं कर्ज काढून थोडेंसें कापड विकत घेतलें आहे, कसेंही करून तेवढें मला विकूं द्या, मग मी पुन्हां कधींही तसें करणार नाहीं असें प्रतिज्ञेवर सांगतों, अशा प्रकारें त्यानें अनेक तऱ्हांनीं आपल्या जमीनदाराच्या विनवण्या केल्या. परंतु जमीनदारानें त्याचें मुळींच कांहीं न ऐकतां तुला जर मुक्त व्हावयाचें असेल तर आतांच्या आतां तें कापड येथल्या येथें जाळून टाकलें पाहिजे असा हट्ट धरला. निराशेच्या भरांत पंचू तडफडत आणि बेपर्वाईनें म्हणाला, "माझ्याच्यानें हें होणार नाहीं. तुम्ही श्रीमंत आहां; तुम्हीच तेवढें विकत घेऊन मग जाळून कां टाकीत नाहीं ?" यामुळें जमीनदाराचा चेहरा मात्र लाल झाला आणि तो ओरडला, "या हरामखोराला कोणाशीं कसें वागावयाचें हें शिकविलें पाहिजे; जोड्यानें ठोका चांगला त्याला." अशा तऱ्हेनें बिचाऱ्या पंचूचा अपमानही झाला आणि त्याला दंडही भरावा लागला."

"आणि कापडाचें काय झालें ?"

"सगळा गठ्ठाच्या गठ्ठा जाळून टाकला."

"दुसरें कोण तेथें हजर होतें ?"

"पुष्कळ लोक हजर होते; ते सर्व जण 'वंदे मातरम्'चा घोष करीत होते. संदीपबाबू सुद्धां तेथें होते. थोडीशी राख हातांत घेऊन ते म्हणाले, "बांधव हो ! परदेशी व्यापाराच्या प्रेतविधीसाठीं ही तुम्हीं पहिलीच चिता पेटविलेली आहे. ही राख पवित्र आहे. स्वदेशीच्या शपथेच्या नांवानें तुम्ही ती

आपल्या आंगाला फांसा." "

मी पंचूकडे वळून म्हणालों, " पंचू, तूं कोर्टांत फिर्याद केली पाहिजेस."

"माझ्या वतीनें कोणीही साक्ष देणार नाहीं." त्यानें उत्तर दिलें.

"कोणीच साक्ष देणार नाहीं? संदीप, अरे संदीप! अरे संदीप!"

माझ्या हांकेवरून संदीप आपल्या खोलींतून बाहेर आला. "काय काम आहे?" त्यानें विचारलें.

"या मनुष्याचें कापड जाळलें त्या बाबतींत तूं साक्ष देणार नाहींस काय?"

संदीपनें स्मित केलें; "जरूर. मी त्या खटल्यांत जरूर साक्षीदार होईन. परंतु माझी साक्ष विरुद्ध बाजूनें होईल!"

" काय म्हणतोस तरी काय?" मी आश्चर्यानें उद्गारलों. "या बाजूनें अथवा त्या बाजूनें मी साक्ष देईन या तुझ्या म्हणण्याचा अर्थ तरी काय? तूं सत्याचा साक्षीदार होणार नाहींस काय?"

"जी गोष्ट घडते तेवढीच फक्त सत्य काय?"

"आणखी कसलीं दुसरीं सत्यें असणार बोवा त्यांत?"

"ज्या गोष्टी घडल्या पाहिजेत तीं? ज्या सत्याची आपणांस उभारणी करावयाची त्याच्या बांधकामांत असत्याचा पुष्कळच संबंध येणार. ज्यांनीं जगांत नांव काढलें आहे त्यांनीं सत्याचें उत्पादन केलें आहे; त्याच्यामागें ते नुसते

आंधळ्यासारख धांवले नाहींत."

" आणि म्हणून—"

" आणि म्हणून ज्याला तुम्ही लोक खोटी साक्ष म्हणतां ती मी देणार आहें. ज्यांनीं साम्राज्यें स्थापलीं, ज्यांनीं सामाजिक रचना केल्या, ज्यांनीं धार्मिक संस्था स्थापल्या, त्या सर्वांनीं हेंच केलें आहे. ज्यांना सत्ता उपभोगावयाची आहे ते सत्याची भीति बाळगीत नाहींत; त्यांच्या सत्तेखालीं जे सांपडतील त्यांच्यासाठीं सत्याचीं बंधनें आहेत. तूं इतिहास वाचलेला नाहींस काय? ज्या अफाट विस्तृत कढयांत मोठमोठ्या राजकीय उलाढाली शिजल्या त्यांतील मुख्य जिन्नस 'असत्य'च होतें ही गोष्ट तूं जाणत नाहींस काय?"

" राजकारणात्मक स्वयंपाक फार मोठ्या प्रमाणावर चालत आहे हें निःसंशय. परंतु—"

" हां! समजलों! तूं स्वतः तो स्वयंपाक बनविण्यास मुळींच मदत करणार नाहींस हें खरें. ज्यांच्या घशाखालीं शिजत असलेली खिचडी कोंबली जाते अशांपैकींच तुम्ही आपले एक होणार! ते बंगालची फाळणी करोत आणि आम्ही तुमच्या हिताकरितांच हें करतों असें म्हणोत; शिक्षणाचें द्वार ते बंद करोत आणि आम्ही शिक्षणाची इयत्ता वाढविण्याकरितां असें करतों असें म्हणोत; तुम्ही आपले शेवटपर्यंत 'चांगलीं मुलें'च होऊन सांदीकोपऱ्यांत धुसफुसत बसणार. परंतु त्याविरुद्ध असत्याचा संरक्षक तट उभारतां येतो कीं नाहीं इकडे आम्हां वाईट लोकांना लक्ष पुरविलेंच पाहिजे."

“ निखिल, या बाबतींत वादविवाद करून कांहीं फायदा नाहीं. ” गुरुजी मध्येंच म्हणाले. “ ज्यांना आपल्या अंतरंगांतील सत्यच जाणवत नाहीं, त्यांना हें सत्य अंधारांतून, सांदीकोपऱ्यांतून काढून बाहेर उजेडांत आणणें हा मनुष्याच्या जीविताचा हेतु आहे, बाह्य वस्तूंचें त्याच्यावर दडपण टाकणें हा नाहीं, हें समजून कसें यावें ? ”

संदीप मोठयानें हंसला. तो म्हणाला, “ अगदीं योग्य ! शाळामास्तराला अगदीं योग्य आणि बिनचूक असें भाषण ! मीं पुस्तकांत असलींच विधानें वाचलीं आहेत; परंतु वास्तविक सृष्टीमध्यें मात्र मला असें आढळून आलें आहे कीं, बाह्य वस्तूंचा संग्रह करणें हेंच मनुष्याचें महत्त्वाचें कार्य होय. या कलेंत जे निपुणतम आहेत ते आपल्या जाहिरातींतून मोठालीं असत्यें जाहीर करतात. आपल्या जाड टोंकाच्या लेखण्यांनीं आपल्या राजकारणाच्या जमाखर्चाच्या वह्यांत खोटेंच जमाखर्च लिहितात. आपलीं दैनिक वर्तमानपत्रें असत्यांनीं खच्चून भरून त्यांचा प्रसार करतात. आणि रोगजंतु जिकडे तिकडे नेणाऱ्या माशांप्रमाणें असत्याचें बीज सगळीकडे रुजविण्यासाठीं उपदेशक सर्वभर पाठवितात. या असल्या मोठया लोकांचा मी एक लहान अनुचर आहें. मी जेव्हां कांग्रेसपक्षांत होतों तेव्हां नव्वद भाग असत्यांत दहा भाग सत्य मिसळण्यास मी कधींच कचरत नसें. आणि आतां मीं तो पक्ष सोडला म्हणूनच केवळ मनुष्याचें ध्येय सत्य नसून यश आहे हें मी विसरलों असें मुळींच नव्हे. ”

" 'खरें' यश. " दुरुस्ती करण्याच्या उद्देशानें गुरुजी म्हणाले.

" असेल; " संदीप पुढें म्हणाला. " परंतु खऱ्या यशाचें फळ मिळवावयाचें असेल तर प्रथम असत्याच्या शेतांतच लागवड केली पाहिजे. जमीन छिन्नभिन्न करून तिची धूळ बनविली पाहिजे. सत्याला स्वतःच वाढूं दिलें तर तें झाडुरें अथवा कांट यांच्यासारखें वाढतें आणि त्याच्यापासून कांहीं फायदा होण्याची इच्छा फक्त जंतूंनाच राहते. " असें म्हणून तो ऐटीनें खोलींतून चालता झाला.

माझ्याकडे पाहून गुरुजींनीं स्मित केलें. ते म्हणाले, " निखिल, तूं लक्षांत ठेव कीं संदीप अधार्मिक नाहीं—मात्र त्याचा धर्म ह्मणजे सत्याच्या उलट बाजूचा धर्म आहे; त्याचा धर्म अमावास्येच्या चंद्राप्रमाणें आहे. त्या दिवशीं चंद्राचा प्रकाश भलतीकडेच गेला असला तरी त्याचा चंद्रपणा कांहीं नष्ट होत नाहीं. "

" आणि म्हणूनच आमचें कोणत्याही बाबतींत कधींही एक मत होत नाहीं तरी मी त्याच्यावर नेहमीं प्रेम करीत आलों आहें. आतां त्यानें माझ्या हृदयाला अत्यंत व्यथित केलें आहे आणि यापुढेंही तो व्यथित करील; तरी सुद्धां मला त्याचा तिरस्कार करवणार नाहीं. "

" असें मला हल्लीं दिसून येऊं लागलें आहे खरें. तूं त्याची वर्तणूक ही अशी कशी चालूं देतोस याचें मला आज पुष्कळ दिवस आश्चर्य वाटत होतें. कित्येक वेळां तर तूं

कमजोर आहेस असाही मला संशय आला. आतां मात्र मला कळून चुकलें कीं, तुम्हां दोघांचें यमक जुळत नसलें तरी तुमचा दोघांचा ताल–छंद–एकच आहे. "

त्यांचीच कल्पना पुढें चालवून मी म्हणालों, "दैवानें माझ्या बाबतींत निर्यमक वृत्तांत ' पॅराडाइज लॉस्ट ' लिहिण्याचा निश्चय केला आहे असें दिसतें; तेव्हां मला यमक जुळणाऱ्या मित्राची जरूरीच नाहीं ! "

" परंतु मग पंचूचें काय ? " गुरुजींनीं पहिल्या विषयास सुरवात केली.

" तुम्ही म्हणतां कीं, त्याचा जमीनदार त्याला त्याच्या आनुवंशिक मालकीहक्कावरून काढून टाकणार आहे. समजा, तो ज्या जमिनीचा मालक आहे ती मींच विकत घेतली आणि त्याला माझें कूळ केलें तर ? "

" आणि त्याचा दंड ? "

" तो माझें कूळ झाला म्हणजे मग त्या जमीनदाराला दंड कसा आणि कोठून वसूल करितां येईल ? "

" आणि त्याच्या जळलेल्या कापडाची वाट ? "

" मी त्याला दुसरा गठ्ठा घेऊन देईन. आपल्या इच्छेप्रमाणें व्यापार करीत असतां माझ्या कुळाच्या आड कोण कसा येतो तें तरी मला एकदां पाहिलें पाहिजे. "

पंचू मध्येंच म्हणाला, " साहेब, पण मला आपली अशी भीति वाटते कीं, तुम्ही अशी मोठी मंडळी भांडूं लागलां म्हणजे पोलीस आणि कायद्यांतील इतर गिधाडें सभोंवतालीं

मोठ्या आनंदानें जमतील आणि आजूबाजूची मंडळी सुद्धां तुमच्या झटापटीची गंमत पाहतील. परंतु युद्धाच्या शेवटीं जेव्हां कोणावर तरी मारलें जाण्याची पाळी येईल तेव्हां मात्र बिचाऱ्या माझ्या गरिबावर प्रसंग येईल!"

"कां बरें! तुझ्यावर कसलें संकट येईल?"

"ते माझें घरदार, मुलेंबाळें, सर्व कांहीं जाळून फस्त करतील."

"कांहीं हरकत नाहीं. मी तुझीं मुलें माझ्या ताब्यांत घेतों." गुरुजी म्हणाले. "तूं तुला वाटेल तो व्यापार कर; तुला कोणी हात लावूं शकणार नाहीं."

त्याच दिवशीं मीं पंचूकडील जमीन विकत घेतली आणि कायदेशीर कागदपत्र वगैरे केले. व तेव्हांपासूनच भानगडी उपस्थित होण्यास सुरवात झाली.

४

पंचू आपल्या आजाचा एकटाच जिवंत वारस होता; आणि म्हणून त्याला त्याची मिळकत प्राप्त झाली होती. सर्वांना ही गोष्ट माहीत होती. परंतु याच सुमारास एक चुलती आपल्या पेट्या आणि गाठोडीं, जपाची माळ व एक विधवा मुलगी, यांसह एकाएकीं उपस्थित झाली. तिनें पंचूच्या घरांत स्वतःचें ठाणें दिलें आणि त्याचें जें जें कांहीं म्हणून होतें त्याच्यांत आपला हिस्सा आहे असें ती म्हणूं

लागली.

पंचू मूढच होऊन गेला. “ माझी चुलती मरून कितीतरी दिवस झाले ” तो त्रासून म्हणाला.

उत्तरादाखल त्याला असें सांगण्यांत आलें कीं, तुला फक्त तुझ्या चुलत्याच्या पहिल्या बायकोची माहिती आहे आणि ती मेली हें तुझें म्हणणें बरोबर आहे. परंतु तुझ्या चुलत्यानें दुसरें लग्न केलें होतें.

“ परंतु माझा चुलता तर माझ्या चुलतीच्या आधीं वारला; ” पंचू चकित होऊन म्हणाला; “ तेव्हां दुसऱ्या बाईशीं लग्न करण्यास त्याला वेळ तरी कोठें होता ? ” तो आणखीच मूढ होऊन गेला.

या गोष्टीला कोणी नाकबूल गेलें नाहीं. परंतु त्याला विचारण्यांत आलें कीं, पहिली बायको मेल्यावरच तुझ्या चुलत्यानें दुसरें लग्न केलें असें कोणीं म्हटलें होतें ? त्यानें पहिली बायको हयात असतांनाच दुसरें लग्न केलें होतें. सवतीसोबत राहण्याचें न पटून आपला नवरा मरेपर्यंत ही बायको आपल्या बापाच्या घरींच राहिली. आणि नवरा मरण पावल्यावर सर्व धार्मिक विधि उरकून ती वृंदावन तीर्थास राहावयास गेली व ती आतां तेथून आली आहे. कुंडूच्या जमीनदाराला—पंचूच्या मागच्या धन्याला—आणि त्याच्या कांहीं कुळांना ही सर्व हकीकत माहीत आहे; आणि जमीनदारानें जरा दरडावून सांगितलेंच तर लग्नाच्या वेळीं समाराधनेस हजर असलेले लोक सुद्धां पुढें येऊन साक्ष

देतील असें पंचूला समजाविण्यांत आलें.

एके दिवशीं दोन प्रहरीं मी विशेष कामांत होतों तों विमलकडून मला बोलावणें आलें. मी थोडासा चकित झालों.

" कोणी बोलावलें आहे म्हणालास मला ? " मीं निरोप घेऊन येणारास विचारलें.

" राणी आईंनीं. "

" मोठ्या राणीसाहेबांनीं ? "

" नाहीं महाराज. धाकट्या राणी आईंनीं. "

धाकटी राणी ! आज मला धाकट्या राणीनें बोलावल्यास एक शतक लोटलें आहे कीं काय असें वाटलें ! सर्वांना तेथेंच तिष्ठत ठेवून मी अंतर्गृहांत निघून गेलों. मी खोलींत पाऊल टाकतों तोंच मला आश्चर्याचा आणखी एक धक्का बसला. कारण आज मोठा झोंकाचा पोशाखबिशाख करून तो माझ्या नजरेंत भरावा अशा तऱ्हेनें विमल बसलेली मला दिसली. हीच खोली तिच्याकड कोणीं लक्ष न दिल्यामुळें अलीकडे अगदीं अवधानशून्य भासूं लागली होती. परंतु आज तिच्यांत पूर्वीच्या वैभवाची थोडीशी तरी झांक दिसत होती. मी तेथेंच स्तब्ध उभा राहिलों आणि विमलेकडे चौकस दृष्टीनें पाहूं लागलों.

ती थोडीशी आरक्त झाली आणि आपल्या उजव्या हाताच्या बोटांनीं डाव्या हातांतील बांगड्यांशीं खेळूं लागली. थोडक्यांतच तिनें एकदम शांतताभंग केला. ती म्हणाली, " पहायचं गडे ! ज्या ठिकाणीं विलायती मालाला परवानगी

मिळते असा बाजार सबंध बंगालमध्यें फक्त आपलाच असावा ना ?"

" तर मग काय केलें असतां ठीक होईल ? " मीं विचारलें.

" सर्व विलायती माल नाहींसा करून टाकण्याचा हुकूम सोडावा. "

" परंतु तो माल कांहीं माझ्या मालकीचा नाहीं. "

" सर्व बाजार आपलाच नव्हे काय ? "

" परंतु जे लोक त्याचा व्यापारासाठीं उपयोग करतात त्यांच्याच तो जास्त मालकीचा आहे. "

" तर मग त्यांना हिंदी वस्तूंचा व्यापार खुशाल करूं द्यावा."

" मला त्याच्यासारखा आनंद दुसऱ्या कशानेंही होणार नाहीं. परंतु समज त्यांनीं ऐकलें नाहीं, तर मग ? "

" कांहीं तरी ! इतकी मगरुरी त्यांच्या हातून होईल काय ? आपण तर—"

" आज मला आतां फार काम आहे, तेव्हां या बाबतींत वाद घालण्यास मला वेळ नाहीं. परंतु जबरदस्ती करावयाला मात्र मी कधींही तयार होणार नाहीं. "

" परंतु ही सक्ती कांहीं स्वार्थासाठीं करावयाची नाहीं; केवळ देशासाठीं ती करावयाची आहे. "

" देशाकरितां सक्ती करणें म्हणजे देशावरच सक्ती करण्यासारखें आहे. परंतु मला वाटतें, तुला हें कधींच पटणार नाहीं." असें म्हणून मी निघून आलों.

एकाएकीं मला सृष्टीचें स्वरूप नवीनच तऱ्हेनें स्पष्ट

दिसूं लागलें. मला अगदीं अंत:करणापासून वाटलें कीं, सृष्टीचें मृण्मय वजन पार नाहींसें झालें आहे; आणि तिला आपल्या अलौकिक शक्तीच्या जोरावर आपल्या माळेचे दिवस–आणि–रात्र–रूपी मणी ओढीत असतां आयुष्य घालविणें मुळींच जड वाटत नसावें. किती अनंत तिचें काम ! आणि त्याचबरोबर स्वातंत्र्याची किती अमर्याद शक्ति ! तिला कोणीच आळा घालूं शकणार नाहीं—कधींच नाहीं. आकाशापर्यंत उंच उसळणाऱ्या समुद्राच्या लाटेप्रमाणें माझ्या अंत:करणांतून आनंदाची उकळी वर उडाली आणि फुटली व ती आकाशाला जाऊन भिडणार कीं काय इतका तिचा जोर होता.

मी एकसारखा मनाशीं विचार करूं लागलों कीं, माझ्या या भावनोद्रेकाचा अर्थ काय ? प्रथम मला कांहींच बुद्धिग्राह्य असें कारण सांपडेना. परंतु कांहीं वेळानें मला कळून चुकलें कीं, ज्या बंधनावर मी आंतून रात्रंदिवस दांत ओठ चावीत होतों तें बंधन आतां तुटलें होतें. माझें मन आतां सर्व प्रकारच्या धुकटपणापासून मुक्त झालें हें समजून आल्यामुळें मी थोडा चकित झालों. विमलेशीं संबंध असणाऱ्या सर्व गोष्टी मला चित्रपटांतल्याप्रमाणें अगदीं स्पष्ट दिसूं लागल्या. मला मथवून मजकडून तो हुकूम काढून घेण्यासाठीं विमलेनें मुद्दाम पोशाख वगैरे केला होता हें मला अगदीं स्पष्ट कळून चुकलें. त्या दिवसापर्यंत विमलेचा शृंगार तिच्यापासून अगदीं निराळा आहे अशी

मीं कधींच दृष्टि ठेवली नव्हती. परंतु इंग्रजी पद्धतीनें आज तिनें केसांचा जो अगदीं काळजीपूर्वक थाट केला होता तो मला केवळ कृत्रिम झोंक वाटला. त्याच्या भोंवतीं पूर्वीं तिच्या व्यक्तित्वाचें गूढ आवरण होतें आणि त्यामुळें तो मला अमूल्य वाटे; परंतु आज तो शृंगार कमी किंमतीला विकण्यासाठीं आपण होऊन बाहेर पडला होता.

त्या मोडलेल्या शय्यागृहरूपी पिंजऱ्यांतून मी बाहेरच्या सूर्यप्रकाशांत उघड्यावर निघून आलों तों माझ्या घराच्या ओट्याच्या बाजूनें वाळू पसरलेल्या पायवाटेच्या कांठानें दुतर्फा लावलेलीं कांचनाचीं झाडें गुलाबी तेजानें वातावरण गजबजवून टाकतांना मला दिसलीं. झाडांच्या बुंध्यांशीं चिमण्या मोठ्या उत्साहानें चिवचिव किलबिल करीत होत्या. लांब अंतरावर एक गाडी जोखड जमिनीवर टेकून ठेवलेली अशी उभी होती. त्या गाडीच्या जोडीपैकीं एक बैल चरत होता आणि दुसरा गवतावरच विश्रांति घेत बसला असून संपूर्ण समाधानानें त्याचे डोळे मिटत होते, व एक कावळा त्याच्या पाठीवर बसून जीवजंतू चोंचीनें मारीत होता.

सृष्टीच्या दैनंदिन क्रमांतील सार्वत्रिक साधेपणाच्या मी अगदीं जवळ येऊन भिडलों असून त्याचा श्वासोच्छ्वास सुद्धां माझ्या आंगाला लागूं लागला आहे; त्याचा उष्ण श्वास विविध फुलांचा सुवास बरोबर घेऊन मला स्पर्श करीत आहे; आणि या सार्वत्रिक स्वातंत्र्यांत मीही जेथें स्वतंत्र

राहत आहे अशा या सृष्टींतून अनिर्वचनीय मधुर अशा स्तोत्राचा निनाद घुमून बाहेर पडत आहे; असें मला वाटूं लागलें.

आमचीं ध्येयें ज्या स्वातंत्र्यावर खिळलेलीं आहेत तें स्वातंत्र्य मिळविणारे असे वीर आम्ही पुरुष आहों. ज्या निशाणाखालीं आम्ही आमचें भवितव्य स्वीकारीत असतों तें निशाण आमच्याकरितां जी तयार करील तीच आमची खरी उपयोगाची स्त्री होय. जी घरीं बसून आम्हांला भुलविण्याकरितां जाळें विणीत बसलेली असते तिचा गुप्त वेष आम्हीं हुसकावून टाकून तिचें खरें स्वरूप ओळखलें पाहिजे. आपल्या मोहक आशा आणि कल्पना यांचें भुरळ पाडणारें आवरण आंगावर घेऊन आमच्या खऱ्या उद्दिष्टापासून ती आमचें चित्त उडविणार नाहीं याविषयीं आम्हीं सदा दक्ष असलें पाहिजे.

आज मला असें वाटतें कीं, मी आतां शेवटपर्यंत जिंकणार. मी साधेपणाच्या–स्वाभाविकतेच्या–प्रवेशद्वाराशीं आलों आहें; गोष्टी जशा असतील तशांनींच आतां माझें समाधान होतें. मीं स्वतःला स्वातंत्र्य मिळविलें आहे. आतां मी दुसऱ्यांना स्वातंत्र्य देईन.

आणि माझ्या ह्या कामांतच मला मुक्ति मिळेल.

## प्रकरण बारावें

### संदीपची आत्मकथा

#### १

त्या दिवशीं विमलेनें मला बोलावून नेलें; पण तिच्या तोंडांतून एक शब्दही बाहेर पडेना. तिचे डोळे अगदीं भरून आले होते व त्यांतून अश्रू गळतात कीं काय असें क्षणोक्षणीं वाटत होतें. निखिलपाशीं तिचें जें काम होतें त्यांत तिला यश आलें नाहीं हें मीं तेव्हांच ओळखलें. आपण आपलेंच म्हणणें खरें करूं असा तिला किती ताठ्यानें भरंवसा वाटत होता—परंतु तिच्या या भरंवशांत मला मुळींच तथ्य दिसत नव्हतें. पुरुषांत कमकुवतपणा कोठेंसा आहे हें स्त्रियांना चांगलें समजतें. परंतु त्यांच्यांत बळकटपणा—शक्ति—कोठें आहे हें जाणण्याचें त्यांना सामर्थ्य नसतें. गोष्ट अशी आहे कीं, स्त्री जशी पुरुषाला, तसाच पुरुष स्त्रीला, एक प्रकारचें गूढ आहे. असें जर नसतें

तर स्त्रीपुरुषभेद करण्यांत सृष्टीनें आपली शक्ति व्यर्थ उधळली असें म्हणावें लागलें असतें.

हा सगळा अभिमान, अभिमान ! जरूर ती गोष्ट घडून आली नाहीं म्हणून तिचा संताप चालला नव्हता, तर जी प्रार्थना करण्यासाठीं तिला आपल्या ताठ्याशीं एवढें झगडावें लागलें होतें ती प्रार्थना निष्फळ झाली, नाकारली गेली, हेंच तिच्या क्षोभाचें कारण होतें. स्त्रियांमधील या ' मला आणि माझें ' यांच्या सभोंवार, बहाणा आणि चलनवलन, प्रलोभन व माया, यांची किती दाट गर्दी जमलेली असते ! त्यांतच स्त्रियांचें खरें सौंदर्य आहे. पुरुषापेक्षां त्यांच्यामध्यें वैयक्तिकता—स्वत:पणा—नेहमीं जास्त असतो. पुरुष जेव्हां बनविला जात होता तेव्हां ब्रह्मदेव शाळापंतोजी बनला होता. त्याची पिशवी त्या वेळीं आज्ञा आणि तत्त्वें यांनीं भरलेली होती. परंतु तो जेव्हां स्त्री बनवूं लागला तेव्हां तो हेडमास्तरकी सोडून देऊन कारागीर बनला व त्याच्याजवळ फक्त कुंचला आणि रंगाची पेटी एवढींच शिल्लक राहिलीं !

विमल जेव्हां तेथें स्तब्ध उभी राहिलेली होती व तिच्या अभिमानाचा भोपळा फुटून ती लाजेनें चूर व आरक्त होऊन, क्षितिजास टेकावयाला आलेल्या जलपरिपूर्ण आणि विजेनें प्रस्फुरित अशा तुफानी ढगासारख्या तिच्या नेत्रांत जेव्हां अश्रू उत्पन्न झाले होते त्यावेळीं ती इतकी सर्वांगीण सुंदर दिसत होती कीं, मी आपला थेट तिच्याकडे गेलों आणि तिचा हात धरला. तो कांपूं लागला; परंतु तो तिनें झिडकारून

काढून मात्र घेतला नाहीं. “मधुराणी, आपण दोघें सोबती, स्नेही आहोंत, कारण आपलें ध्येय एक आहे. चला, आपण बसूं या.”

मीं तिला हातीं धरून नेऊन बसविली. तिनें विरोध केला नाहीं. पण किती आश्चर्य!—ज्याप्रमाणें पद्मेचा महाप्रवाह अनिवार्य अशा तऱ्हेनें मार्गावरून घो घो आवाज करीत ज़ात असतां भूपृष्ठावरील एकाद्या लहानशा अडचणीमुळें कांपणाऱ्या कांठावरून एकाएकीं बाजूला वळतो त्याप्रमाणें माझ्या या धाष्ट्याला एकाएकीं विलक्षण पायबंद बसला. मीं जेव्हां विमलेचा हात दाबला तेव्हां सुराला चढविलेल्या तारांप्रमाणें माझ्या शिरांतून—स्नायूंतून—संगीतध्वनि निघाला. परंतु पहिल्याच गतीसरशीं स्वरैक्य पार नाहींसें झालें. काय आड आलें?

एकटें कांहींच आड आलें नाहीं. तर पुष्कळ गोष्टींची गुंतागुंत आड आली. अगदीं स्पष्ट असें कांहींच नव्हतें; फक्त गूढ अशी विरोधाची भावना मात्र होती. एवढें मात्र खरें कीं, मी कशा प्रकारचा मनुष्य आहें हें मात्र कांहीं मला शपथेवर सांगतां यावयाचें नाहीं ही गोष्ट अलीकडे मला स्पष्ट कळून चुकली आहे. मी स्वतःच आपल्याला असें एक प्रकारचें गूढ होऊन बसलों आहें आणि म्हणूनच माझें स्वतःसंबंधींचें आकर्षण इतकें तीव्र आहे. एकदां मी कसा आहें हें मला पूर्णपणें कळलें म्हणजे मी आपाततःच स्वतःला फेकून देईन आणि मोक्षाप्रत जाईन.

बसल्याबरोबर विमलेचा चेहरा अगदीं एकदम उतरून गेला. किती आणीबाणीची वेळ येऊन गेली आणि तींतून आपण सुरक्षित राहिलों, याची तिलाही जाणीव झालेली दिसली. धूमकेतु निघून गेला होता. फक्त त्याच्या जळत्या शेपटीच्या गोंड्याचेंच तिच्यावर अद्याप वर्चस्व राहिलें होतें. ती भानावर यावी म्हणून मी म्हणालों, "मार्गांत विघ्नें येणारच; त्यांच्याशीं झगडून आपण मार्ग काढला पाहिजे. हृदयाचा जोर सोडतां कामा नये. हेंच सर्वोत्तम नव्हे काय, मधुराणी ?"

थोडेंसें खाकरून विमलनें आपला घसा साफ केला. परंतु ती फक्त "होय" एवढेंच पुटपुटली.

"आपण आपल्या कार्याची दिशा आंखूं या." मी पुढें म्हणालों, आणि खिशांतून कागद व पेन्सिल बाहेर काढली.

कलकत्त्याहून जे काम करणारे लोक आम्हांला येऊन मिळाले होते त्यांची यादी करून मी त्यांचीं प्रत्येकाचीं कामें ठरवूं लागलों. माझें हें टिपण संपण्यापूर्वी विमल कंटाळून मध्येंच म्हणाली, "राहूं द्या तें आतां; मी पुन्हां संध्याकाळीं तुम्हाला भेटेन." एवढें बोलून ती झटकन खोलींतून निघून गेली. कशाकडेही चित्त लागण्यासारख्या स्थितींत ती नव्हती हें उघड दिसत होतें. थोडा वेळ एकटीच बसणें—कदाचित आंथरुणावर पडून मनमुराद रडणें—तिला आवश्यकच होतें.

सूर्य अस्तास जाऊं लागला म्हणजे जसा ढगांचा रंग

गाढतर होत जातो, त्याप्रमाणें ती गेल्यावर माझी निशा जास्तच भडकत चालली. अगदीं उत्तमोत्तम क्षण मीं हातचा घालविला. किती भयंकर भित्रा मी झालों! माझी होय–कीं–नाहीं अशी वृत्ति पाहून केवळ तुच्छतेनें ती मला सोडून गेली असावी, आणि तिचेंच करणें बरोबर आहे, असे विचार माझ्या मनांत आले.

मी या विचारांमध्यें गुंग असतां एका चाकरानें येऊन अमूल्य आल्याची वर्दी दिली. आमच्या तरुण मुलांपैकीं तो एक आहे. त्याला त्या वेळीं कोठें तरी दूर पाठवावा असें मला वाटलें. परंतु माझा निश्चय होण्यापूर्वींच तो आंत आला. तेव्हां मग, कापड मीठ आणि साखर यांविषयीं निरनिराळ्या प्रदेशांत ज्या झटापटी चालल्या होत्या त्यांविषयीं आम्ही बोलत बसलों आणि वातावरणांतून निशा पार नाहींशी झाली. मी स्वप्नांतून जागा झाल्यासारखें मला वाटलें. झटापटींत पडण्याला अगदीं उत्सुक अशी माझी वृत्ति होऊन मी ताडकन उभा राहिलों.— वंदे मातरम् !

अमूल्यानें विविध वर्तमान आणलें होतें. कुंडू जमीनदाराचीं कुळें असलेले बहुतेक व्यापारी आमच्या बाजूला आले होते. निखिलचे बहुतेक नोकर आंतून आमच्या बाजूचे झाले होते व आमच्या कार्याचीं सूत्रें हालवीत होते. आमच्याजवळ हल्लीं शिल्लक असलेला माल तेवढा विकूं द्याल तर आम्ही दंड देऊं, असें मारवाडी दुकानदार म्हणत होते. आतां फक्त कांहीं मुसलमान व्यापारी तेवढे हट्ट धरून राहिले होते.

त्यांच्यापैकीं एक जण जर्मनींत तयार झालेल्या कांहीं शाली घरगुती उपयोगाकरितां म्हणून नेत होता. त्या सर्व हिसकावून घेऊन आमच्या खेडेगांवांतील एका मुलानें जाळून टाकल्या. त्यामुळें भानगड उपस्थित झाली होती. त्या शालींऐवजीं तुला हिंदी लोकरीच्या शाली विकत घेऊन देतों असें आम्हीं त्याला सांगितलें. परंतु लोकरीच्यां स्वस्त हिंदी शाली कोठें मिळणार ? आम्ही कांहीं त्याला काश्मिरी शाली देऊन खूष करणार नव्हतों ! त्यानें येऊन निखिलजवळ तक्रार केली. निखिलनें त्याला कायद्याचा आश्रय करण्यास सांगितलें. आतां निखिलच्या नोकरांनीं खटल्यांतून कांहीं निष्पन्न होऊं नये अशी खटपट केलीच. त्याचा वकील सुद्धां आमच्याच बाजूचा !

मुद्दा असा आहे कीं, प्रत्येक वेळीं जाळलेल्या विलायती कापडाबद्दल आम्हांला देशी कापड भरून द्यावें लागलें आणि शिवाय वर खटल्याचा खर्च करावा लागला, तर एवढा पैसा यावयाचा कोठून ? आणि गमतीची गोष्ट ही कीं, आम्हीं जों जों त्या विलायती वस्तु जाळतों आहों तों तों त्यांची मागणी वाढत आहे व युरोपियन व्यापाऱ्यांचा फायदा होत आहे—त्या नबाबाच्या गोष्टीप्रमाणें अगदीं. फुटणाऱ्या कांचेचा आवाज कानांला गोड लागतो म्हणून तो आपला त्या सुदैवी दुकानदाराकडचीं कांचेचीं झुंबरेंच फोडीत असे !

दुसरा प्रश्न असा आहे कीं, ज्या अर्थीं भपकेबाज परंतु स्वस्त असे लोकरीचे हिंदी जिन्नस मुळीं मिळतच नाहींत,

त्या अर्थी तसल्या विलायती वस्तूंवरील आमचा बहिष्कार कडकच ठेवावा, कीं तेवढ्याच वस्तु अपवाद म्हणून बाजूला काढाव्या ?

पहिल्या मुद्द्याविषयीं शेवटीं मी अमूल्याला म्हणालों, “ हें पहा, ज्यांच्या विलायती वस्तु आपण जप्त करतों त्यांना परत हिंदी वस्तु देण्याची पद्धतच आपण बंद केली पाहिजे. त्यांना चट्टा बसावा म्हणून आपण त्यांच्या वस्तु जप्त करतों; आपल्याला चट्टा बसावा म्हणून कांहीं नव्हे ! ते जर आपल्यावर फिर्याद करतील तर उलट आपण त्यांचीं धान्याचीं कोठारें जाळून टाकूं. कां अमूल्य, तूं असा दचकतोस कां ? मोठा थोरला उजेड होईल म्हणून मला आनंद होतो आहे असें नव्हे. लक्षांत ठेव, हें युद्ध आहे—दुःखाबद्दल तुला भीति वाटत असेल तर मग तूं आपला प्रणयाराधना करावयाला जा. तुझा या कामीं कांहीं उपयोग नाहीं ! ”

कांहींही झालें तरी कोणत्याही विलायती वस्तूला कसलीही सवलत ठेवावयाची नाहीं असा मीं दुसऱ्या प्रश्नाचा निकाल लावला. पूर्वी जेव्हां हीं भपकेबाज लोकरीचीं वस्त्रें मुळीं माहीतच नव्हतीं तेव्हां आमच्या शेतकऱ्यांचें साध्या कापसाच्या कापडावर भागत असे. तेव्हां पुन्हां त्यांनीं तसें भागवावयाला शिकलें पाहिजे. हल्लींइतके मग ते भपकेबाज दिसणार नाहींत हें खरें; परंतु ते कसे दिसतील यासंबंधीं विचार करण्याची ही वेळ नव्हे.

होडीवाल्यांपैकीं बहुतेकांनीं विलायती माल न वाहण्याचें

कबूल केलें होतें. परंतु त्यांच्यापैकीं मुख्य जो मिर्जन तो अद्याप ऐकत नव्हता.

"त्याची होडी तुम्ही बुडवूं शकणार नाहीं ?" मीं बंदरावरच्या कारभाऱ्याला विचारलें.

"त्यासारखें सोपें दुसरें कांहींच नाहीं." त्यानें उत्तर दिलें. "परंतु मागाहून मला त्याविषयीं जबाबदार धरलें तर ?"

"परंतु तुमच्यावर संशय येईल असें अर्धवट कामच कां करा ? थोडी फार जबाबदारी पतकरण्याची वेळ आलीच तर मी अगदीं तयार आहें."

मिर्जनच्या होडींतून सामान काढून नेऊन ती धक्क्याशीं बांधून ठेवलेली होती. तिच्यावर कोणीही मनुष्य नव्हता. बंदरकारभाऱ्यानें त्यांना मेजवानीला बोलाविलें होतें, तिकडे सर्व जण गेले होते. संध्याकाळ झाल्यावर होडींत कांहींबाहीं भरून ती पाण्यांत लोटून दिली. प्रवाहाच्या मध्यभागीं गेल्यावर ती बुडाली.

मिर्जनला या सर्व प्रकाराचा अर्थ समजला. तो रडत रडत माझ्याकडे येऊन क्षमा मागूं लागला. "माझी चूक झाली. महाराज—" त्यानें सुरवात केली.

"तुला हें इतकें एकदम कसें कळलें रे ?" मीं तिरस्कारानें विचारलें.

त्यानें स्पष्ट उत्तर दिलें नाहीं. तो म्हणाला, "मचवा २००० रुपये किंमतीचा होता हो ! आतां मला माझी चूक कळून आली. यावेळेस मला क्षमा करा. मी पुन्हां

कधीं—" असें म्हणून त्यानें माझे पाय धरले.

मीं त्याला दहा दिवसांनीं ये म्हणून सांगितलें. मला वाटलें कीं, आतां एक वेळ फक्त त्याला आम्हीं २००० रुपये दिले तर तो शरीरानें आणि मनानें आमच्या अगदीं आधीन होईल. असा मनुष्य जर आमच्या बाजूला आला तर तो आमचें किती तरी कार्य करूं शकेल. पुष्कळसा पैसा हातांत असल्याखेरीज मात्र आम्हाला कांहीं विशेष कार्य करतां येणार नाहीं.

संध्याकाळीं खोलींत विमल येतांच तिला उत्थापन देण्यासाठीं उठून मी म्हणालों, "राणी! सर्व कांहीं तयार आहे. यश अगदीं हाताशीं आहे, परंतु आम्हांला पैसा पाहिजे."

"पैसा! किती पैसा?"

"कांहीं फारसा नाहीं, पण या नाहीं त्या मार्गानें आम्हांला तो मिळालाच पाहिजे."

"परंतु तो किती?"

"सध्यां फक्त ५०००० रुपये पुरे होतील."

आंकडा ऐकून विमल मनांत दचकली; परंतु तें बाहेर दिसूं नये म्हणून तिनें प्रयत्न केला. पुन्हां एकदां आपण हरलों असें तिनें कसें कबूल करावें?

"राणी!" मी म्हणालों, "तुम्हीच फक्त अशक्याला शक्य कराल. खरोखर तुम्हीं तसें अगोदरच केलें आहे. तुम्हीं काय कार्य केलें आहे हें तुम्हाला दाखवून द्यावें—तुम्हाला

तें समजून यावें—अशी माझी किती इच्छा आहे! परंतु आतां त्याची वेळ नव्हे. सध्यां आम्हांला पैसा पाहिजे."

"तुम्हांला पैसा मिळेल." ती म्हणाली.

आपलीं रत्नें विकण्याचा विचार तिला सुचला हें मीं तेव्हांच जाणलें. म्हणून मी म्हणालों, "तुमचें जवाहीर सध्यां राखून ठेवलें पाहिजे. त्याची केव्हां जरूरी लागेल त्याचा कांहीं नेम नाहीं!" मग विमल जेव्हां माझ्याकडे स्तब्धपणें, शून्यदृष्टीनें पाहूं लागली तेव्हां मी पुढें म्हणालों, "या वेळचा पैसा तुमच्या पतीच्या खजीन्यांतून आला पाहिजे."

विमल अधिकच विमूढ झाली. पुष्कळ वेळ स्तब्ध राहून ती म्हणाली, "पण त्यांचा पैसा मला कसा मिळणार?"

"त्याचा पैसा तुमचाही नव्हे काय?"

"छे! मुळींच नाहीं!" ती म्हणाली. आधींच आघातित अशा तिच्या अभिमानावर हा आणखी एक आघात बसला.

"तसें असेल तर तो पैसा त्याचाही नाहीं; तो देशाचा आहे. आणि देशाच्या अत्यंत जरूरीच्या वेळीं तो तो पैसा दडपून ठेवीत आहे."

"सगळें खरें! पण तो मला कसा मिळावा?" ती पुन्हां म्हणाली.

"तुम्हीं तो मिळविलाच पाहिजे आणि मिळवालच. कसा, हें तुम्हांलाच चांगलें माहीत. तो न्यायानें ज्यांचा

आहे त्यांच्यासाठीं तुम्हीं तो मिळविला पाहिजे. 'वंदे मातरम्' हे जादूचे शब्द त्याच्या लोखंडी सेफचें दार उघडतील, त्याच्या खोलीच्या भिंती फोडतील, आणि त्याच्या हांकेला जे जुमानणार नाहींत त्यांचीं हृदयें त्याचा आवाज बंद करील. मधुराणी ! म्हणा; वंदे मातरम् म्हणा !"

"वंदे मातरम् !"

२

आम्ही पुरुष आहों. आम्हीं राजे आहों. आम्हाला आमची खंडणी मिळालीच पाहिजे. या जगतीतलावर आल्यापासून आम्ही सृष्टीला एकसारखें लुटीत आहोंत; आणि जों जों आम्हीं आपल्या मागण्या वाढविल्या तों तों ती आम्हांला नमतच आली. अगदीं आदिकालापासून आम्ही पुरुष फळें खुडीत आलों आहों, झाडें तोडून टाकीत आलों आहों, भूमी खणीत आलों आहों आणि पशुपक्षी व जलचर प्राणी यांना ठार मारीत आलों आहों. समुद्राच्या तळापासून, भूमीच्या खालपासून, खुद्द मृत्यूच्या दाढेंतून सुद्धां आमची सगळी हिसकाहिसकी चाललेली आहे. सृष्टीच्या खोलींतील एकाही पेटीला—मग ती कितीही बळकट असो—हात लावल्याखेरीज अगर लुटल्याखेरीज आम्हीं सोडलेलें नाहीं.

जे पुरुष आहेत त्यांच्या मागण्या पुऱ्या करण्यांत सृष्टीलाही आनंद वाटतो. त्यांच्यासाठीं तिनें जे अनंत आत्मयज्ञ केले

आहेत त्यांच्या योगानें ती सुपीक, सुंदर आणि पूर्ण अशी झाली आहे. एवढें जर झालें नसतें तर ती अगदीं जंगलांत चुकून गेली असती; तिच्या ठायीं स्वतःची जाणीव उत्पन्न झाली नसती; तिच्या हृदयाचे दरवाजे बंद राहिले असते व तिचें मोतीं अथवा जवाहीर यांना प्रकाश कधींच पाहावयाला मिळाला नसता.

त्याचप्रमाणें केवळ आपल्या मागण्यांच्या जोरावरच आम्हीं पुरुषांनीं स्त्रियांमध्यें दडून राहणाऱ्या सर्व शक्याशक्यता बाहेर काढल्या आहेत. आम्हांला आपल्यास अर्पण करून घेतां घेतांच त्यांना त्यांचें महत्त्व प्राप्त झालें आहे. आपल्या सुखाचें जवाहीर आणि दुःखाचीं मोत्यें आमच्या भांडारांत आणून ओतावीं लागल्यामुळेंच त्यांना आपली खरी संपत्ति आढळून आली आहे. तेव्हां पुरुषांच्या बाबतींत कशाचाही स्वीकार करणें म्हणजे देण्यासारखें आहे, आणि स्त्रियांच्या बाबतींत देणें म्हणजे घेणें आहे.

परंतु आतांच मीं विमलजवळ जी मागणी केली ती मात्र मोठी आहे खरी! प्रथम माझ्या मनांत आशंका उत्पन्न झाल्या. कारण आपल्याशींच निरर्थक भांडत बसावयाची पुरुषांच्या मनाला संवयच नाहीं काय? मला वाटलें कीं, तिच्यावर मीं फार कठीण कामाचें ओझें टाकलें. तिला परत हांक मारावी आणि तुला या सगळ्या भानगडींत ओढून तुझें जीवित माझ्यानें मलिन करववत नाहीं असें तिला सांगावें अशी ऊर्मी अगदीं प्रथम मला झाली. कुरापती काढणें,

स्त्रीच्या निश्चेष्टतेंत मुळापासून गडबड उत्पन्न करून तिचें अस्तित्व सफळ करणें, दुःखाच्या अगाध व उमोप डोहाचें मंथन करून सर्व जगाला सुखी करणें, हेंच मनुष्याचें उद्दिष्ट होय. तेवढ्याचकरितां त्याचे हात एवढे बळकट आहेत व त्याची पकड इतकी स्थिर आहे, हें सर्व त्या क्षणीं मी विसरलों.

विमल अगदीं अंतःकरणापासून इच्छा करीत होती कीं, मीं–संदीपनें–कांहीं तरी मोठा त्याग करावयास तिला सांगावें—तिला जीवित सोडावयास सांगावें. कारण त्याशिवाय तिला सुख होणें नाहीं. आज कित्येक कंटाळवाणीं वर्षें आपलें हृदय रडून हलकें करावयाला कधीं मिळेल याची ती वाट पाहत आहे—इतकी ती आपल्या शांत सौख्याच्या एकरंगीपणानें आतृत झाली आहे; आणि याचमुळें माझें प्रथम दर्शन होतांक्षणींच तिचें हृदयरूपी क्षितिज लवकरच प्राप्त होणाऱ्या यातनेच्या सजल ढगांनीं काळें झालें. तिच्यावर दया करून जर मीं तिला तिच्या भावी व चालू दुःखापासून मुक्त केलें तर मग माझ्या पुरुष होण्यानें कोणता हेतु साध्य झाला ?

माझ्या रुखरुखीचें खरें कारण असें आहे कीं, माझी मागणी पैशासंबंधींची आहे. त्यांत भिक्षेचा संपर्क–वास–येतो. कारण द्रव्य हें पुरुषाचें आहे, स्त्रीचें नाहीं; आणि यासाठींच मला आंकडा मोठा करावा लागला. एक हजार अथवा दोन हजारांला क्षुद्र चोरीचें स्वरूप प्राप्त झालें असतें. पन्नास हजारांला अद्भुत चोरीची मोठी भव्यता तरी आहे !

परंतु खरें पाहिलें तर श्रीमंती माझ्या वांट्यालाच यावयाला पाहिजे होती. माझ्या कित्येक आशांना त्यांच्या सिद्धतेच्या मार्गावर वारंवार केवळ पैशाच्या कमतरतेमुळें थांबावें लागत आहे. मला हें शोभत नाहीं ! माझें दैव केवळ अन्यायानें वागलें असतें तर त्याला क्षमा करतां आली असती; परंतु त्याची अरसिकता–त्याची मर्मज्ञतेची कमतरता–मात्र अक्षम्य आहे. माझ्यासारख्याला घराचें भाडें कोठून द्यावें याची भ्रांति पडावी अथवा रेलवेच्या इंटर क्लासाकरितां आपल्याजवळ पुरेसे पैसे आहेत कीं नाहींत हें मोजावयाला लागावें, हें नुसतें दुःख नाहीं, तर तें हलकेपणाचें–ग्राम्य–आहे !

त्याचप्रमाणें हेंही स्पष्ट आहे कीं, निखिलचें आनुवंशिक उत्पन्न त्याला अनावश्यक–अतिरिक्त–आहे. तो गरीब झाला असता तर अगदीं शोभण्यासारखें झालें असतें. आपल्या गुरुजींसह त्यानें गरीबशा मध्यमस्थितीच्या दुहेरी जोखडाखालीं आनंदानें मान घातली असती.

देशाच्या सेवेंत पन्नास हजार रुपये फेकून देऊन स्वतःचें समाधान करून घेण्याची संधि मला एकदां तरी मिळणें आवश्यक आहे. मी जन्मतःच नबाब आहें. आणि एकदां तरी दारिद्र्याचा हा खोटा वेष टाकून देऊन एक दिवस स्वतःला माझ्या स्वरूपांत मी पाहीन अशी मला उमेद आहे.

विमलला कधीं ते ५०००० रुपये मिळतील याबद्दल मला जबर शंका आहे; तेव्हां बहुतकरून हजार दोन हजार

रुपयेच हातांत पडणार. तसेंही असो. मुळींच कांहीं न मिळण्यापेक्षां थोडासा अंश जरी मिळाला तरी शहाण्या मनुष्यानें समाधान मानलें पाहिजे.

परंतु या माझ्या वैयक्तिक विचारांकडे मला पुन्हां केव्हांतरी वळलें पाहिजे. बातमी अशी आहे कीं, माझी एकदम जरूरी आहे. थोडीशी भानगड उपस्थित झाली आहे.

ज्या मनुष्यानें आमच्याकरितां मिर्जनची बोट बुडविली त्याचा पोलिसाला सुगावा लागला आहेसें दिसतें. तो फार जुना गुन्हेगार आहे. ते त्याच्या तलासांत आहेत, परंतु तो पक्का बिलंदर आहे; तो आपला पत्ता तसा लागूं देणार नाहीं. तरी पण काय सांगावें ? निखिल आतां स्वत: दक्ष झाला आहे, तेव्हां त्याच्या कारभाऱ्याला आतां आपल्या मनाप्रमाणें कांहीं करतां येणार नाहीं.

तो मला भेटला तेव्हां म्हणतो, “ मी जर या भानगडींत सांपडलों तर तुम्हांला आंत ओढल्याखेरीज राहणार नाहीं. ”

“ असा कोणता फांस तुमच्याजवळ आहे कीं त्यांत तुम्ही मला अडकविणार ? ” मीं विचारलें.

“ मजजवळ तुमचें एक आणि अमूल्य बाबूंचीं पुष्कळ पत्रें आहेत. ”

मजकडे एक “ अगदीं जरूरीचें ” असें लिहिलेलें पत्र येऊन त्याला मीं घाईघाईनें उत्तर लिहिलें. तें उत्तर या कामासाठीं अगदीं जरूरीचें होतें हें मला आतां दिसून आलें. हळू हळू मला पुष्कळ गोष्टी कळूं लागल्या आहेत !

आतां महत्त्वाचा मुद्दा असा आहे कीं, पोलिसाला लांच दिला पाहिजे आणि मिर्जेनला त्याच्या मचव्याचे पैसे देऊन गप्प बसविला पाहिजे. या आमच्या राष्ट्रीय धाष्ट्यांतील पुष्कळसा खर्च निखिलच्या कारभाऱ्याच्या खिशांत जाणार हें उघड आहे. परंतु तिकडे सध्यां मला डोळेझांक केली पाहिजे; कारण तो माझ्या इतक्याच जोरानें 'वंदे मातरम्'चा घोष करीत नाहीं काय ?

या आमच्या कामासारखें काम नेहमीं गळक्या जहाजांतूनच करावें लागतें. त्यांत जितकें भरावें तेवढें गळून जावयाचें. आपल्या सर्वांच्या अंतःकरणांत नैतिक बुद्धीचा एक गुप्त सांठा आहे, त्यामुळें मी अगदीं त्या कारभाऱ्यावर जोरानें रागावण्याच्या बेतांत होतों; आणि आमचे देशबांधव किती अविश्वासू आहेत त्याबद्दल आपल्या रोजनिशींत शिव्यांची झोड लिहून ठेवणार होतों. परंतु परमेश्वर जर असलाच तर त्याचें मीं अगदीं उतराई असलें पाहिजे. कारण त्यानें मला अगदीं स्पष्ट पाहूं शकणारें अंतःकरण दिलें आहे; आणि त्यामुळें आंतली किंवा बाहेरची कोणतीही गोष्ट माझ्या दृष्टीला अंधुक अशी राहत नाहीं. मी दुसऱ्यांना मोह पाडीत असेन, परंतु मी स्वतः मोह पावणार नाहीं; आणि त्यामुळें माझा राग फार वेळ टिकला नाहीं.

जें सत्य असतें तें निव्वळ सत्य असतें; त्यांत चांगलें आणि वाईट असा प्रश्न नाहीं. आणि अशी वस्तु म्हणजे शास्त्र होय. तळें म्हणजे जमिनींत न जिरतां शिल्लक राहिलेल्या

पाण्याचा सांठा होय, दुसरें कांहीं नाहीं. भूलोकच्या इतर सर्व गोष्टींप्रमाणें ' वंदे मातरम्'च्या पंथाच्या खालींही गाळानें परिपूर्ण असा प्रदेश आहे आणि त्याची शोषक शक्ति विसरून चालावयाचें नाहीं. कारभारी आपल्याला जें हवें आहे तें घेणार; मलाही कांहीं जरूरी आहे. या लहानसहान जरूरी आमच्या मोठ्या कार्याच्या जरूरीचाच भाग होत;—चांगलाच पल्ला गांठावयाचा असला कीं घोड्याला खावयाला घातलेंच पाहिजे आणि चाकांना तेलही दिलेंच पाहिजे.

एकंदरींत तात्पर्यार्थ असा कीं, आम्हांला पैसा पाहिजे आणि तोही लवकर पाहिजे. अगदीं एकदम हातांत जेवढा पडेल तेवढा आम्हांला घेतलाच पाहिजे. कारण आतां थांबण्यास वेळ नाहीं. प्रत्यक्ष हें कधीं कधीं अंतिमाला गिळून टाकतें. आजचे ५००० रुपये पुढच्या ५०००० रुपयांची वाट लावतील हें मला माहीत आहे. काय करणार ? एवढा दंड सोसलाच पाहिजे. मी कित्येकदां निखिलला टोला देत असें कीं, जे नेहमीं संयमनाच्या मार्गानेंच चालतात त्यांना त्याग म्हणजे काय हें कधींही कळणें शक्य नाहीं ! आम्ही जे अधाशी लोक आहों त्यांनाच पावलोपावलीं आपल्या लोभाचा त्याग करावा लागतो.

मनुष्याच्या मुख्य पापांपैकीं इच्छा ही जे खरोखर पुरुष आहेत त्यांच्यासाठीं आहे—परंतु भ्रम—कीं जो केवळ भित्र्यांसाठींच होय, तो—नेहमीं त्यांच्या मार्गांत आड येतो. कारण भ्रांति त्यांना भूत आणि भविष्य यांच्या विचारांत

गुंतवून ठेवते. परंतु वर्तमानकाळीं तीच त्यांना पाऊल टाकतांना गोंधळावयास लावते. जे नेहमीं दूरच्या गोष्टींकडे औत्सुक्यानें कान लावून राहतात आणि आपल्या अगदीं जवळच्या गोष्टींकडे दुर्लक्ष करतात ते लोक आपल्या प्रियकराच्या स्मरणांत गुंगलेल्या शकुंतलेसारखे होत. पाहुणा येतो; त्याच्याकडे कोणी लक्ष देत नाहीं; आणि मग त्यांच्या इच्छेची वस्तूच हरवून नेणारा शाप त्यांच्या मस्तकावर आदळतो.

त्या दिवशीं मीं विमलेचा हात दाबला, त्या स्पर्शामुळें तिच्या मनांत अद्याप खळबळ चालू आहे आणि माझ्याही अंतःकरणांत त्यामुळें एक प्रकारचें प्रस्फुरण चालू आहे. मात्र, पुनरावृत्तीनें त्याचा कंप गाढ करतां उपयोगी नाहीं; कारण आतां त्याला जें संगीताचें स्वरूप आहे तें जाऊन त्याला निव्वळ तर्कप्रामाण्य येईल. हल्लीं तिच्या अंतःकरणांत "कां ?" या प्रश्नाला वाव नाहीं. ज्यांना भ्रांतीची गरज असते अशा लोकांपैकीं विमल एक आहे. तेव्हां भ्रांतीचा भरपूर पुरवठा मीं तिला केलाच पाहिजे.

माझ्याविषयीं पाहिलें तर मला दुसरें कितीतरी काम आहे; त्यामुळें मला विकाररूपी मद्याच्या भांड्यांतील फेसावरच सध्यां संतुष्ट राहिलें पाहिजे. हे अधाशी मनुष्या ! आपली इच्छा दाब, आणि भ्रांतीची–मोहाची–वीणा प्रलोभनाच्या सर्व नाजूक भावना जागृत होऊन बाहेर पडेपर्यंत अशीच वाजवीत राहा. अगदीं मुळापासून भांडें खलास करण्याचा

हा समय नव्हे.

३

आमचें कार्य हळू हळू चाललेंच आहे. परंतु मुसलमान आमचे बांधव आहेत असा आम्हीं घसा फुटेपर्यंत कंठशोष केला तरी आमच्याच्यानें कांहीं त्यांना अद्याप आमच्या बाजूला आणवलें नाहीं. तेव्हां त्यांना अगदीं पूर्ण दाबून टाकून आम्ही सर्व गोष्टींचे स्वामी आहों हें त्यांच्या ध्यानांत आणून दिलें पाहिजे. हल्लीं ते आपले दांत बाहेर दाखवीत आहेत. परंतु आम्ही वाजवूं त्या पुंगीप्रमाणें अस्वलासारखें नाचण्याची त्यांना खास पाळी येणार.

परंतु निखिलचा यावर आक्षेप आहे. तो म्हणतो, "संयुक्त हिंदुस्तानची कल्पना जर सत्य असेल तर मुसलमानांनाही त्यांत स्थान पाहिजे."

"अगदीं बरोबर." मी म्हणालों. "परंतु त्यांचें स्थान कोणतें हें बरोबर ओळखून त्यांना तेथेंच ठेवलें पाहिजे, नाहींतर ते एकसारखे त्रास देत राहतील."

"तेव्हां तुम्ही एक त्रास वांचविण्याकरितां दुसरा त्रास उत्पन्न करणार तर?"

"तर मग तुझा यावर काय उपाय आहे?"

"या जगांत भांडणें टाळण्याचा एकच सुप्रसिद्ध मार्ग आहे." निखिल अर्थपूर्ण रीतीनें म्हणाला.

चांगल्या लोकांनीं लिहिलेल्या गोष्टीप्रमाणें निखिलच्या वादविवादाचा शेवट नेहमीं एखाद्या नीतितत्त्वांत व्हावयाचा हें ठरलेलें आहे. आणि त्यांत चमत्काराची गोष्ट ही कीं, नैतिक आज्ञांशीं त्याचें इतकें साहचर्य आहे तरी आपला अद्याप त्याचा विश्वास त्यांच्यावर आहे ! तो अगदीं पक्का शाळाविद्यार्थी आहे. त्याचा एकच गुण आहे आणि तो निष्कपटपणा. या लोकांची एक अशी चमत्कारिक गोष्ट आहे कां, ते खुद्द मृत्यूंत सुद्धां अंतिमता कबूल करीत नाहींत. त्यांचे नेत्र त्याच्याही पलीकडे लागलेले असतात !

आज कित्येक दिवस माझ्या मनांत एक बेत घोळत आहे; आणि तो जर मीं जमवून आणला तर सर्व देश प्रज्वलित होईल. मायदेश दृश्य स्वरूपांत पुढें असल्याखेरीज आमच्या देशबांधवांत खरा स्वदेशाभिमान कधींही जागृत होणार नाहीं. त्याची आम्हांला एक देवता बनविली पाहिजे. माझ्या सहकाऱ्यांना हा मुद्दा तेव्हांच पटला. " तर मग आपण एक योग्य अशी मूर्ति बनवूं या ! " असें ते ओरडले. मी त्यांना थोडें चुचकारून म्हणालों, " आपण बनवून चालावयाचें नाहीं. चालू असलेल्या मूर्तींपैकींच एखादी देशाची दृश्य मूर्ति होय असें आपण लोकांस वाटावयास लावलें पाहिजे. रूढीच्या खोल चकारींतूनच लोकांची भक्ति तिकडे धावूं लागली पाहिजे."

परंतु ,निखिलचा या बाबतींत सुद्धां आपला वाद हा आहेच. कांहीं दिवसांपूर्वीं तो म्हणाला, " जें आपण

सत्य कार्य म्हणून समजतों त्याच्यासाठीं मोहाचा—भ्रमाचा—आश्रय आपण करतां कामा नये. ”

मी म्हणालों, “ कमी दर्जाच्या लोकांना मोह अगदीं आवश्यक आहे. आणि या वर्गांतच जगाचा मोठा भाग असतो; म्हणूनच लोकांचे भ्रम—मोह—कायम राखण्यासाठीं प्रत्येक देशांत देवता उत्पन्न करून ठेवलेल्या आहेत. मनुष्यांना आपला कमकुवतपणा चांगला माहीत आहे. ”

“ छे ! ” निखिल म्हणाला, “ त्यांचे भ्रम दूर करण्याकरितांच देवतांची जरूरी आहे. ज्या देवता त्यांचे भ्रम कायम राखतात त्या असत्य देवता होत ! ”

“ त्याचें काय ? जरूरीच पडेल तर कार्याची हानि होऊं दण्यापेक्षां खोटया देवतांची आराधना केलीच पाहिजे. दुर्दैव आमचें कीं, आमच्यामध्यें भ्रम पुष्कळ जागृत असूनही त्यांचा आमच्या कार्याला उपयोग कसा करून घ्यावा हें आम्हांला कळत नाहीं. ब्राह्मणांकडे पहा; आम्ही त्यांना इतके देवाप्रमाणें भजतों आणि न विसरतां अविरत त्यांच्या पायाची धूळ घेतों, तरी त्यांचा सर्व जोर व्यर्थच जात आहे ! ”

“ नेहमीं नम्र असणारा, दुसऱ्या कोणाच्या तरी पायाची धूळ डोक्यावर अथवा पाठीवर घेऊन चित्रित झाल्याखेरीज कोणतीच गोष्ट करवत नाहीं अशा लोकांचा मोठा थोरला वर्ग हा अस्तित्वांत राहणारच. आजपर्यंत आमच्या तीक्ष्ण आणि उपयोगी अशा शस्त्रांनीं आम्हीं ब्राह्मणांचें संरक्षण केलें.

आणि आतां या असल्या बाजारबुणग्या लोकांना आमच्या जरूरीच्या वेळीं जर ब्राह्मणांनीं हांकलून दिलें नाहीं तर मग किती आमची शोचनीय स्थिति ! ”

परंतु हें सर्व निखिलच्या डोक्यांत शिरविणें अशक्य होय. सत्याविषयीं तो इतका कांहीं पक्षपाती आहे कीं, जणूं काय सत्य ह्मणून एकादी बाह्य अस्तित्व असलेली वस्तूच आहे ! मीं त्याला कित्येकदां समजावून सांगण्याचा प्रयत्न केला आहे कीं, ज्या ठिकाणीं असत्य खरोखर अस्तित्वांत असतें, तेथेंच खरें सत्य असतें. आमच्या देशांत पूर्वी हें पटलें होतें आणि म्हणूनच त्यांनीं स्पष्ट सांगून ठेवलें आहे कीं, ज्यांची बुद्धि कमी प्रतीची आहे त्यांना असत्य हेंच सत्य होय. मूर्ति हाच देश असा ज्यांचा खरा भरंवसा आहे त्यांना मूर्ति हीच सत्याच्या जागीं होय. आमचा स्वभाव आणि परंपरा यामुळें आम्हांला देश वास्तविक आहे तसा ओळखतां येत नाहीं. परंतु त्याच्या प्रतिमेवर मात्र आमचा विश्वास झटकन बसतो. ज्यांना खरोखर कांहीं कार्य करावयाचें आहे त्यांनीं ही गोष्ट विसरतां कामा नये.

मीं असें म्हटलें कीं निखिल संतापतो मात्र. तो एकदां ओरडून म्हणाला, “ सत्य प्राप्त करून घेण्याच्या मार्गानें चालावयाचें तुम्हांला सामर्थ्य नाहीं म्हणून तुम्ही आकाशांतून अद्भुत रीतीनें आपल्याकडे आपली इच्छित वस्तु कोणी तरी फेकील असें समजून वाट पाहत राहतां. आणि तुमची देशाची सेवा शेंकडों वर्षांची शिल्लक राहिली आहे

तरी त्याची एक प्रतिमा करावी आणि तिच्यापुढें हात जोडून बसून कृपेच्या फळांची अपेक्षा करीत राहावें, याखेरीज तुम्हांला दुसरें कांहीं सुचत नाहीं."

मी म्हणालों, "आम्हांला अशक्य साधावयाचें आहे, तेव्हां आमच्या देशाला देवाचें स्वरूप दिलेंच पाहिजे."

"शक्य गोष्टी करण्याची तुमच्यांत धमक नाहीं असा तुमच्या म्हणण्याचा अर्थ दिसतो. आज जी परिस्थिति आहे तिला अगदीं सुद्धां धक्का लावावयाचा नाहीं; आणि तरी देखील तुम्हांला अतिमानुष असे परिणाम पाहिजेत."

शेवटीं मी अगदीं प्रक्षुब्ध होऊन म्हणालों, "इकडे पहा निखिल; तुझीं बोलणीं नीतीचे धडे या दृष्टीनें ठीक आहेत. लहान मुलांना ज्याप्रमाणें दुधाचा त्याप्रमाणें उत्क्रांतीच्या एका अवस्थेंत मनुष्याला या कल्पनांचा चांगला आणि पुष्कळ उपयोग झाला आहे. परंतु आतां यापुढें त्यांचा उपयोग होणें शक्य नाहीं. आतां मनुष्याला दांत फुटले आहेत."

"ज्या गोष्टींचें बीज स्वप्नांत सुद्धां लावल्याचें आपणांस स्मरत नाहीं अशा गोष्टी आपल्या सभोंवार कशा भराभर आपल्या डोळ्यांदेखत उपस्थित होत आहेत हें तुला दिसत नाहीं काय? कोणत्या शक्तीमुळें हें होतें? आम्हाला दिवसेंदिवस जास्त स्पष्ट होत जाणाऱ्या आमच्या देशाच्या देवतेच्या शक्तीनें. त्या देवतेला मूर्त स्वरूप देणें हें आतां हल्लींच्या काळांतील प्रतिभेचें काम आहे. प्रतिभा वादविवाद

करीत नाहीं. ती उत्पादन करीत असते. देशाची ज्याबद्दल नुसती कल्पना आहे त्यालाच मी केवळ मूर्त स्वरूप देत आहें."

"मी सगळीकडे असें पसरवीन कीं, देवीनें मजवर स्वप्नांत अनुग्रह केला आहे. ब्राह्मणांना मी असें सांगेन कीं, तुम्हांला तिचे पुजारी नेमलेले आहेत, आणि तिची योग्य पूजाअर्चा करण्याचें जें तुमचें कर्तव्य त्यांत तुम्हीं अळं टळं केल्यामुळेंच तुमचा अधःपात झाला आहे. हें सर्व खोटें बोलणें होईल असें तुझें म्हणणें आहे काय? मी म्हणतों, नाहीं; हें सत्यच आहे; आणि तें सत्य माझ्या तोंडून ऐकण्यासाठीं देश इतके दिवस प्रतीक्षा करीत बसला आहे. हा माझा संदेश सांगण्याची जर मला संधि मिळेल तर त्यामुळें केवढा अवाढव्य परिणाम होईल तो तुला दिसेलच."

निखिल म्हणाला, "मला अशी भीति वाटते कीं, माझें आयुष्य मर्यादित आहे आणि तुझा हा परिणाम कांहीं अंतिम परिणाम नाहीं. त्याचे मागूनही असे कांहीं परिणाम होतील कीं, जे आज आपणांला दिसणार नाहींत."

मी म्हणालों, "आजचाच परिणाम फक्त मला पाहिजे आहे."

बंगालची सर्वोत्तम ईश्वरी देणगी जी कल्पना तिचा वांटा निखिललाही मिळालेला होता; नाहींसें नाहीं. परंतु अगदीं चमत्कारिक सात्त्विकतेमुळें त्याची कल्पना पूर्ण निगूढ होऊन गेली आहे—जवळ जवळ नष्ट होण्याच्या बेतांत आली

आहे. बंगालनें दुर्गेची भक्ति किती उच्चतेप्रत नेली आहे पहा ! बंगालनें तें एक अत्युच्च कार्य साधलेलें आहे. माझी तर अशी खात्री आहे कीं, दुर्गा ही राजकीय देवता आहे. आणि मुसलमानी वर्चस्वापासून जेव्हां बंगाल आपली सुटका होण्याकरितां प्रार्थना करीत होता त्यावेळीं स्वदेशाभिमानाच्या शक्तीची मूर्ति म्हणून लोकांनीं तिला ठरविलेलें असावें. आपल्या इच्छित ध्येयाला असें आश्चर्यजनक दृश्य स्वरूप हिंदुस्तानांतील दुसऱ्या कोणत्या प्रांतानें दिलें आहे ?

निखिलची कल्पनेची ईश्वरी देणगी नष्ट झाली आहे, हें त्यानें मला दिलेल्या उत्तराइतकें दुसऱ्या कशानेंच ध्यानांत आलें नसतें. तो म्हणाला, “ मुसलमानी वर्चस्वाच्या काळीं मराठे आणि शीख लोकांनीं त्यांना जें फळ हवें होतें तें आपल्या हातांतील शस्त्रांपाशींच मागितलें. परंतु आपलीं शस्त्रें आपल्या देवीच्या हातांत देऊन तिच्यापुढें यज्ञांतील मंत्र म्हणण्यांत बंगाली लोकांनीं समाधान मानलें. आणि त्यांना जर कांहीं फळ मिळालें असेल तर फक्त यज्ञांतील बोकडांचीं आणि रेड्यांचीं मस्तकें हेंच होय. व याचें कारण देश खरोखर देव नव्हता हें होय. ज्या दिवशीं आम्ही सात्त्विकतेच्या मार्गानें आमच्या देशाचें हित साधण्यास प्रारंभ करूं, त्या दिवशीं आमच्या देशापेक्षां कितीतरी मोठा असा तो परमेश्वर आमचे प्रयत्न सफळ करील ! ”

दुर्दैवाची गोष्ट ही कीं, निखिलचे शब्द कागदावर उतरले

म्हणजे किती सुंदर दिसतात ! परंतु माझे शब्द कागदावर खरडण्याकरितां नाहींतच; देशाच्या हृदयांत घुसण्याकरितां ते आहेत. शेतकीवरील आपला चर्चात्मक प्रबंध पंडित शाईनें लिहून ठेवतो; परंतु शेतकरी आपल्या नांगराच्या टोंकानें आपले श्रम भूमींत खोलवर ठसवितो.

४

पुन्हां जेव्हां मला विमल भेटली तेव्हां मीं कांहीं आडपडदा न ठेवतां किल्ली खूप जोरानें फिरविली. मी म्हणालों, " मीं तुम्हांला कितीदां सांगितलें आहे कीं, तुम्ही जर मला दिसलां नसतां तर सर्व देश एकरूपानें मला दिसून आला नसता. मी काय म्हणतों हें तुम्हांला नीट समजलें आहे कीं नाहीं हें मला अद्याप माहीत नाहीं. देव फक्त स्वर्गांत अदृश्य असतात; भूमीवर ते स्वतःच मर्त्य मनुष्यांच्या दृष्टीस पडतात. "

माझ्याकडे अगदीं चमत्कारिक तऱ्हेनें बघून विमल गंभीरपणें म्हणाली, " संदीप, तुमचें सर्व म्हणणें मला समजतें. " पहिल्यांदांच तिनें मला ' संदीप ' अशा साध्या नांवानें हांक मारली.

" कृष्णाला अर्जुन, " मी पुढें म्हणालों, " केवळ आपला सारथि समजत होता. परंतु त्याच्या ठायीं सुद्धां परमेश्वराचें विश्वरूप होतें आणि अर्जुनालाही तें एकदां पाहावयास मिळालें. त्याच दिवशीं त्याला सत्य समजून आलें. तुमचें विश्वरूप

मला माझ्या देशांत दिसून आलें आहे. गंगेच्या आणि ब्रह्मपुत्रेच्या प्रवाहांत मला तुमच्या गळ्याभोंवतीं असणाऱ्या सोन्याच्या माळा दिसून येतात. नदीच्या दोनही तटांवरील दूरच्या काळ्या घनदाट झाडीमध्यें मला सुरम्याच्या अंजनानें काळ्या झालेल्या तुमच्या डोळ्यांच्या पापण्या दृश्यमान होतात. तुमच्या लुगड्याचें एकसारखें बदलणारें तेज मला हिरव्या धान्याच्या अंकुरांतील प्रकाश आणि सावली यांच्या खेळांत दृग्गोचर होतें; आणि ज्या उन्हाळ्यांतील तेजस्वी उष्णतेमुळें आकाश एकाद्या वालुकामय प्रदेशांतील लाल जिभेच्या सिंहाप्रमाणें धांपा टाकीत आहे कीं काय असें वाटतें, त्या उष्णतेंत तुमची ही दुष्ट, निर्दय आरक्तता–तेजस्विता–मला दिसते."

"देवीनें ज्या अर्थीं आपल्या भक्तावर अशा आश्चर्यजनक वेषांत दर्शन देऊन अनुग्रह केला आहे, त्या अर्थीं तिची भक्ति सर्व देशानें केली पाहिजे असें मला जाहीर केलेंच पाहिजे. मग देशाला नवजीवन प्राप्त होईल. 'तोमारि प्रतिमा गडि मंदिरे मंदिरे.' आम्ही तुझी प्रतिमा देवळोदेवळीं करूं. परंतु लोकांच्या हें सर्व अद्याप नीट ध्यानांत आलें नाहीं. म्हणून तुमच्या नांवानें मी त्यांना जागे करतों आणि तुमची मूर्ति आराधनेसाठीं त्यांच्या पुढें करतों. मग तिची आराधना केल्याखेरीज कोणी राहणार नाहीं. एवढा वर–एवढी शक्ति–मला तुम्ही कृपा करून द्याच!"

विमलेनें पापण्या झांकल्या आणि ती बसल्या जागीं स्फटिकाच्या मूर्तीप्रमाणें निश्चल राहिली. मी जर तसाच बोलत

राहिलों असतों तर तिचा तेव्हांच तंद्री लागली असती. मी थांबलों तेव्हां तिनें डोळे ताठ उघडले आणि चकित झाल्यासारखी माझ्याकडे तीव्रतेनें टक लावून ती पुटपुटली, "हे नाशपथावरील प्रवाशा! असा कोण या भूमीवर आहे कीं जो तुझी चाल अडवील? तुझ्या इच्छेच्या आड कोणी येऊं शकणार नाहीं हें काय मला समजत नाहीं? राजे आपले मुकुट तुझ्या पायांशीं अर्पण करतील; तूं स्वीकार करावास म्हणून श्रीमंत लोक आपल्या तिजोऱ्या घाईघाईनें उघड्या करूं लागतील; ज्यांच्या जवळ दुसरें कांहींच नाहीं ते आपलें जीवितच अर्पण करतील. तूं माझा राजा आहेस—माझा परमेश्वर आहेस. तुझ्या वैभवाची गाढता माझ्या हृदयांत भिनली आहे. तुझ्यापुढें मी कोणत्या झाडाचा पाला? अहाहा! किती भयंकर तुझी विनाशशक्ति! तिनें मला पूर्णपणें मारल्याखेरीज माझ्या खऱ्या जीविताला प्रारंभ होणार नाहीं. मला आतां ती अगदीं सहन होत नाहीं. माझें हृदय फुटत आहे."

विमल हळूच आपल्या जागेवरून उठली आणि माझ्या पायांशीं तिनें लोटांगण घातलें. माझे पाय हातांनीं गच्च धरून मोठ्या आवेगानें स्फुंदस्फुंदून ती रडूं लागली.

ही मोहिनीविद्या खरी!—या जादूनें सर्व जगाला जिंकतां येईल. कांहीं साधन नको; कांहीं हत्यारें नकोत. फक्त अनिवार्य अशा प्रलोभनाची माया पुरे आहे! 'सत्यमेव जयते' असें कोण म्हणतो? मोहच शेवटीं यशस्वी होणार! बंगालनें जेव्हां सिंहावर बसलेली अशी दशभुजा देवीची

प्रतिमा उत्पन्न करून तिची भक्ति सर्व बंगालभर पसरविली तेव्हां त्याला हें तत्त्व चांगलें समजलेलें होतें. जगाला मोहून जिंकण्यासाठीं बंगालनें आतां नवीन प्रतिमा—मूर्ति—उत्पन्न केली पाहिजे. वंदे मातरम् !

विमलला हळूच उचलून मीं खुर्चीवर नेऊन बसविलें. प्रतिक्रिया सुरू होऊं नये म्हणून वेळ न घालवितां मी पुन्हां म्हणालों, " राणी, देवी आईनें आपली भक्ति सर्व देशभर पसरविण्याचें कार्य माझ्यावर टाकलें आहे. परंतु अरेरे ! मी दरिद्री आहें ! "

विमल अजून लज्जेनें आरक्त झालेली होती. तिचे नेत्र अंधुक आणि तिचें बोलणें जड होतें. तिनें उत्तर दिलें, " तुम्ही दरिद्री ? प्रत्येकाचें जें जें कांहीं आहे तें तुमचेंच नाहीं काय ? माझ्या जवाहिरानें भरलेल्या पेट्या काय करावयाच्या आहेत ? तुमच्या भक्तीसाठीं हें सोनें आणि हीं रत्नें माझ्या आंगावरून काढून घ्या. मला त्यांचा कांहीं उपयोग नाहीं ! "

पूर्वी एकदां विमलनें आपले दागिने देऊं केले होते. कोणत्याही बाबतींत मर्यादा घालण्याची मला कांहीं नेहमींची संवय नाहीं; परंतु या बाबतींत मर्यादा घालणें जरूर आहे असें मला वाटलें. हा असा संकोच मला कां वाटतो हें मी जाणतों. दागिने पुरुषानें स्त्रीस द्यावयाचे असतात. ते स्त्रीपासून घेणें म्हणजे त्याच्या पुरुषपणाला बट्टा लागतो.

परंतु मीं स्वतःला विसरलें पाहिजे. ते काय मी घेतों

आहे ? ते देवी मातेसाठीं भक्तीनें तिच्या पायांवर ओतण्यासाठीं घ्यावयाचे आहेत. परंतु खरोखर देशांत आजपर्यंत कोणीं पाहिला नाहीं इतका मोठा आणि झोकांत तो समारंभ झाला पाहिजे. आमच्या इतिहासांत तो महत्त्वाचा गणला गेला पाहिजे. माझी ती देशाला एक अत्युच्च–सर्वश्रेष्ठ–ठेव होईल. अज्ञ लोक देवतांची आराधना करतात. मी संदीप त्या देवतांना उत्पन्न करतों.

पण ही सगळी फार लांबची ओरड आहे. अगद जरूरीच्या भिडलेल्या गोष्टीसंबंधीं काय ? तीन हजार हे अगदीं पाहिजेतच—पांच हजारांनीं सफाईदार काम होईल. परंतु आम्ही आतां इतक्या उंच वातावरणांत उडालों असतांना मी पैशाचें नांव तरी कोणत्या तोंडानें काढूं ? आणि जातो तो क्षण तर लाखाचा आहे !

मीं सगळा संकोच पायांखालीं चिरडून टाकला आणि उडी मारून उठून धीर करून म्हणालों, " राणी ! आमच्या पिशवींत कांहीं नाहीं; आमचें कार्य थांबण्याच्या बेतांत आलें आहे ! "

विमल दचकून मागें सरली. त्या अशक्य ५०००० संबंधीं तिच्या मनांत विचार आला असावा हें मीं तेव्हांच जाणलें. तिच्या हृदयावर त्यांचें केवढें वजन बसलें असलें पाहिजे ! आणि त्याच्याशीं झगडत तिला कित्येक रात्री झोंपेविना घालवाव्या लागल्या असतील ! तिची प्रेममय भक्ति दाखविण्याला तिजजवळ दुसरें कोणतें साधन होतें ? आपलें

हृदय कांहीं तिला माझ्या चरणीं अर्पण करतां येत नाहीं ! तेव्हां ५०००० रुपयांची ती तिला मिळण्यास कठीण अशी रक्कम देऊन आपल्या कोंडलेल्या भावना व्यक्त कराव्या यासाठीं तिची तळमळ चालली आहे. त्यासाठीं तिला केवढ्या दिव्यांतून जावें लागत असेल याचा विचार मनांत येऊन माझ्या अंतःकरणाला चरका बसला. कारण आतां ती सर्वस्वीं माझी आहे. रोपा मुळासकट उपटून टाकण्यासाठीं चाललेली झटापट आतां संपली आहे. आतां काळजीपूर्वक जोपासना आणि पालनपोषण यांचीच आवश्यकता आहे.

"राणी !" मी म्हणालों, "त्या ५०००० रुपयांची आतांच कांहीं अगदीं जरूरी आहे अशांतला भाग नाहीं. माझा हिशोब आहे कीं, पांच हजार, तीन हजार सुद्धां, पुरतील."

यामुळें तिचें हृदय मोठ्या वजनापासून मुक्त होऊन उड्या मारूं लागलें. "पांच हजार रुपये मी तुम्हाला आणून देतेंच," असें म्हणतांना तिचा आवाज किती गोड होता ! राधेनें कृष्णाजवळ म्हटलेल्या एखाद्या शृंगारपरिपूर्ण आणि प्रेममय गीताच्या चालीवर ती गातच आहे कीं काय असा मला भास झाला. "पांच हजार रुपये मी आणतेंच" हें तिचें म्हणणें मला तालबद्ध वाटलें.

वीणेच्या संकुचित मुखामुळें हें इतक्या प्रकारचें मधुर गान बाहेर पडत होतें. वेणु पसरट होईल इतकें वजन मीं तिच्यावर घालतां उपयोगी नाहीं; नाहींतर या संगीताच्या

जागीं, "कां?" "एवढ्या मोठ्या रकमेची जरूरी काय?" "मला एवढी रक्कम कोठून मिळणार?" असे प्रश्न उपस्थित होतील; आणि मग या प्रश्नांतील एकही शब्द राधेच्या शृंगारमय काव्यांतील निनादाशीं मुळींच जुळणार नाहीं. म्हणून मी म्हणत होतों कीं, मोहच सत्य—वास्तविक—आहे; तो वीणाच आहे, आणि सत्य म्हणजे वीणेची पोकळी होय. अलीकडे अलीकडे निव्वळ पोकळपणाची—शून्यपणाची—आवड निखिलला उत्पन्न झाली आहे; त्याची ही आवड त्याच्या तोंडावर स्पष्ट दिसते आणि तीमुळें मला सुद्धां दुःख होतें. परंतु निखिलला अभिमान होता कीं मला फक्त सत्यच पाहिजे आहे. आणि मला असा अभिमान होता कीं, मी माझ्या पकडींतून मोह—भ्रम—कधींच जाऊं देणार नाहीं. प्रत्येक जण आपआपल्या रुचीप्रमाणें वागला. तेव्हां आतां कुरकूर काय म्हणून करा?

काल्पनिकतेच्या—भावनाप्रधानतेच्या—विरल वातावरणांतून विमलचें अंतःकरण निघूं नये म्हणून मी त्या ५०००० रुपयांसंबधीं बोलणें अगदीं बंद केलें आणि राक्षसविनाशिनी देवी व तिची भक्ति यांजकडे पुन्हां वळलों. उत्सवाचा समारंभ कोठें आणि केव्हां घडवून आणावयाचा हा प्रश्न होता. निखिलच्या इस्टेटींत 'रुइमारी' नामक गांवीं वार्षिक जत्रा भरत असते व त्या ठिकाणीं लाखों मनुष्य जमा होत असतें. ती जागा आमच्या देवीच्या भक्तीची प्रतिष्ठा करावयास फार उत्तम आहे असें आम्हीं ठरविलें.

विमल उत्साहानें भरून गेली. हें कांहीं विलायती कापड अथवा लोकांचीं कोठारें जाळावयाचें काम नव्हतें. तेव्हां निखिल सुद्धां याला कांहीं हरकत घेणार नाहीं, असें विमलला वाटलें. परंतु मी मात्र आपल्याशींच हंसलों. हीं दोघें जण आज सबंध नऊ वर्षें रात्रंदिवस एकत्र राहत आहेत तरी त्यांना एकमेकांची किती थोडी जाणीव आहे! घरांतील जीवितासंबंधीं थोडें थोडें तीं एकमेकांना ओळखतात, परंतु बाह्य घडामोडींत त्यांना एकमेकांची वृत्ति अगदींच कांहीं समजत नाहीं. आंतील जगाची बाह्य जगताशीं पूर्ण एकतानता आहे अशी त्यांची गोड समजूत होती. आज त्यांना स्वतःचें नुकसान होऊन कळून येत आहे कीं, इतकीं वर्षें आपण निष्काळजीपणानें नुकसान करून घेतलें तें भरून काढणें आणि अंतर्बाह्य एकतानता घडविणें, हीं कामें करण्याची योग्य वेळ केव्हांच निघून गेली!

आपल्याला काय त्याच्याशीं करावयाचें आहे? ज्यांच्या हातून चूक झाली ते वाटेल तर जगताशीं—भवचक्राशीं—धक्के खाऊन झालेली चूक दुरुस्त करतील. त्यांच्या दुःस्थितीविषयीं मीं माझ्या चित्ताला व्यर्थ शीण कां द्यावा? पकडलेल्या विमानाप्रमाणें आपल्या इच्छेनुरूप विमलेला अंतरिक्षांत उंच उडवीत ठेवण्याचा मला आतां कंटाळा वाटूं लागला आहे. आपल्या हातांतील गोष्टीचा शेवटपर्यंत छडा लावणें—तिचा निकाल लावून ती पार पाडणें—हेंच श्रेयस्कर.

विमल जेव्हां जावयाला निघाली आणि दाराशीं पोंचली

तेव्हां मी अगदीं अगदीं स्वाभाविक अशा तऱ्हेनें म्हणालों, " तेव्हां आतां पैशासंबंधीं—"

विमल थांबली आणि घराकडे पाठ व मजकडे तोंड करून म्हणाली, " या महिन्याच्या शेवटीं आम्हांला खर्चाला मिळणारे पैसे मिळतील; तेव्हां—"

" मला वाटतें हा फार उशीर होतो. "

" मग तुम्हांला केव्हां पाहिजे रक्कम ? "

" उद्यां. "

" उद्यां मिळेल तुम्हांला ती. "

## प्रकरण तेरावें

### निखिलची आत्मकथा

१

स्थानिक वर्तमानपत्रांतून माझ्याविरुद्ध स्फुटें आणि पत्रें येऊं लागलीं आहेत; लवकरच विनोदी व वेडींवांकडीं चित्रें आणि लेख येऊं लागणार आहेत असें सांगतात. कोट्या आणि विनोद यांच्या कालकूटाचे फवारे आजूबाजूला उडविण्यांत येत आहेत आणि अशा रीतीनें खोट्या गोष्टी सर्व देशभर पसरवून क्षोभ उत्पन्न करण्यांत येत आहे. चिखल फेकण्याचें काम फक्त आपल्याकडेच मक्त्यानें आहे आणि बाजूनें जाणारा निरपराधी मनुष्य कांहीं चिखल आंगावर उडाल्याखेरीज जाणें शक्य नाहीं, हें ते चांगलें जाणतात.

ते म्हणतात कीं, माझ्या वतनवाडींत राहणारे लहानापासून थोरापर्यंत सर्व लोक स्वदेशीच्या बाजूचे आहेत; परंतु

माझ्या भीतीमुळें तसें जाहीर करण्यास ते धजत नाहींत. आणि ज्या थोड्या लोकांनीं धीर करून तसें जाहीर केलें त्यांना माझ्या जुलुमाचा जबर तडाखा सोसावा लागत आहे. मी पोलिसशीं आंतून सहकार्य करीत असतों आणि मामलतदाराशीं माझें खासगी संधान असतें. आनुवंशिक रीतीनें मला जी 'राजा' ही पदवी मिळाली आहे तिच्या जोडीला स्वतः मिळविलेली अशी एखादी विदेशी पदवी मिळविण्याचे माझे जोरानें प्रयत्न चालले आहेत, व ते फुकट जाणार नाहींत, असेंही ते जाहीर करतात.

उलट, कुंडू आणि चक्रवर्ती जमीनदार यांच्यासारख्या देशाला सर्वस्वीं वाहून घेतलेल्या मातृभूमीच्या पुत्रांच्या स्तुतीनें वर्तमानपत्रांचे रकाने भरलेले असतात. देशांत त्यांच्यासारखे कट्टे देशाभिमानी असे आणखी थोडे लोक असते तर म्यांचेस्टरच्या व्यापाऱ्यांना सुद्धां आपल्या गीताचें पालुपद आणि छंद 'वंदे मातरम्' चाच केला पाहिजे होता असें ते म्हणतात.

त्यानंतर रक्तासारख्या लाल शाईनें लिहिलेलें एक पत्र आलें. त्यांत कार्याला साहाय्य करण्याचें नाकारल्यामुळें ज्यांचीं भांडारें जाळलीं गेलीं अशांची एक यादी दिलेली होती. त्यांत आणखी असेंही लिहिलें होतें कीं, देशाला पवित्र करण्याचें आपलें उच्च कर्तव्य ध्यानांत येऊन अग्नि आतां जागा झाला आहे. आणि जे

मातृभूमीचे खरे पुत्र नाहींत ते तिच्या मांडीवर लोळूं नयेत म्हणून व्यवस्था करण्याचें काम सृष्टींतील इतर शक्तींनींही आपल्या आंगावर घेतलें आहे. पत्रावर सही अर्थात नामधारी मनुष्याचीच होती.

हें सगळें स्थानिक विद्यार्थ्यांचें काम आहे हें मीं तेव्हांच ओळखलें. तेव्हां त्यांच्यापैकीं कांहींना बोलावून त्यांना तें पत्र मीं दाखविलें.

बी. ए. चा एक विद्यार्थी गंभीरपणें म्हणाला, " आम्ही सुद्धां ऐकलें आहे कीं, जिवावर उदार झालेल्या कांहीं स्वाभिमानी लोकांचा एक कंपू बनला असून स्वदेशी चळवळ यशस्वी करण्याच्या मार्गांत येणारे अडथळे दूर करतांना कशाचाही विचार करावयाचा नाहीं असा त्यांचा निश्चय झाला आहे."

" असल्या उद्धट आततायीपणाला आमच्या देशबांधवांपैकीं एक जरी बळी पडला तरी आमच्या देशाचें तें अपयशच असें मी समजेन." मी म्हणालों.

" महाराज, आम्हांला तुमचें म्हणणें समजत नाहीं." एक इतिहासाचा विद्यार्थी म्हणाला.

मी स्पष्टीकरण करण्याच्या हेतूनें म्हणालों, " निव्वळ भीतीमुळें आमचा देश मृत्यूच्या द्वारापर्यंत येऊन ठेपलेला आहे. आम्हांला तहत परमेश्वरापासून अगदीं भिकार पोलिसापर्यंत सर्वांची भीति वाटते. स्वातंत्र्याच्या नांवानें तुम्ही आणखी एखादा बागुलबोवा उत्पन्न करणार असाल;

मग त्याला तुम्ही वाटेल तें नांव द्या. तुम्ही आपलें विजयी निशाण देशाच्या भित्रेपणावर जर धडधडीत जुलुमानें रोवणार असाल तर देशावर खरेंखुरें प्रेम करणारा कोणीही मनुष्य तुमच्या म्हणण्याला मान वांकविणार नाहीं."

"असा एक तरी देश आहे काय," इतिहासाचा विद्यार्थी पुढें म्हणाला, "कीं जेथें सरकारला लोक नमतात ते भीतीमुळें नमत नाहींत?"

मीं उत्तर दिलें, "कोणत्याही देशाचें स्वातंत्र्य त्यांत भीतीचें वर्चस्व कोठपर्यंत आहे यावरून मापतां येईल. ज्या ठिकाणीं भीतीची धमकी केवळ दुसऱ्याला दुःख देणारावर अथवा लुटणारावर असते, तेथल्या राज्यव्यवस्थेनें मनुष्याला मनुष्याच्या जुलुमापासून सोडविलें असें म्हणतां येईल. परंतु लोकांनीं पोशाख कसा करावा, व्यापार कसा करावा, काय खावें, येथपर्यंत जर भीतीच्या जोरावर नियमन केलें तर त्या ठिकाणीं मनुष्याचें स्वातंत्र्य पूर्णतः नाकारलें जातें आणि त्याचें पुरुषत्व मुळांतच उपटलें जातें असेंच म्हटलें पाहिजे."

"वैयक्तिक इच्छाशक्तीवर इतर देशांतही असाच जुलूम चाललेला नाहीं काय?" इतिहासाचाच विद्यार्थी पुन्हां म्हणाला.

"कोण नाहीं म्हणतो?" मी उद्गारलों. "परंतु प्रत्येक देशांत मनुष्यानें ज्या प्रमाणांत गुलामगिरी उत्पन्न केली आहे तितक्याच प्रमाणांत आपली मानुषता गमविली आहे."

"यावरून असें दिसत नाहीं काय," एक एम. ए.

म्हणाला, " कीं, अशा तऱ्हेनें गुलामगिरीचा व्यापार करण्याची वृत्ति मनुष्याला उपजतच प्राप्त झालेली असते; त्याच्या स्वभावाचाच तो एक भाग आहे. "

एक बी. ए. म्हणाला, " संदीपबाबूंनीं आम्हांला ही गोष्ट स्पष्ट करून सांगितली. तुमच्या शेजारचे जमीनदार हरीश कुंडू यांचें त्यांनीं उदाहरण दिलें व ते म्हणाले, ' त्याच्या इस्टेटीमध्यें शोधूं म्हणूं गेल्यास तुम्हांला विलायती मीठ एक तोळाभर देखील सांपडणार नाहीं. याचें कारण काय ? त्यानें लोखंडी हातानें आपली सत्ता चालविली आहे म्हणून. जे स्वभावतःच परावलंबी—गुलाम—आहेत त्यांना बळकट धनी न मिळणें यासारखें महासंकट दुसरें कसलेंच नाहीं. ' "

एक अंडरग्राज्युएट आपलें घोडें मध्येंच दामटून म्हणाला, " काय साहेब ! तुमच्या शेजारचे दुसरे जमीनदार चक्रवर्ती, त्यांच्या कटकट्या कुळाची हकीकत तुम्हीं नाहीं ऐकलीत वाटतें ! त्याच्यावर कोर्टांत काम चालून तो अगदीं कफल्लक झाला व शेवटीं अगदींच कांहीं खावयाला नाहींसें झालें तेव्हां त्यानें आपल्या बायकोचें कांहीं खिडूकमिडूक विकावयास काढलें. परंतु तें कोणी विकत घ्यावयालाच तयार होईना. त्याची किंमत चांगली तिसांवर होती. चक्रवर्तींच्या कारभाऱ्यानें त्यास त्याचे अवघे पांच रुपये देऊं केले ! ते कबूल करण्याशिवाय त्याला गत्यंतरच नव्हतें; नाहींतर त्याला भुकेनें मरावें लागलें असतें. त्याच्याकडून ती पुरचुंडी

घेतल्यावर कारभाऱ्यानें त्याला शांतपणें सांगितलें कीं, तुझे पांच रुपये तुझ्या धान्यांत जमा होतील! आतां चक्रवर्तीशीं अथवा त्यांच्या कारभाऱ्याशीं आपलें कांहीं काम राहिलें नाहीं असें आम्हांला वाटलें; परंतु संदीपबाबूंनीं आम्हांला सांगितलें कीं, जागृत लोकांना जर आपण असे सोडून देऊं लागलों तर मग आपल्याला श्मशानांतील प्रेतें आपलें काम करण्यासाठीं घ्यावीं लागतील. या जागृत लोकांना आपल्याला काय पाहिजे आणि तें कसें मिळवावें हें चांगलें कळतें—ते जन्मतःच सत्ताधारी–हुकूम गाजविणारे–असतात. स्वतः कशाचीही इच्छा ज्यांना करतां येत नाहीं त्यांनीं अशांच्या इच्छेप्रमाणें जगलें पाहिजे; अथवा अशांच्या इच्छेसाठीं मेलें पाहिजे. संदीपबाबूंनीं त्यांची—कुंडू आणि चक्रवर्ती यांची—आपल्याशीं तुलना केली महाराज! आपले हेतु कितीही चांगले असले तरी स्वदेशीचें बीज आपल्या प्रांतांत रुजविण्याचें सामर्थ्य आपल्या आंगीं नाहीं असें ते म्हणाले."

"स्वदेशीपेक्षां कांहीं तरी उच्च अशा गोष्टीचें बीज पेरावें अशी माझी इच्छा आहे." मी म्हणालों. "मला कांहीं मृत लांकडाचे तुकडे नको आहेत—जिवंत वृक्षच हवे आहेत. परंतु असे वृक्ष वाढण्यास काळ लागणारच."

इतिहासाचा विद्यार्थी तिरस्कारानें म्हणाला, "मला वाटतें कीं, आपल्याला मेलेलें लांकूडही मिळणार नाहीं आणि जिवंत वृक्षही मिळणार नाहींत. आपल्याला जर कांहीं

मिळवावयाचें असेल तर तें हिसकावणें हाच त्याचा मार्ग असें संदीपबाबू सांगतात तेंच खरें! हें पटावयास वेळ लागतो आहे याचें कारण आम्ही शाळेंत जें कांहीं शिकलों त्याच्या हें अगदीं विरुद्ध आहे. मीं आपल्या डोळ्यांनीं पाहिलें आहे कीं, हरीश कुंडूच्या पटवाऱ्याला धारा वसूल करण्यासाठीं विकावयास एका कुळाजवळ कांहींच मिळेना. तेव्हां त्याला आपली तरुण बायको विक्रीस काढावी लागली! गिऱ्हाइकांना कांहीं तोटा नव्हता आणि जमीनदाराची मागणी पुरी झाली! त्याचें दुःख पाहून मला कित्येक रात्री झोंप आली नाहीं हें खरें. परंतु पैसा मिळवावयाचा म्हणून मनुष्य बाहेर पडला असतां आपल्या ऋणकोची बायको विकावी लागली तरी बेहेत्तर परंतु आपला पैसा कसा मिळवावा हें ज्याला समजतें तोच खरा पुरुष, असें मला वाटूं लागलें! मी कबूल करतों कीं, माझ्यानें हें होणें नाहीं—मी अगदीं कमकुवत आहें. माझ्या डोळ्यांत अश्रू उभे राहतात. आमच्या देशाचें कोणी संरक्षण करूं शकतील तर कुंडू, चक्रवर्ती आणि त्यांचे नोकर हेच करूं शकतील!"

हें ऐकून मला अनिर्वचनीय धक्का बसला. "तुम्ही म्हणतां हें जर खरें असेल," मी ओरडलों, "तर असले हे कुंडू, चक्रवर्ती व त्यांचे नोकर यांच्यापासून माझ्या देशाचें संरक्षण करणें हेंच कार्य मला सर्वकाळ झटून केलें पाहिजे असें मी समजतों. आमच्या हाडींमासीं भिनलेली गुलामगिरी आतां पैशाचिक जुलुमाच्या रूपानें आमचें शरीर भेदून बाहेर

पडत आहे. अधिकारापुढें भीतीनें मान वांकविण्याची तुम्हाला इतकी संवय लागली आहे कीं, आपल्याप्रमाणेंच दुसऱ्याला मान वांकवावयास लावणें याला तुम्ही धर्म समजतां ! या कमकुवतपणाविरुद्ध, या राक्षसी क्रौर्याविरुद्ध, मी सर्वस्वाचा होम करून लढेन. ”

ज्या गोष्टी साधारण मनुष्याला अगदीं साध्या वाटतात त्यांना आमचे हे बी. ए. आणि एम. ए. किती विकृत स्वरूप देऊन त्यांतून किती भलताच अर्थ काढतात ! सत्याचे वाभाडे काढणें एवढाच यांच्या ऐतिहासिक अभ्यासाच्या लटपटीचा अर्थ दिसतो.

२

पंचूच्या बनावट चुलतीबद्दल माझ्या मनाला मोठी रुखरुख लागून राहिली आहे. ती त्याची चुलती नाहीं हें सिद्ध करणें कठीण आहे. कारण वास्तविक घडलेल्या गोष्टीबद्दल साक्षीदार अगदीं थोडे, कधीं कधीं तर मिळतही नाहींत; परंतु जी गोष्ट मुळीं घडलीच नाहीं, तिच्या समर्थनार्थ वाटेल तेवढीं प्रमाणें पुढें आणतां येतात. या सगळ्या हालचालीचा अर्थ मीं जें पंचूचें वतन विकत घेतलें आहे तें त्यानें सोडून द्यावें हा आहे हें तर अगदीं उघड आहे.

या भानगडींतून दुसरा तिसरा कांहीं मार्ग नाहीं असें

जेव्हां मला पक्कें समजून चुकलें तेव्हां पंचूला आपल्याच इस्टेटींत एक कायमची कूळवाडी द्यावी आणि घर बांधून द्यावें, असा माझा विचार चालला होता. परंतु गुरुजी तसें करूं देईनात. ‘त्यांच्या नीच डावपेचांना तूं इतक्या लौकर बळी पडूं नकोस. मी स्वतःच या बाबतींत सर्व कांहीं अंगावर घेतों’ असें त्यांचें म्हणणें पडलें.

मला बरेंच आश्चर्य वाटून मीं म्हटलें, “तुम्ही स्वतः!”

“होय, मी स्वतः.” ते पुन्हां म्हणाले.

या कायदेशीर कारस्थानांना गुरुजी कसा काय बंधारा चालणार हें मला कांहीं नीटसें कळलें नाहीं. रोज संध्याकाळीं ते माझ्याकडे येत. परंतु त्या दिवशीं कांहीं ते आले नाहींत. विचारपूस करतां एका लहानशा पेटींत कांहीं थोडया वस्तु आणि लहानसें अंथरूण घालून थोडक्याच दिवसांत परत येतों असें सांगून ते घरांतून निघून गेले असें मला त्यांच्या गड्याकडून समजलें. पंचूच्या चुलत्याच्या गांवीं साक्षीदार हुडकण्यासाठीं बहुधा ते गेले असावे असें मला वाटलें. तसें असेल तर त्यांचा शोध सर्वस्वीं व्यर्थ जाईल असा मला अगदी पक्का भरंवसा होता.

सर्व दिवसभर कामांत गुंतल्यामुळें मी स्वतःला विसरलों. शरदृतूंत संध्याकाळ होऊं लागली म्हणजे आकाशाचा रंग गढूळ होऊं लागतो, तशाच माझ्या मनाच्या भावनाही

संध्याकाळ होऊं लागली कीं गढूळ होऊं लागतात. प्रियकरिणीच्या काळ्याभोर डोळ्यांच्या टक लावून पाहण्याप्रमाणें संध्याप्रकाश जसजसा सर्व जगभर निगूढ होत जातो तसतसें माझें सर्व शरीर मला सांगूं लागतें कीं, काम हेंच कांहीं जीवितांतील एक सत्य नाहीं; काम हेंच फक्त मनुष्याचें सर्व जीवित अथवा ध्येय असत नाहीं. कारण मनुष्य कांहीं निव्वळ दासच नाहीं—सत्य आणि हित यांचा तो दास असला तरी सुद्धां त्याचें सर्व स्वातंत्र्य कांहीं नष्ट होत नाहीं. अरेरे! निखिल, जो तुझा आत्मा चांदण्याच्या प्रकाशांत स्वतंत्रपणें बागडत असे आणि दिवसाचें काम झाल्यावर रात्रीच्या अंधाराच्या अपरिमित खोलींत उडी घेत असे, त्याची आणि तुझी कायमची ताटातूट झाली काय? संसाराच्या अनेकविधतेंत व सामुदायिकतेंत ज्याची सोबत गमावते त्याचा एकांत किती भयंकर असतो!

परवां एके दिवशीं रात्र आणि दिवस यांच्या भेटीच्या समयीं मला काम नव्हतें आणि काम करावेंसें वाटतही नव्हतें. भरींत भर, माझ्याशीं गप्पा मारावयाला गुरुजीही नव्हते. मीं शून्य, भटकणाऱ्या आणि कोठें तरी व कशावर तरी नांगर टाकून स्थिर होऊं इच्छिणाऱ्या अंतःकरणानें आंतील बागेकडे आपला मोर्चा वळविला. क्रिसांथिमम नांवाच्या विलायती फुलझाडाची मला मोठी आवड असे, आणि म्हणूनच भिंतीच्या कडेनें मीं त्याच्या सर्व जातींच्या कुंडयांची रांग लावून ठेवली होती. त्यांना फुलें आलीं म्हणजे इंद्रधनुष्यमय फेसानें युक्त

अशी हिरव्या रंगाची लाटच उसळते आहे कीं काय असा भास होई. आज बरेच दिवस मी इकडे आलों नव्हतों तेव्हां एवढ्या दीर्घ विरहानंतर आपल्या क्रिसांथिमम झाडांना आतां आपल्याला भेटावयास सांपडणार या भावनेनें उत्सुक होऊन माझें मन थोडें उल्हसित झालें.

मी आंत गेलों तों पूर्ण चंद्र नुकताच कुंसावरून डोकावूं लागला होता. परंतु त्याचे किरण तिरपे असल्याकारणानें कुंसाच्या बुंधांत कुंसाचीच गाढ छाया कायम होती. मला वाटलें कीं, मागून पायांच्या चवड्यावर येऊन चंद्रानें हळूच डोळ्यांपुढील अंधाराला पकडलें असावें आणि चेष्टेखोरपणानें तो हंसत असावा. मी क्रिसांथिममच्या कुंड्यांच्या रांगेशीं आलों तेव्हां तेथें गवतावर निजलेली एक आकृति मला दिसली. माझ्या हृदयांत एकदम धस्स झालें. ती आकृति सुद्धां माझ्या चाहुलीनें दचकून उठून बसली.

आतां यापुढें काय करावें ? तेथून पळ काढावा कीं काय अशा भ्रांतींत मी पडलों होतों. सुटून जाण्याला कांहीं मार्ग आहे काय हें पाहण्यासाठीं विमल सुद्धां इकडे तिकडे पाहत होती. पण जसें थांबणें तसेंच जाणेंही प्रत्येकाला कसेंसेंच वाटत होतें ! माझ्या मनाचा कांहींच निश्चय झाला नाहीं तोंच विमल उठली, तिनें तोंडावर पदर ओढला आणि ती अंतर्गृहांत जाण्यासाठीं निघाली.

विमलच्या या क्षणभर संशयित रीतीनें थांबण्यावरून तिच्या दुःखाचें ओझें किती तीव्र असलें पाहिजे याची मला

बरोबर जाणीव उत्पन्न झाली. माझ्या जीविताची दुःस्थिति माझ्या मनांतून तेव्हांच नाहींशी झाली. मीं हांक मारली; " विमल ! "

ती दचकून पुढें जाण्याची बंद राहिली. परंतु तिनें मागें वळून पाहिलें नाहीं. मीच जाऊन तिच्यापुढें उभा राहिलों. तिचें मुख सावलींत होतें, परंतु माझ्या तोंडावर चंद्राचा पूर्ण प्रकाश पडला होता. तिचे डोळे जमिनीकडे लागले होते व हातांचीं बोटें एकमेकांत घालून तिनें घट्ट मूठ वळलेली होती.

" विमल, " मी म्हणालों, " माझ्या या बंद पिंजऱ्यामध्यें मी तुला अडकवून कशाला ठेवूं ? त्यामुळें तूं झुरून एक दिवस अंत पावशील—कोमेजशील—हें काय मला कळत नाहीं ? "

ती स्थिर आणि स्तब्ध राहिली. तिनें डोळेही वर उचलले नाहींत अथवा एक शब्दही उच्चारला नाहीं.

मी पुढें म्हणालों, " मी तुला बेडी घालून ठेवण्याचाच जर हट्ट धरला तर माझें जीवित म्हणजे एक लोखंडी साखळदंडच होऊन जाईल हें मी जाणतों. तसें होण्यांत मला काय सुख आहे ? "

अजूनही ती स्तब्धच होती.

मी पुन्हां म्हणालों, " तेव्हां विमल, मी तुला खरोखर सांगतों कीं, तूं सर्वस्वीं स्वतंत्र आहेस. माझा तुझ्याशीं आजपर्यंत कसलाही संबंध आला असला अथवा नसला, तरी यापुढें मी तुझ्या मार्गांत आड येऊं इच्छीत नाहीं—मी

तुझी बेडी होऊं इच्छीत नाहीं." असें म्हणून मी बाहेरच्या दिवाणखान्यांत आलों.

छे! छे! ही कांहीं उदार ऊर्मी अथवा उदासीनताही नव्हे. दुसऱ्याला स्वतंत्र केल्याखेरीज स्वतःला स्वतंत्र होतां येणार नाहीं असें मला समजून आलें होतें एवढेंच काय तें! विमलला माझ्या गळ्याभोंवतीं हाराप्रमाणें लोंबत ठेवणें म्हणजे माझ्या हृदयावर एक प्रकारचें दडपणच ठेवण्यासारखें होतें. सुख जर माझ्या वांट्यालाच नसेल तर तें खुशाल जावो; माझ्या वांट्याला दुःखच असेल तर तें खुशाल येवो; पण मीं कोणाच्याही बंधनांत राहूं नये असें मी परमेश्वराला अगदीं अंतःकरणपूर्वक जोरानें विनवीत नाहीं काय? जें अवास्तविक आहे त्याला वास्तविक म्हणून गच्च धरून ठेवणें म्हणजे स्वतःचीच गळचेपी करण्यासारखें आहे. अशा आत्मनाशापासून माझें संरक्षण होवो!

मी आपल्या खोलींत गेलों तों गुरुजी माझी वाट पाहत बसलेले दिसले. माझे क्षुब्ध विकार अद्याप माझ्या अंतःकरणांत उसळत होते. मी नमस्कार न करतां एकदमच सुरुवात केली.

"स्वातंत्र्य! स्वातंत्र्य हें मनुष्याच्या दृष्टीनें सर्वांत मोठें आहे—त्याच्याशीं कशाचीच तुलना करतां येणार नाहीं—अगदीं कशाची नाहीं!"

माझ्या स्फोटामुळें चकित होऊन गुरुजी माझ्याकडे पाहत स्तब्ध राहिले. मी पुढें म्हणालों;

"मनुष्याला पुस्तकें वाचून कांहीं कळत नाहीं. धर्मग्रंथांत आम्ही वाचतों कीं, मनुष्याच्या इच्छा म्हणजे बंधनें असून तीं त्याला तशीं दुसऱ्यालाही ग्रासतात. परंतु हे नुसते शब्द किती पोकळ आहेत! जेव्हां पक्षी पिंजऱ्यांतून मोकळा सोडून देण्यापर्यंत आपली मजल येते त्याच वेळेस आपल्यालाही तो पक्षी कसें स्वतंत्र करतो याची खरी जाणीव आपल्या ठायीं उत्पन्न होते. हीच गोष्ट जगाला समजलेली आहे. सर्व जण आपली स्वतःची बाह्य सुधारणा करूं चाहतात. परंतु खरी सुधारणा स्वतःच्या इच्छांमध्यें व्हावयाला पाहिजे आहे; दुसरीकडे कोठेंही नाहीं—अगदीं कोठें नाहीं!"

आज गुरुजी कित्येक दिवस बाहेर गेले होते आणि त्याचें कारण आपल्याला माहीत नाहीं, याची मला एकाएकीं आठवण झाली. मला अंतःकरणांत कसेंसेंच वाटून मीं विचारलें, "आणखी आपण आज इतके दिवस कोठें होतां गुरुजी?"

"पंचूकडे राहत होतों."

"खरें कीं काय?" मीं चकित होऊन विचारलें, "इतके सगळे दिवस आपण तेथेंच होतां?"

"होय. त्याची चुलती म्हणून जी आपल्याला म्हणवितें त्या बाईची मला समजूत घालावयाची होती. आपल्या आसपासच्या म्हाताऱ्या लोकांत माझ्यासारखा तिच्या येथें पाहुणा जाणारा कोणी असेल अशी तिला कल्पनाही नसावी. तेथून न हालण्याचा माझा निश्चय जेव्हां तिनें पाहिला तेव्हां

तिची तिलाच थोडीशी लाज वाटूं लागली. 'आई साहेब,' मी म्हणालों, 'तुम्हीं मला अगदीं शिव्या दिल्यात तरी मी कांहीं तुम्हांला सोडणार नाहीं. आणि मी जितके दिवस राहीन तितके दिवस पंचूही पण राहील. कारण तुम्ही असें पहा—येईलच तुमच्या ध्यानांत—पंचूच्या मुलांनीं रस्त्यावर जाऊन भिक्षा मागावी हें माझ्याच्यानें पाहवणार नाहीं.'"

"अशा प्रकारचीं माझीं बोलणीं तिनें होय अथवा नाहीं कांहींच न म्हणतां दोन दिवस ऐकून घेतलीं. आज सकाळीं ती आपली बांधाबांध करूं लागली. आम्हांला आपले प्रवासखर्चापुरते पैसे द्या म्हणजे आम्ही वृंदावनाला निघून जातों असें ती म्हणूं लागली. ती कांहीं वृंदावनाला जाणार नाहीं आणि तिची प्रवासखर्चाची मागणीही पण भलीभक्कम असणार हें मीं ओळखलें; म्हणून मी तुजकडे आलों आहें."

"तिला लागणारा खर्च जरूर द्यावा," मीं उत्तर दिलें.

"ती म्हातारी कांहीं वाईट प्रकारची नाहीं." गुरुजी गुणगुणत म्हणाले, "पंचूला कांहीं तिची जात खात्रीशीर ठाऊक नव्हती. तेव्हां तो तिला आपल्या पाण्याच्या घड्याला अथवा दुसऱ्या कशालाही हात लावूं देईना. म्हणून त्यांची एकसारखी बाचाबाची चालली होती. परंतु मीं जेव्हां तिला स्पर्श करावयाला आडकाठी केली नाहीं तेव्हां ती माझ्याकडे भक्तीनें पाहूं लागली. ती मोठा सुरेख स्वयंपाक करते बोवा!"

" परंतु माझ्याविषयीं पंचूच्या मनांत जो कांहीं आदर शिल्लक होता तो पार नाहींसा झाला ! अगदीं शेवटपर्यंत मी निदान एक साधा मनुष्य आहें अशी त्याची कल्पना होती. परंतु हा मी त्याच्या समोर केवळ त्या म्हातारीला वळविण्यासाठीं धडधडीत कांहीं संकोच न बाळगतां माझी जात धोक्यांत घालीत होतों ! खटल्याकरितां साक्षीदार मथवून मीं तिच्यावर आडून हल्ला केला असता तर ती निराळी गोष्ट होती. डावपेचांशीं डावपेचच लढविले पाहिजेत. परंतु व्यूह करण्यासाठीं धर्मश्रद्धा सोडणें म्हणजे काय ? त्याच्यानें तें मुळींच सहन करवेना ! "

मी म्हणालों, " आपल्याला त्याचें संरक्षण करण्यांत यश येवो वा न येवो. परंतु धर्म, रूढी, स्वार्थपरायणता, इत्यादिकांचीं हजारों जाळीं पसरण्याचा जो या लोकांनीं सपाटा चालविला आहे त्यापासून आपल्या देशाचें संरक्षण करण्याचा प्रयत्न करीत असतां जर मृत्यु आला तर आपल्याला मरतांना सुख तरी वाटेल. "

## प्रकरण चौदावें

## विमलेची आत्मकथा

### १

आपल्या एका जन्मांत इतक्या गोष्टी घडून येतील असें कोणाला वाटलें असतें? मला तर असें वाटतें कीं, मी जन्मांच्या एका चक्रांतूनच बाहेर पडलें आहें. काळ इतक्या जोरानें धांवत होता कीं परवां त्याचा मला धक्का बसेपर्यंत तो हालचाल करीत नाहीं अशीच माझी कल्पना होती.

आमच्या बाजारांतून विलायती माल काढून टाकण्याविषयीं माझ्या पतींना सांगण्याचें जेव्हां मीं ठरविलें तेव्हां आम्हां दोघांत वाद होईल हें मी जाणत होतें. परंतु मुद्द्याला मुद्दा असा वाद घालीत बसण्याची आपल्याला मुळीं जरूरीच नाहीं, माझ्या भोंवतालच्या वातावरणांत सुद्धां जादू पसरलेली असते, असा माझा दृढ भरंवसा होता. संदीपबाबूंसारखा अफाट मनुष्य! परंतु तो सुद्धां बळवान समुद्र जसा कांठावर

जाऊन आदळतो त्याप्रमाणें माझ्या पायांशीं येऊन पडलाच कीं नाहीं? मीं काय त्यांना आव्हान केलें होतें? मुळींच नाहीं. माझ्या जादूच्या मंत्राचा तो प्रभाव होता. आणि अमूल्य—गरीब बिचारा पोर! तो जेव्हां प्रथम माझ्याकडे आला तेव्हां प्रातःकाळच्या नदीप्रवाहाप्रमाणें त्याच्या जीविताचा ओघ कसा आरक्त झाला! आपल्या भक्ताच्या तेजस्वी मुखाकडे पाहिलें असतां देवतेला काय वाटत असेल याची मला आतां चांगली जाणीव झाली आहे.

माझ्या सामर्थ्याच्या या उदाहरणांवरून उत्पन्न झालेल्या आत्मविश्वासामुळें मी विद्युत्परिपूर्ण ढगाप्रमाणें माझ्या पतींशीं तोंड द्यावयाला अगदीं तयार होतें. परंतु वास्तविक काय घडून आलें? आज एवढ्या उभ्या नऊ वर्षांत अशी अगदींच कोठें तरी पाहणारी भ्रांतिपूर्ण दृष्टि माझ्या पतींची मीं कधींच पाहिली नव्हती. ती अगदीं मेघविरहित आकाशाप्रमाणें दिसत होती. तींत स्वतःच्या प्रेमाचा ओलसरपणा नव्हता. जिच्यावर ती पडे त्या वस्तूचें प्रतिबिंब सुद्धां तिच्यांत पडत नव्हतें! त्यांचा राग जर भडकून बाहेर पडता तर मला किती तरी हलकें वाटलें असतें! परंतु त्यांचा राग जागृत करील—त्यांच्या हृदयाला जाऊन भिडेल—असें मला त्यांच्या वृत्तींत कांहींच सांपडेना. मला अगदीं स्वप्नांतल्याप्रमाणें सर्व कांहीं असत्य—कृत्रिम—भासूं लागलें. स्वप्न संपलें कीं फक्त रात्रीचा अंधकारच शिल्लक राहतो.

पूर्वी मला माझ्या जावेच्या सौंदर्याबद्दल हेवा वाटे. त्य

वेळेस मला वाटे कीं, भवितव्यतेनें मला स्वतःचें असें सामर्थ्य मुळींच दिलेलें नाहीं. मला त्यांनीं आपलें जें प्रेम अर्पण केलें आहे त्यांतच माझें शक्तिसर्वस्व सांठविलेलें होतें. परंतु त्या शक्तीनें भरलेला पेला मीं अगदीं खलास केला व त्याची निशा मजवर आल्याखेरीज राहिली नाहीं. तो पेला माझ्या पायांशीं पडून फुटला असून आतां जगण्यासारखें असें जगांत कांहीं राहिलें नाहीं असें एकाएकीं मला आढळून आलें.

त्या दिवशीं मी किती हौशीनें वेणीफणी करावयास बसलें होतें ! अरेरे ! किती किती शरमेची गोष्ट ! माझी धाकटी जाऊ माझ्या आंगावरून जातां जातां म्हणाली, " ओहो ! धाकट्या राणीसाहेब, तुमचे केस तर अगदीं उडी मारण्याच्या बेतांत आलेले दिसतात; त्यांच्याबरोबर तुमचें मस्तक जाऊं देऊं नका म्हणजे झालें. "

आणखी त्या दिवशीं बागेमध्यें मीं तुला स्वातंत्र्य दिलें आहे असें त्यांनीं किती सहज सांगितलें ! परंतु स्वातंत्र्य–पोकळ स्वातंत्र्य–इतकी सहज देतां घेतां येण्याजोगी गोष्ट आहे काय ? हें माशाला आकाशांत मोकळें सोडण्यासारखें आहे. कारण ज्या प्रेमळ काळजीच्या जोरावर माझें जीवित अवलंबून राहिलें होतें त्या काळजीचें वातावरण सोडून मी बाहेर हालचाल तरी कशी करणार अथवा जिवंत तरी कशी राहणार ?

आज जेव्हां मी खोलींत आलें तेव्हां मला नुसतें सामान दिसलें. नुसता पलंग, नुसता आरसा, नुसती कपड्यांची मांडण दिसली. त्या सर्वांमध्यें मला तें नेहमींचें सर्वव्यापी

हृदय दिसलें नाहीं. त्याऐवजीं खोलींत नुसतें स्वातंत्र्य —निव्वळ स्वातंत्र्य—निव्वळ शून्यत्व—भरलेलें होतें. त्या ठिकाणीं आपल्या सर्व शिंपा, गारगोट्या, खडक इत्यादि सहकाऱ्यांनीं युक्त असा जलविहीन प्रवाह मला दिसला. भावना नाहीं—नुसतें सामान !

मी अगदीं भांबावून गेलें. माझ्या जीवितांत कांहीं तरी वास्तविकता आहे कीं नाहीं, असल्यास ती कोठेंशी आहे, इत्यादि प्रश्नांनीं माझें मस्तक भडकून गेलें. अशा समयीं माझी पुन्हां संदीपबाबूंशीं गांठ पडली. मग जीवित जीवितावर आपटलें आणि पूर्वीप्रमाणेंच स्फुलिंग बाहेर पडले. येथें वास्तविकता आहे—ही जबर वास्तविकता आहे. ती सर्वत्र घुसून मर्यादांचा विध्वंस करते. मोठी राणी, तिची दासी ठकू, तिचीं तीं गाणीं आणि इतर सगळे बडबडणारे, हंसणारे व भटकणारे, यांच्यापेक्षां ही वास्तविकता हजारों पटीनें वास्तविक आहे.—

"पन्नास हजार !" संदीपबाबूंनीं मागणी केली.

"पन्नास हजार म्हणजे काय आहे !" माझ्या भारलेल्या अंतःकरणानें उत्तर दिलें; "मिळतील ते तुम्हांला."

ते कसे मिळवावयाचे, कोठें मिळवावयाचे, वगैरे प्रश्न अगदींच क्षुद्र. त्यांच्याविषयीं विचार करण्याची सध्यां जरूरी नाहीं. माझ्याकडेच पहा. एका क्षणांत मी शून्यत्वापासून —अवास्तविकतेपासून—निसटून सर्व वस्तुजाताच्या शिखरावर जाऊन नाहीं का बसलें ? अशाच सर्व वस्तु मजजवळ

येऊन माझ्या पाठीस लागतील. मी ते पैसे मिळविणार, मिळविणार, मिळविणार ! यांत अगदीं संशय नाहीं.

अशा वृत्तींत मी त्या दिवशीं संदीपबाबूंकडून निघून आलें. मग आपल्या सभोंवार मीं पाहिलें तों—कोठें—तो कल्पवृक्ष कोठें आहे ? कोठेंच नाहीं. अरेरे ! हें बाह्य जग माझ्या अंतःकरणाचा असा उपमर्द कां करतें ?

परंतु रक्कम मिळविली ही पाहिजेच. कशी, याची फिकीर मी मुळींच करीत नाहीं; कारण त्यांत पाप मुळींच नाहीं. पाप फक्त कमकुवत लोकांना चिकटतें. मी माझ्या शक्तीच्या बळावर त्याच्या स्पर्शाच्या आंवाक्याबाहेर आहें. साधा मनुष्यच चोर ठरतो; राजा जिंकतो आणि लूट हक्कानें घेतो. खजीना कोठें आहे, त्यांत पैसा कोण नेऊन ठेवतो, त्याच्यावर पाहरा कोणाचा आहे, यासंबंधीं तलास केला पाहिजे.

त्या दिवशीं अर्धी रात्र मीं सोप्यांत उभी राहून कचेरीच्या इमारतींच्या रांगेकडे टक लावून पाहत घालविली. परंतु त्या लोखंडी गजांच्या तावडींतून ५०००० कसे आणावयाचे ? तेथील सर्व रक्षक जागच्या जागीं मरून पडतील असा एखादा मंत्र मला येत असता तर त्याचा उपयोग करण्यास सुद्धां मीं मागें पुढें पाहिलें नसतें—इतकी माझी केविलवाणी स्थिति झाली होती.

इकडे भोंवऱ्यांत सांपडल्याप्रमाणें फिरणाऱ्या राणीच्या मेंदूंत दरवडेखोरांच्या एका संबंध टोळीचें रणनृत्य चाललें होतें. परंतु राजाचें सर्व गृह स्वस्थपणें झोंप घेत होतें.

घंटेंत तासामागून तास वाजत होते आणि मस्तकावर आकाश गंभीरपणें पसरलेलें होतें.

शेवटीं मीं अमूल्याला बोलावून घेतलें.

" कार्यासाठीं पैशाची जरूरी आहे." मीं त्याला सांगितलें. " त्या खजीन्यांतून तुला काढून घेतां येईल काय ?"

" कां नाहीं येणार ?" त्यानें छाती काढून उत्तर दिलें.

परंतु मीं सुद्धां संदीपबाबूंना असेंच " कां नाहीं ?" असें उत्तर दिलें नव्हतें काय ? त्या बिचाऱ्या मुलाच्या आत्मविश्वासानें माझ्या मनांत मुळींच आशा उत्पन्न होईना.

" कसें करशील तूं हें काम ?" मीं त्याला विचारलें.

तो एकएक जे मोठमोठे भयंकर बेत सांगूं लागला, ते एखाद्या भुताखेताच्या भयानक गोष्टींत सांगितले तर शोभतील. दुसरीकडे ते शोभणार नाहींत.

मी जरा कडकपणानेंच म्हणालें, " छे अमूल्य, असा पोरकट होऊं नकोस."

" बरें आहे. तर मग मी पाहरेकऱ्यांना लांचलुचपत देतों."

" परंतु त्याला तरी पैसे कोठून आणणार ?"

" मी बाजार लुटीन." तो धीर न सोडतां उद्गारला.

" जाऊं देत हे असले विचार. माझे दागिने आहेत त्यांनीं काम भागेल."

" परंतु मला असें वाटतें," अमूल्य म्हणाला,

" कीं खजीनदार कांहीं लांचलुचपतीला वळणार नाहीं. कांहीं हरकत नाहीं ; आणखीही एक सोपा मार्ग आहे."

" तो कोणता ?"

" काय करावयाचें आहे तुम्हांला तो ऐकून? अगदीं साधा आहे तो."

" तरी पण मला तो समजला पाहिजे."

अमूल्यानें आपल्या जाकिटाचा खिसा चांचपला आणि त्यांतून प्रथम एक गीतेची खिशांत राहण्याजोगी पोथी काढून टेबलावर ठेवली. मग त्यानें मला एक बारीकसें पिस्तुल काढून दाखविलें. परंतु तो पुढें एक शब्दही बोलला नाहीं.

किती भयंकर ! आमच्या बिचाऱ्या वृद्ध खजीनदाराला मारण्याचा निश्चय करण्यास त्याला एक क्षणही लागला नाहीं. त्याच्या मोकळ्या स्वच्छ चेहऱ्याकडे पाहिलें तर त्याच्या हातून माशीला सुद्धां धक्का पोंचणार नाहीं असें एखाद्याला वाटलें असतें. परंतु त्याच्या तोंडून शब्द बाहेर पडले ते किती निराळे होते ! खजीनदाराची जागा म्हणजे जगांत कांहीं सत्य नाहीं; ती केवळ निर्जीव, निर्विकार अशी पोकळी आहे. ' न हन्यते हन्यमाने शरीरे ' इत्यादि गीतेंतील ठराविक वचनांचा त्याच्यावर पगडा बसलेला स्पष्ट दिसत होता.

मी म्हणालें, " अमूल्य, तूं कांहीं जरी म्हटलेंस तरी तुला ठाऊक नाहीं काय कीं, त्या बिचाऱ्या वृद्ध मनुष्याला बायकामुलें आहेत. आणि त्यांचा तो—"

तो मध्येंच म्हणाला, "परंतु ज्यांना बायकामुलें नाहींत असेच मनुष्य आम्हांला कसे सांपडावे ? हें पहा महाराणी, ज्याला आपण अनुकंपा म्हणतों ती मुळांत केवळ आपल्यासाठींच असते. आमच्या नाजूक भावनांना दुःख झालेलें आम्हांला सहन होत नाहीं आणि म्हणून आम्ही प्रहारच करीत नाहीं. अनुकंपा खरी! भित्रेपणाचा कळस!"

संदीपबाबूंच्या तोंडचीं वाक्यें या मुलाच्या तोंडून ऐकून मी थक्क झालें. त्याची अपरिपक्कता किती सुंदर आणि प्रेमळ होती! चांगलें खरोखरच चांगलें आहे असा ज्या वेळेस भरंवसा राहूं शकतो अशा वयांत अद्याप तो होता. याच वयांत मनुष्य खरोखर जिवंत असतो व वाढतो. माझ्यांतील मातृभाव जागृत झाला.

मला स्वतःला आतां चांगलें अथवा वाईट असें कांहीं राहिलें नव्हतें. आतां मला मृत्यु—सुंदर मोहक मृत्यु—शिल्लक राहिलेला दिसत होता. परंतु एका निरपराधी वृद्ध मनुष्याला मारणें हीच गोष्ट न्याय्य—बरोबर—चांगली—आहे हें त्या लहान पोराला बोलतांना ऐकून माझ्या सर्व शरीराचा थरकांप झाला आणि त्याच्या हृदयांत पाप मुळींच नाहीं असें मला जितकें स्पष्ट दिसूं लागलें तितकें मला त्याच्या शब्दांचें पाप जास्त भयंकर वाटूं लागलें. आईबापांच्या पातकाचें प्रायश्चित्त मुलगा भोगीत असतो असें मला स्पष्ट दिसूं लागलें.

त्याचे ते श्रद्धा आणि उत्साह यांनीं तळपणारे मोठे डोळे पाहून तर मला फारच वाईट वाटलें. आपल्या नजरबंदीमुळें

तो थेट अजगराच्या जबडयांत चालला होता आणि एकदां त्यांत गेल्यावर परत येण्याची वार्ताच नको! त्यापासून त्याचें संरक्षण कसें करावें? माझा देश एकवारच वास्तविक मातेचें स्वरूप घेऊन त्याला आपल्या उराशीं घट्ट धरून ओरडत कां नाहीं, कीं "बाळा! बाळा! तुझें जर मी रक्षण करूं शकलें नाहीं तर मग तूं माझें संरक्षण करून तरी काय फायदा?"

जगांतील सर्व सत्ता पिशाचाग्रणीशीं संगनमत करून वर्चस्व गाजवीत आहे हें आतां मला अगदीं पूर्णपणें समजलें. परंतु पिशाचांच्या प्रगतीच्या मार्गांत अवरोध करण्यास आणि त्याचा धिक्कार करण्यास माता समर्थ बसलेली आहे. फार मोठ्या यशाबद्दल मातेला फिकीर नाहीं; तिला फक्त जीवन द्यावयाचें असतें—जीवित रक्षावयाचें असतें. खुद्द माझा आत्मा आज या मुलाचें संरक्षण करण्यासाठीं हपापून हात लांब करीत आहे.

थोड्याच वेळापूर्वीं मीं त्यास दरवडा घालावयास सुचविलें. आतां मी त्याविरुद्ध कांहींही बोललें तरी स्त्रीच्या कमकुवतपणाचा तो परिणाम समजला जाणार. आमचा कमकुवतपणा जेव्हां जगाला संकटांत ओढतो तेव्हांच पुरुष त्यावर प्रेम करतात.

"अमूल्य, तूं कांहींच करूं नको. मी पैशाचें पाहीन." असें त्याला मीं शेवटीं सांगितलें.

तो अगदीं दाराशीं गेला नसेल तोंच त्याला मीं हांक मारली

"अमूल्य," मी म्हणालें, "मी तुझी मोठी बहीण आहें. आज कांहीं भाऊबिजेचा दिवस नाहीं. परंतु वर्षांतील सर्व दिवस वास्तविक भाऊबिजेचेच असतात. माझा तुला आशीर्वाद आहे कीं, परमेश्वर नेहमीं तुझें रक्षण करो!"

माझ्या तोंडून हे अनपेक्षित शब्द बाहेर पडलेले ऐकून अमूल्य चकित झाला. कांहीं वेळ तो निश्चल व भ्रमिष्ठासारखा उभा राहिला. मग भानावर येऊन हें नवीन नातें आपल्याला मान्य आहे हें दर्शविण्यासाठीं त्यानें माझ्या पायांशीं लोटांगण घातलें. तो उठला तेव्हां त्यांचे डोळे पाण्यानें भरलेले होते.

हे माझ्या लहानग्या भावा! मी वेगानें मृत्यूकडे जात आहें. तेव्हां तुझीं सगळीं पापें मला मजबरोबर नेऊं दे. माझ्या संपर्कानें तुझें निष्पाप हृदय कधींही दूषित न होवो!

मीं त्याला म्हटलें, "तूं भाऊबिजेची देणगी म्हणून तें पिस्तुल मला दे."

"तुला तें घेऊन काय करावयाचें आहे ताई?"

"मी मरणासाठीं संवय करीन."

"बरोबर आहे ताई! आमच्या स्त्रियांना सुद्धां मरावें कसें, मृत्यूशीं कसें वागावें, हें समजलें पाहिजे." असें म्हणून अमूल्यानें पिस्तूल माझ्या हातांत दिलें.

त्याच्या तारुण्यमय चेहऱ्यावरील तेजामुळें माझ्या जीवितांत नवीनच प्रात:काळची झुळूक मारात आहे असा मला भास झाला. मीं आपल्या वस्त्रांत तें पिस्तूल लपवून टाकलें. माझ्या संकटांत मला शेवटीं हेंच उपयोगी पडो—.

माझ्या स्त्रीहृदयांतील मातृत्वाच्या कपाटाचें दार एकदां उघडलें तें तसेंच नेहमीं उघडें राहील असें मला वाटलें. परंतु माझ्या स्त्रीहृदयांतील गृहिणीनें मातेची जागा पटकावून तें लावून टाकल्याबरोबर श्रेष्ठतम हिताचा माझा मार्ग बंद झाला. दुसऱ्याच दिवशीं माझी व संदीपची भेट झाली आणि वेड माझ्या हृदयांत उघडेंबोडकेंच व आनंदोद्रेकानें नाचूं लागलें.

मग हें काय? मी खरोखरी अशीच आहें काय? नाहीं. माझ्या हृदयांत असला निर्लज्जपणा, असला निर्दयपणा, कधींच नव्हता. गारोडी आला आणि त्यानें माझ्या वस्त्रांत झांकलेला सर्प काढण्याचा आव घातला. परंतु सर्प माझ्या वस्त्राच्या आंत गुंडाळलेला मुळीं कधीं नव्हताच. कोणीं तरी राक्षसानें मला पछाडलें आहे आणि मी आज जें जें म्हणून करीत आहें तें सर्व त्याचें कृत्य आहे.

हाच राक्षस त्या दिवशीं परमेश्वराचा वेष घेऊन व हातांत तांबडी मशाल घेऊन मला हांक मारण्यास आला आणि म्हणाला, "मी तुझा देश आहें. मी तुझा संदीप आहें. तुझ्या कोणत्याही गोष्टीपेक्षां मी तुला जास्त महत्त्वाचा—योग्यतेचा—आहें. वंदे मातरम्." हात जोडून त्याला मीं उत्तर दिलें, "तूं माझा धर्म आहेस. तूं माझा स्वर्ग आहेस. तुझ्या प्रेमापुढें मला माझें सर्व कांहीं कस्पटासमान आहे. वंदे मातरम्."

पांच हजार नाहीं का?—कांहीं हरकत नाहीं; पांच

हजार ! तुम्हांला ते उद्यां पाहिजेत ?—कांहीं हरकत नाहीं; उद्यां ! या साहसी धांगडधिंग्यांत ५००० म्हणजे दारूचा नुसता फेस आहे. आणि मग दंगलीचा बहर काय विचारतां ! ही अचल भूमि आमच्या पायांच्या आघातानें इकडून तिकडे आणि तिकडून इकडे असे झोके खाईल, आमच्या नेत्रांतून अग्नि बाहेर पडेल; आमच्या कानांशीं तुफान घोंघावेल; आमच्या पुढें असणाऱ्या आणि नसणाऱ्या सगळ्या वस्तु आम्हांला सारख्याच अंधुक भासतील आणि मग धडपडत धडपडत पावलें टाकीत आम्ही मृत्यूप्रत जाऊं—एका क्षणांत अग्नि विझेल, राख उडून जाईल आणि कांहींच शिल्लक उरणार नाहीं.

२

तो पैसा कसा मिळवावा याविषयीं मला अगदीं कांहींच सुचेना. मग एक दिवशीं माझें मन अत्यंत त्रस्त झालें असतां एकाएकीं सबंध चित्र माझ्या डोळ्यांपुढें स्पष्ट दिसूं लागलें.

प्रत्येक दुर्गापूजेच्या समयास माझे पति माझ्या जावेला ६००० रुपये देणगीदाखल देत असतात. प्रत्येक वर्षी ते पैसे तिच्या खात्यांत कलकत्ता ब्यांकेंत जमा होतात. या वर्षी नेहमींप्रमाणें ही देणगी दिलेली आहे. परंतु अद्याप कलकत्त्यास ब्यांकेंत नेलेली नाहीं. ती रक्कम माझ्या शय्यागृहाशेजारींच कपडे ठेवण्याची खोली आहे तेथें एका

कोपऱ्यांत एका लोखंडी पेटींत सुरक्षितपणें ठेवण्यांत आली आहे.

प्रत्येक वर्षीं माझे पति स्वतःच हे पैसे कलकत्त्यास ब्यांकेंत नेत असतात. परंतु या वर्षीं कलकत्त्यास जाण्याचा अजून त्यांचा योगच आला नाहीं. तेव्हां ही सर्व भवितव्यतेचीच करणी आहे असें मला कसें वाटणार नाहीं ? देशाला ते सर्व पैसे पाहिजे आहेत, आणि म्हणूनच आजपर्यंत ते येथें राहिले. ते ब्यांकेंत नेण्याची शक्ति कोणाच्या आंगीं असणार ? आणि मला ते पैसे घेण्याचें नाकारण्याचें सामर्थ्य कोठून प्राप्त होणार ? सर्वनाशांत आनंद मानणारी देवी आपलें रक्ताचें भांडें घेऊन 'मला पेय द्या; मी तृषित झालें आहें' असें ओरडत आहे. त्या पांच हजार रुपयांबरोबरच मी तिला माझ्या हृदयांतील रक्त देईन. माते, जिचे पैसे जाणार आहेत तिला त्यांबद्दल विशेष कांहीं वाटणार नाहीं; परंतु मला मात्र तूं पुरी नष्ट करणार !

पूर्वीं मीं आपल्या जावेला कित्येक वेळां चोर अशी संज्ञा दिलेली आहे. कारण माझ्या पतींच्या विश्वासू स्वभावामुळें त्यांच्या जवळून आर्जव करून त्या पैसे उपटील असा माझा त्यांच्यावर आरोप होता. तिचा नवरा वारल्यानंतर इस्टेटींतील कित्येक वस्तु ती निव्वळ आपल्या उपयोगाकरितां म्हणून वारंवार एकीकडे काढून ठेवीत असे हें मी त्यांना दाखवून देत असें. परंतु ते आपले स्तब्धच

बसत असत. मी रागावून म्हणें, " आपल्याला औदार्य दाखवावयाचें असेल तर देणग्या अवश्य द्याव्या; परंतु आपल्याला लुबाडून कां घ्यावें ? " भवितव्यता त्या वेळीं खरोखर हंसली असेल; कारण आज रात्रीं मीच त्यांच्या तिजोरींतून माझ्या जावेचे पैसे लुबाडण्याच्या बेतांत आहें.

रात्रीं कपडे काढून खोलींत ठेवावयाच्या वेळीं किल्ल्या तशाच खिशांत राहूं देण्याची माझ्या पतींची संवय असे. मीं तिजोरीची किल्ली त्यांतून काढली आणि तिजोरी उघडली. किल्लीचा जो हळूच आवाज झाला त्यानें सर्व जग जागें झालेंसें मला वाटलें. एकदम थंडी—हुडहुडी—भरून माझे हातपाय बर्फासारखे गार झाले आणि सर्वांग थरारलें.

तिजोरीच्या आंत एक खण होता. तो उघडल्यावर पैसे नोटांच्या स्वरूपांत नसून सोन्याच्या नाण्यांच्या सुरळ्या केलेल्या आहेत असें मला आढळून आलें. एकंदर वीस सुरळ्या होत्या. त्या सर्व उचलून मीं आपल्या ओंच्याच्या एका कोपऱ्यांत बांधल्या.

केवढें थोरलें वजन होतें तें ! चोरीच्या दडपणानें माझें हृदय फुटून त्याच्या चिंधड्या झाल्या. कदाचित नोटा असत्या तर चोरी केल्यासारखें फारसें वाटलें नसतें; पण हें तर सगळें सोनें होतें.

मी जेव्हां चोरासारखी लपत छपत आपल्या खोलींत आलें, तेव्हां मला ती खोली माझी असें वाटेना. त्या खोलीवर

माझे जे जे मौल्यवान हक्क होते ते ते पार सगळे माझ्या चोरीचा स्पर्श होतांच नाहींसे झाले. मी जणूं काय मंत्र म्हटल्याप्रमाणें, 'वंदे मातरम्, वंदे मातरम्, माझ्या देशा, माझ्या सुवर्णभूमि! हें सर्व सोनें तुझ्यासाठीं आहे, दुसऱ्या कोणासाठींही नाहीं' असें मनांत म्हणूं लागलें.

परंतु रात्रीं मन कमजोर होतें. मी परत माझे पति निजले होते त्या शय्यागृहांत आलें आणि जातां जातां डोळे मिटून पलीकडच्या उघडया गच्चीवर गेलें. ज्या टोंकाला सोन्याचें ओझें बांधलेलें होतें तें ओंच्याचें टोंक उराशीं घट्ट धरून मी उपडी पडलें. त्यांतील प्रत्येक जुळी मला दुःखाचे धक्के देऊं लागली.

शांत रात्र आपलें मधलें बोट नाकावर धरून उभी आहेसा मला भास झाला. माझें घर माझ्या देशापासून निराळें आहे असें मला वाटेना. मीं आपलें घर लुबाडलें; अर्थात मीं आपल्या देशालाही लुबाडलें. या पापामुळें माझें घर माझें राहिलें नाहीं—आणि माझा देशही अर्थातच माझ्यापासून वेगळा—मला पारखा—झाला. मीं माझ्या देशाकरितां जर भीक मागितली असती आणि मला त्यांत यश आलें नसतें, तरी मी भीक मागतां मागतां जर मेलें असतें तर तें देवांना जास्त प्रिय वाटलें असतें. परंतु चोरी ही कधींही भक्ति होणार नाहीं. तेव्हां मीं हें सोनें कसें अर्पण करावें? मी काय करूं? मी मरणार हें तर ठरलेलेंच आहे. परंतु मीं आपल्या अपवित्र स्पर्शानें माझ्या देशाला भ्रष्ट करावें काय?

द्रव्य परत नेऊन ठेवण्याचा मार्ग आतां मला बंद आहे. खोलींत जावयाचें, ती किल्ली पुन्हां घ्यावयाची व ती तिजोरी पुन्हां उघडावयाची—छे ! एवढें सगळें करावयास मला सामर्थ्य आहे कोठें ? शय्यागृहाच्या दाराच्या उंबरठ्यांतच मला मूर्छा येईल; आतां फक्त पुढचा मार्ग शिल्लक आहे. तसेंच, मुद्दाम बसून हीं नाणीं माझ्याच्यानें मोजवणारही नाहींत. तीं आपलीं आवरणानें आच्छादित आहेत तींच बरीं—मला त्यांचें गणित करवत नाहीं.

हिंवाळा असल्यामुळें आकाशांत धुकें मुळींच नव्हतें. चांदण्या शुभ्र तेजानें प्रकाशमान झाल्या होत्या. मी तेथें निजल्या निजल्या मनाशींच विचार करूं लागलें. अंधाराच्या पोकळींत नीट सांठवून ठेवलेल्या तारका जर या सोन्याच्या नाण्यांप्रमाणें माझ्या देशासाठीं एक एक चोरावयाच्या असत्या, तर मग आकाश अंध झालें असतें, रात्र कायमची विधवा झाली असती, आणि माझ्या चोरीनें सर्व जग लुबाडलें गेलें असतें. जगाचा फक्त पैसाच गेला असता असें नव्हे तर त्याची ठेव—सर्व सात्त्विकता—नीतिमत्ता—नाहींशी झाली असती.

मीं रात्र गच्चीवर पडूनच घालविली. शेवटीं जेव्हां एकदां सकाळ झाली आणि पति उठून खोलींतून गेले असले पाहिजेत अशी माझी खात्री झाली तेव्हांच मीं आपली शाल आंगावर घेतली आणि शय्यागृहाकडे आलें.

मोठी जाऊ त्याच बाजूला पितळेच्या भांड्यांतून आपल्या

झाडांना पाणी घालीत होती. मला जातांना पाहून ती लांबूनच ओरडली, " धाकट्या राणीसाहेब, तुम्हीं बातमी ऐकलीत काय ? "

मी कांहीं न बोलतां थांबलें; माझें आंग थरथर कांपूं लागलें. शालीवर गिन्यांच्या सुरळ्या फुगून दिसताहेतसें मला वाटलें. त्या सुटून सर्वभर पसरून मोठा थोरला आवाज होणार आणि आपलेंच द्रव्य चोरून जी मी स्वतःलाच लुबाडणारी चोर ती घरांतील सगळ्या नोकरांचाकरांना पहावयास मिळणार असें मला प्रतिक्षणीं वाटत होतें.

माझी जाऊ पुढें म्हणाली, " तुमच्या दरवडेखोरांच्या टोळीनें खजीना लुटण्यासंबंधीं एक धमकीचें निनांवी पत्र पाठविलें आहे. "

मी चोरासारखी स्तब्ध राहिलें.

माझी जाऊ चेष्टेखोरपणानें पुढें म्हणाली, " निखिल भावोजींना मीं तुमचा आश्रय करावयास सांगितलें. अहो दरवडेखोरांच्या राणीसाहेब, आपल्या भक्तांना परत बोलावा ! आमचें जर तुम्ही संरक्षण कराल तर तुमच्या ' वंदे मातरम्'ला आम्ही यज्ञ अर्पण करूं. हल्लीं काय काय भयंकर गोष्टी घडत आहेत—परंतु परमेश्वराची शपथ तुम्हांला सांगतें कीं, आमच्या घराला निदान घरफोडीपासून तरी वांचवा ! "

मी कांहींच उत्तर न देतां घाईघाईनें आपल्या खोलींत

गलें. मीं आपला पाय वाळूच्या पुळणीवर ठेवला होता आणि तो आतां मला काढून घेतां येणें अशक्य होतें. धडपड केली असती तर उलट मी जास्त जास्त खोल गेलें असतें.

संदीपबाबूंना पैसे देऊन टाकण्याची वेळ एकदांची चटकन येईल तर किती बरें होईल असें मला वाटूं लागलें. मला ते अगदीं सहन होत नव्हते. त्यांच्या वजनानें माझ्या फांसळ्या अगदीं मोडण्याच्या बेतांत आल्या होत्या.

संदीपबाबू माझी वाट पाहत आहेत असें मला नेहमींपेक्षां जरा लौकरच कळलें. आज मला दागिने वगैरे घालण्याचें सुद्धां सुचेना. मी शाल तशीच आंगाभोंवतीं गुंडाळून बाहेरच्या दिवाणखान्यांत गेलें. आंत संदीपबाबू आणि अमूल्य असे दोघेही बसलेले मला आढळले. माझा सगळा मोठेपणा आणि मान माझ्या पायांपासून डोक्यापर्यंत सर्व शरीरांतून पळून जाऊन जमिनींत अदृश्य होतो आहे असें मला वाटलें. स्त्रीजातीची अगदीं सगळी अप्रतिष्ठा या मुलासमोर मला उघडी करावी लागणार ना? माझ्या कृत्याविषयींच ते आपसांत बोलत बसले असतील काय? माझ्या संबंधांत संदीपबाबूंनीं लज्जेच्या आवरणाची ओळख तरी ठेवली होती काय? अशा विचारांनीं माझ्या मनांत काहूर उठवून सोडलें.

आम्हां स्त्रियांना पुरुषांचा स्वभाव नीट कधींच कळणार नाहीं. कांहीं तरी साध्य करण्यासाठीं मार्ग तयार करण्याचा त्यांचा निश्चय झाला म्हणजे आपल्या रथाच्या प्रवेशाकरितां ते जगाच्या हृदयाचे तुकडे तुकडे करण्यास कधींही मागें

पुढें पाहावयाचे नाहींत. कांहीं तरी उत्पन्न करण्याच्या निशेनें ते वेडे झाले म्हणजे विधात्याच्या सृष्टीचा नाश करण्यांत त्यांना आनंद वाटतो. माझें हृदय छिन्नविच्छिन्न करणाऱ्या माझ्या लज्जेकडे एक सुद्धां दृष्टिक्षेप त्यांच्या नेत्रांतून होणें शक्य नाहीं. त्यांना खुद्द जीविताविषयीं सुद्धां कांहीं वाटत नाहीं. त्यांची सगळी उत्सुकता, सगळी नजर, आपल्या इच्छित गोष्टीकडे असते. मी त्यांना मोठ्या पुरांतील लोंढ्याबरोबर वाहणाऱ्या फुलापेक्षां आणखी जास्त काय वाटणार?

माझ्या या अधःपातापासून संदीपबाबूंचा काय फायदा होणार? फक्त पांच हजार रुपये! पांच हजार रुपयांपेक्षां माझी जास्त योग्यताच नव्हती काय? अर्थात होती! मला हें संदीपबाबूंपासूनच समजलें नाहीं काय? आणि या ज्ञानाच्या जोरावर मी माझ्या संसारांत इतर सर्व कांहीं तुच्छ समजूं लागलें नव्हतें काय? मी स्वतःला ज्ञानदात्री, शक्तिदात्री, जीवितदात्री, अमरत्वदात्री समजत होतें आणि या विश्वासाच्या व आनंदाच्या भरांत सगळ्या मर्यादा सोडून उघड्यावर आलें होतें. मला त्या वेळीं जर कोणीं तो आनंद प्रत्यक्ष अनुभवास आणून दिला असता तर मी मृत्यूंतही जिवंत राहिलें असतें—माझ्या सर्वस्वनाशांतही माझें कांहींच गमावलें नसतें.

हें सर्व कांहीं खोटें होतें असें ते मला आतां सांगणार काय? मी जें स्वतःच्या स्तुतीचें हें स्तोत्र इतक्या भक्तिपूर्वक

गात होतें त्यामुळें मी स्वर्गांतून खालीं आलें काय ? आणि खालीं येऊन जगाला स्वर्ग करण्याऐवजीं स्वर्गालाच पृथ्वीवरील—जगांतील—धुळींत लोळविलें काय ? असे विचार माझ्या अंतःकरणांत उभे राहिले.

२

माझ्याकडे एक तीक्ष्ण आणि विस्फारित असा दीर्घ दृष्टिक्षेप करून संदीपबाबू म्हणाले, " राणी ! पैसा ! "

अमूल्य मुद्रां मजकडे टक लावून पाहत होता. तो जरी माझ्या आईचा मुलगा नसला तरी तो माझा भाऊ होता; कारण, आई ही सर्व जगभर एकच होय. त्याचा निष्कपट चेहरा, त्याचे प्रशांत डोळे, त्याचें निश्छद्म तारुण्य, हीं सगळीं मला माझ्या डोळ्यांपुढें स्पष्ट दिसत होतीं. आणि मी स्त्री—त्याच्या आईच्या जातीचीच एक; त्यानें मागितलें म्हणून त्याला मीं विष द्यावें काय ?

" राणी ! पैसा ! " ही संदीपबाबूंची उद्धट मागणी माझ्या कानांत घुमत होती. मला इतकी कांहीं लाज व संताप वाटला कीं, तें सोनें संदीपबाबूंच्या डोक्यावर फेंकावें असें मला वाटलें. माझ्याच्यानें ओंच्याची गांठही सोडवेना इतकीं माझीं बोटें थरथर कांपत होतीं. शेवटीं एकदां त्या कागदाच्या जुळ्या टेबलावर पडल्या.

संदीपबाबूंचा चेहरा कृष्णवर्ण झाला.—त्या चांदीच्या

नाण्यांच्या जुळ्या आहेत असें त्यांस वाटलें असलें पाहिजे.— त्यांच्या वृत्तींत किती तिरस्कार–तुच्छता–भरलेला होता. माझ्या नालायकीबद्दल त्यांच्या चेहऱ्यावर किती तिटकारा दिसत होता. मला अगदीं झोडून टाकावें असा विचार त्यांच्या चेहऱ्यावर दिसत होता. ही आपल्याशीं वाटाघाट करावयास आली आहे, आपल्या पांच हजारांच्या मागणीचें थोडक्याशा शेंकड्यांनीं समाधान करूं पाहत आहे, असा त्यांना खात्रीनें संशय आला असावा. एकदां तर "मी कांहीं भिकारी नाहीं; मी राजा असून माझी खंडणी मागत आहें." असें म्हणून त्या सगळ्या जुळ्या घेऊन ते खिडकीच्या बाहेर फेंकून देतात कीं काय अशी सुद्धां मला भीति वाटली.

"हेंच कां सगळें?" असें अमूल्यानें विचारलें. त्याच्या आवाजांत कारुण्य इतकें भरपूर दिसून येत होतें कीं, मोठ्यानें स्फुंदून रडावें असें मला वाटलें. मीं हृदय अगदीं गच्च दाबून धरलें आणि मान हालविली.

संदीपबाबू चकार शब्द बोलले नाहींत. त्यांनीं त्या जुळ्या उचलल्याही नाहींत अथवा शब्दही बाहेर काढला नाहीं.

माझी केविलवाणी स्थिति त्या मुलाच्या अगदीं हृदयाला जाऊन भिडली. अगदीं आकस्मिक उसना उत्साह आणून तो म्हणाला, "हें पुष्कळ आहे. आम्हांला तेवढें पुष्कळ होईल. आज तुम्हीं आम्हांला वांचविलें आहे." असें म्हणून त्यानें एका जुळीवरून कागद फाडून टाकला.

गिन्या चमकून बाहेर दिसूं लागल्या. तत्क्षणींच

संदीपबाबूंच्या चेहऱ्यावरून एक कृष्ण आवरण निघून गेलेंसें वाटलें. त्यांचा हर्ष त्यांच्या शरीरांतून तेजोरूपानें बाहेर पडूं लागला. आपल्या भावनांत घडून आलेलें आकस्मिक परिवर्तन ताब्यांत ठेवणें त्यांना अशक्य झालें आणि बसल्या जागेवरून उडी मारून ते एकाएकीं माझ्याकडे आले. त्यांचा उद्देश काय होता मला माहीत नाहीं. मीं अमूल्याकडे एक विजेसारखा दृष्टिक्षेप केला—चाबूक मारल्याप्रमाणें त्याच्या चेहऱ्यावरील तेज नाहींसें झालें होतें. मग माझें सर्व बळ एकवटून मीं संदीपबाबूंना आपल्याजवळून ढकललें. त्यांचा पाठीमागें झोंक गेला व डोक्याला संगमरवरी दगडाच्या टेबलाचा फटका लागून ते जमिनीवर आडवे पडले.

अमूल्याच्या चेहऱ्यावर एक प्रकारचें आनंदपूर्ण तेज दिसूं लागलें. त्यानें संदीपबाबूंकडे पाहिलें देखील नाहीं. तो थेट मजकडे आला आणि माझ्या पायाची धूळ घेऊन तेथेंच जमिनीवर माझ्या समोर बसला. अहा ! माझ्या भाऊ ! माझ्या मुला ! आतां माझ्या शून्य संसारांत तुझी भक्ति एवढाच काय तो स्वर्गीय स्पर्श शिल्लक उरला आहे. मला मग अगदीं राहवेचना. माझ्या डोळ्यांतून घळघळां अश्रू वाहूं लागले. मीं आपलें तोंड पदराच्या टोंकानें झांकलें आणि पदर तोंडावर अगदीं दाबून धरून एकसारखी स्फुंदूं लागलें. माझें समाधान करण्यासाठीं त्यानें माझ्या पायाला केलेला स्पर्श ध्यानांत आला कीं मला आणखीच भरतें येई.

थोड्या वेळानं मी शुद्धीवर आलें आणि तोंडावरचे हात काढले, तेव्हां संदीपबाबू टेबलाशीं जाऊन जणूं काय कांहींच घडलें नव्हतें अशा शांत वृत्तीनें गिन्या हातरुमालांत बांधीत असतांना दिसले. अमूल्य माझ्या पुढें बसला होता तो उठून आपल्या जागेवर गेला. त्याचे आर्द्र डोळे चमकत होते.

संदीपबाबूंनीं निर्विकारपणें मजकडे पाहून म्हटलें, "हे सहा हजार आहेत."

"आपल्याला एवढ्या सगळ्यांशीं काय करावयाचें आहे संदीपबाबू ?" अमूल्य ओरडला. "आपल्या कार्याकरितां फक्त आपल्याला साडेतीन हजारांची जरूरी आहे."

"आमची जरूरी कांहीं या एका जागेपुरतीच नाहीं." संदीपबाबू म्हणाले. "आपल्याला जेवढें मिळेल तेवढें हवें आहे."

"कांहीं हरकत नाहीं;" अमूल्य म्हणाला; "यापुढें तुम्हांला जेवढा पैसा लागेल तेवढा सगळा मिळवून देण्याचें मी आपल्या आंगावर घेतों. पण संदीपबाबू, यांमधून तेवढे अडीच हजार महाराणींना परत द्या."

संदीपबाबूंनीं मजकडे प्रश्नपूर्ण नजरेनें पाहिलें.

"छे! छे!" मी उद्गारलें. "मी त्या पैशाला पुन्हां शिवणार नाहीं. तुम्हांला त्याचें काय वाटेल तें करा."

"स्त्रीइतकें पुरुष कधीं देऊं शकेल काय ?" अमूल्याकडे पाहून संदीपबाबू म्हणाले.

"त्या देवता आहेत—" अमूल्य उत्साहातिशयानें म्हणाला.

"आम्ही पुरुष" संदीपबाबू पुढें म्हणाले, "फार तर आमची शक्ति देऊं. परंतु स्त्रिया आपणां स्वतःलाच देऊन टाकतात. आपल्या स्वतःच्या जीवितामधून त्या दुसऱ्यांना जन्म देतात. त्याच जीवितांतून त्या उपजीवन देतात. याच देणग्या खऱ्या देणग्या!" नंतर मजकडे वळून ते म्हणाले, "राणी, तुम्हीं आम्हांला दिला आहे तो केवळ पैसा असता तर त्याला मी शिवलों देखील नसतों; परंतु तुम्हांला खुद्द जीवापेक्षांही जें जास्त वाटतें असें तुम्हीं आम्हांला दिलें आहे."

मनुष्याच्या अंतरंगांत दोन निरनिराळीं माणसें असली पाहिजेत. संदीपबाबू मला फसविण्याचा यत्न करीत आहेत हें यांपैकीं एकाला समजतें; परंतु दुसरा फसवून घेण्यास राजी असतो. संदीपबाबूंजवळ शक्ति आहे, परंतु नीतिमत्तेचें बळ मुळींच नाहीं. त्यांच्या शस्त्रांनीं जीवित जागृत होतें; परंतु त्यांनींच तें पुन्हां मरून जातें. कधींही न आटणारा देवांचा भाता त्यांचेजवळ आहे खरा, परंतु त्यांतील बाण मात्र असुरांचे आहेत.

संदीपबाबूंच्या हातरुमालांत कांहीं तीं नाणीं मावतना. "राणी, तुम्ही दुसरा एखादा हातरुमाल देतां काय?" त्यांनीं मला विचारलें.

मीं दिलेला हातरुमाल त्यांनीं मोठ्या भक्तिपूर्वक कपाळाला लावला आणि गुडघे टेकून त्यांनीं मला नमस्कार केला. "देवी," ते म्हणाले, "मी केवळ माझा आदर व्यक्त

करण्यासाठीं तुझ्या शेजारीं आलों होतों; परंतु तूं मला झिडकारलेंस आणि जमिनीवर लोळविलेंस. तसें का होईना ! मी तुझें झिडकारणें मला मिळालेला वरच समजतों आणि तो हा असा वंदनपूर्वक आपल्या मस्तकावर धारण करतों." असें म्हणून त्यांनीं आपल्याला लागलें होतें ती जागा दाखविली.

तर मग मीं त्यांच्या वर्तनाचा भलताच अर्थ केला काय ? त्यांनीं हात पुढें केले होते ते माझ्या पायांला स्पर्श करण्यासाठीं केले होते असेंच खरें असेल काय ? परंतु त्यांच्या नेत्रांतून आणि तोंडांतून विकाराच्याच ज्वाळा बाहेर पडत होत्या हें अमूल्यानें सुद्धां पाहिलें होतें यांत शंका नाहीं. आपल्या स्तुतिस्तोत्राला संगीताचें स्वरूप देण्यांत संदीपबाबूंचा असा हातखंडा आहे कीं, मला वाद घालवतच नाहीं; सत्य पाहण्याची माझी शक्ति नाहींशीच होते; एकाद्या अफीमबाजाप्रमाणें माझे डोळे मेघावृत होतात. आणि शेवटीं आपलें त्यांना दिलेल्या धक्क्याच्या दुप्पट मीं परत दिलें— त्यांच्या जखमेचा शेवट माझ्या हृदयांतून रक्त निघण्यांत झाला. संदीपबाबूंचें वंदन जेव्हां मला प्राप्त झालें तेव्हां माझ्या चोरींत थोडासा थोरपणा आला; आणि टेबलावरचीं चकाकणारीं तीं नाणीं अपमानाची सर्व भीति व सदसद्विवेकबुद्धीची टोंचणी हंसून घालवून टाकीत आहेत असें मला वाटलें.

माझ्याप्रमाणेंच अमूल्य सुद्धां परत जिंकला गेला.

संदीपबाबूंवरील त्याच्या भक्तीला जो थोडा दाब बसला होता तो नाहींसा होऊन त्याची भक्ति पुन्हां प्रज्वलित झाली. त्याच्या मनोरूपी पुष्पपात्रांत मला आणि संदीपबाबूंना अर्पण करण्यासाठीं पुष्कळ फुलें जमा झालीं. प्रभातकाळच्या शुक्राच्या तेजाप्रमाणें त्याच्या सरळ निष्कपट श्रद्धेचें तेज त्याच्या नेत्रांतून बाहेर पडूं लागलें.

मीं भक्ति केली. माझी त्यांनीं भक्ति केली. आणि मग माझें पाप तेजस्वी दिसूं लागलें. आणि अमूल्यानें मजकडे पाहिल्याबरोबर हात जोडून मला वंदन केलें व तो 'वंदे मातरम्'. म्हणून ओरडला. ही माझी भक्ति नेहमींच चालेल अशी कांहीं माझी अपेक्षा नाहीं; आणि तरी सुद्धां स्वाभिमान जागृत ठेवण्याचें मला आतां तें एकच साधन राहिलें आहे.

मला आतां माझ्या शय्यागृहांत जाववत नाहीं. पलंग हात वर करून मला येऊं नको म्हणून सांगतो; लोखंडी तिजोरी मजकडे रागावून टवकारून पाहते. हृदयांत डांचणाऱ्या अशा या माझ्या सतत होणाऱ्या मानखंडनेपासून आपली सुटका करून घ्यावी असें मला वाटतें. संदीपबाबूंकडे जाऊन त्यांनीं गाइलेलीं आपलीं स्तुतिस्तोत्रें एकत राहावें असेंही मला वाटतें. माझ्या सर्वव्यापी अप्रतिष्ठेच्या भारांतून डोकें वर काढण्यास समर्थ अशी ही एकच भक्तीची जागा आहे. आणि म्हणून तिलाच रात्रंदिवस चिकटून राहावें असें मला वाटतें; कारण, तिजपासून मी

कोणत्याही बाजूला सरलें तरी जिकडे तिकडे पोकळीच आहे. स्तुति, स्तुति, मला अविरत स्तुति पाहिजे. माझा मद्याचा पेला एक क्षणभर जरी मोकळा राहिला तरी मला जीव नकोसा होतो. तेव्हां, सगळ्या जगांत आज मला संदीपबाबू माझ्या जीविताची खुद्द किंमत म्हणून सुद्धां पाहिजेत.

४

माझे पति जेव्हां हल्लीं जेवावयाला बसतात, तेव्हां त्यांच्या समोर बसवणार नाहींसें मला वाटतें; परंतु त्या वेळीं त्यांच्या जवळ नसणें ही इतक्या शरमेची गोष्ट आहे कीं, तीहि आपल्याच्यानें होणार नाहीं असें मला वाटतें. तेव्हां, जेथून आम्हांला एकमेकांचीं तोंडें दिसणार नाहींत अशा जागीं मी बसतें. अशीच मी त्या दिवशीं बसलें होतें, तों मोठी जाऊ तेथें येऊन आमच्यांत मिसळली. ती म्हणाली,

" भावोजी, तीं धमकीचीं पत्रें वाचून तुम्ही आपले हंसतां हें ठीकच आहे. पण आम्हांला त्यांची किती भीति वाटते! ते तुम्हीं मला दिलेले पैसे कलकत्ता ब्यांकेंत नेऊन ठवलेत का?"

" नाहीं, मला अद्याप येथून पाय काढावयालाच वेळ झाला नाहीं. " त्यांनीं उत्तर दिलें.

" भावोजी, तुम्ही आपले इतके निष्काळजी आहां; जरा आजूबाजूला पहाल तर किती बरें—"

" परंतु ते पैसे अगदीं खास कपड्यांच्या खोलींत लोखंडी

तिजोरींत आहेत." असें म्हणून ते आश्वासनपूर्वक हंसले.

"आणि ते तेथूनही गेले तर? कोणीं सांगावें!"

"परंतु चोरांना जर इतक्या आंतवर येतां आलें तर तुम्हांला सुद्धां ते नेऊं शकतील!"

"भिऊं नका भावोजी, माझ्या बिचारीकरितां कोणी येणार नाहीं. खरें आकर्षण तुमच्याच खोलींत आहे! परंतु थट्टा राहूं द्या; तुम्ही ते पैसे तसे त्या पेटींत ठेवूं नका."

"मंडळी लवकरच सरकारी धारा घेऊन कलकत्त्यास जाणार आहे. त्यांच्याच बरोबर ते पाठवून देतों."

"कांहीं हरकत नाहीं. परंतु विसरूं नका बरें का? नाहीं तर तुम्ही आपले भ्रमिष्ट!"

"परंतु जरी माझ्या खोलींतून ते रुपये गेले असें समजलें, तरी वहिनी, ते कांहीं तुमचे जावयाचे नाहींत."

"आतां इकडे पहा भावोजी, तुम्ही हें असें बोलूं लागाल तर मात्र मला राग येईल हो! तुमचें आणि माझें, असा फरक मी मुळीं तरी करीत होतें? समजा अगदीं तुमचे पैसे गेले तरी त्यामुळें मला वाईट वाटणार नाहीं काय? तुम्ही माझे भाऊ आहां आणि माझें सर्व कांहीं नेण्याचें जरी भवितव्यतेच्या मनास आलें असलें, तरी लक्ष्मणाच्या वेळेपासून असा प्रेमळ भाऊ दुसरा झाला नाहीं, त्याची किंमत अवर्णनीय आहे, हें जाणण्याची बुद्धि कांहीं भवितव्यतेनें मजपासून हिरावून घेतलेली नाहीं."

"बरें असो. पण धाकट्या राणीसाहेब, तुम्ही काय

लाकडी बाहुली बनलां आहां कीं काय ? तुम्ही अजून एक शब्द सुद्धां बोललां नाहीं. तुम्हांला माहीत आहे का भावोजी ? मी तुमची नसती खुशामत करतें असें आमच्या धाकटया राणीसाहेबांना वाटतें. तशी वेळ आली तर मी खुशामत करावयाला मुळींच मागेंपुढें पाहणार नाहीं. परंतु माझ्या भावोजींना खुशामतीची जरूरीच नाहीं !"

अशा तऱ्हेनें मोठ्या जाऊबाईंची एकसारखी टकळी चालली होती. मधून मधून अमुक पदार्थ चांगला आहे, तमुक पदार्थ सुरेख आहे असेंही त्या त्यांना सुचवीत होत्या. माझें डोकें मात्र सगळा वेळ भोंवऱ्यांत सांपडल्यासारखें भ्रमण करीत होतें. आणीबाणीचा प्रसंग जवळ येऊन ठेपत होता. ते पैसे परत ठेवण्यासंबंधीं कांहीं तरी तजवीज करावयालाच पाहिजे होती. कसें करावयाचें व काय करावयाचें या विचारांनीं जों जों माझें मस्तक संतप्त होऊं लागलें तसतसें माझ्या जावेचें तें अविरत बडबडणें मला जास्त जास्त असह्य होऊं लागलें.

आणि तें भाषण सगळ्यांत जास्त कडू लागण्याचें कारण असें कीं, जाऊबाईंच्या तीक्ष्ण दृष्टींतून कांहींही निसटत नसे. एकसारखी ती माझ्याकडे आजूबाजूनें पाहत होती. माझ्या चेहऱ्यावरून तिला काय समजत होतें मला कांहीं ठाऊक नाहीं. परंतु सर्व कांहीं माझ्या तोंडावर अगदीं स्पष्टपणें लिहिलेलें आहे असें मला वाटलें.

मग मीं एक मोठें अविचाराचें कृत्य केलें. अगदीं गमतीनें स्वाभाविक हास्य करण्याचा प्रयत्न करून मीं म्हणालें, " मोठ्या राणीसाहेबांचा सगळा संशय माझ्यावर आहेसें दिसतें. चोर आणि दरवडेखोर या संबंधींचा त्यांचा सगळा संशय म्हणजे ढोंग दिसतें. "

छद्मी हास्य करून मोठी राणी म्हणाली, " बरोबर आहे तुमचें म्हणणें बाई. स्त्रीची चोरी सगळ्या चोरींत मोठी घातकी चोरी असते. परंतु माझ्या दक्षतेपुढें तुम्ही काय लपवालपवी करणार ? मी काय पुरुष आहें म्हणून तुम्ही माझ्या हातांत गूळखोबरें देऊन मला फसवूं शकाल ? "

" माझी जर तुम्हांला भीति वाटत असेल, " मीं टोमणा दिला, " तर माझें जें जें कांहीं आहे तें मी तुमच्या स्वाधीन करून ठेवतें. म्हणजे मीं जरी कांहीं तुमचा तोटा केला तरी तो तुम्हांला भरून घेतां येईल. "

" ऐका, ऐका तर खरें आमच्या साध्याभोळ्या धाकट्या राणीसाहेबांचें बोलणें ! " असें म्हणून माझ्या पतींकडे वळून ती हंसली आणि पुढें म्हणाली, " कित्येक तोटे असे असतात कीं, ते या जन्मीं अथवा पुढच्याही जन्मीं मुळींच भरून काढतां येत नाहींत. हें त्यांना ठाऊक नाहींसें दिसतें. "

आमच्या बोलाचालींत माझे पति मुळींच मिसळले नाहींत. जेवण आटोपल्याबरोबर ते बाहेरच्या भागांत निघून गेले. कारण अलीकडे आमच्या आंतल्या खोलींत दुपारची विश्रांति

ध्यावयाचें त्यांनीं सोडून दिलें आहे.

माझीं मोठ्या किंमतीचीं सगळीं रत्नें खजीनदाराच्या ताब्यांत तिजोरींत ठेवलेलीं होतीं. तरी पण मजजवळ जें काय होतें त्याची किंमत तीसचाळीस हजार रुपये तरी झाली असती. मीं आपली जवाहिराची पेटी मोठ्या राणीच्या खोलींत नेली आणि ती तिच्यापुढें उघडी ठेवून म्हटलें, " हें सगळें मी तुमच्याजवळ ठेवतें; तें तुम्हांला सगळ्या प्रकारच्या चिंतेंतून सोडवील.."

मोठ्या निराशेचा आव घालून मोठी राणी म्हणाली, " धाकट्या राणीसाहेब, तुम्ही मला खरोखर थक्क करतां ! तुम्ही मला लुबाडाल अशी भीति वाटून मला रात्रीची झोंप सुद्धां येत नाहीं असें तुम्हाला अगदीं मनापासून का वाटतें ? "

" हो ! माझ्यासंबंधीं तुमच्या मनांत आपली चांगलीच भीति असली तर काय सांगावें ? या जगांत एकाला दुसऱ्याविषयीं काय माहिती असणार ? "

" माझ्यावर विश्वास टाकून मला तुम्ही एक धडा शिकवूं पाहतां काय ? नको ! नको ! माझ्या स्वतःच्याच जवाहिरासंबंधीं काय करावयाचें याचा मला कोण त्रास होतो आहे. त्यांत आणखी तुमच्याची भर नको. तुम्ही आपलें तें घेऊन जा. तुमचा प्यारा आहेच. इकडे गडीमाणसांची गर्दी आहे. मोठीं चौकस माणसें तीं. "

मोठ्या राणीच्या खोलींतून मी थेट बाहेर बसण्याच्या

खोलींत आलें आणि अमूल्याला हांक मारली. त्याच्या बरोबर संदीपबाबू पण आले. मीं घाईघाईनें संदीपबाबूंना म्हटलें, "तुमची कांहीं हरकत नसेल तर मला अमूल्याशीं थोडेंसें एकीकडे बोलावयाचें आहे. तुम्ही जरा बाहेर जातां काय?"

संदीपबाबू छद्मी स्मित करून म्हणाले, "तर मग मी आणि अमूल्य तुमच्या दृष्टीनें निरनिराळे आहों तर? माझ्यापासून त्याला दूर करण्याचा तुमचा विचार ठरला असेल तर आपण कबूल करतों कीं, त्याला थांबवून धरण्याची कांहीं आपली शक्ति नाहीं."

मी कांहींच उत्तर न देतां तशीच वाट पाहत उभी राहिलें.

"कांहीं हरकत नाहीं," संदीपबाबू पुढें म्हणाले, "होऊं द्या तुमचें अमूल्याबरोबर खास संभाषण. पण मग तुम्हीं मला पण अगदीं खास संभाषणाचा लाभ दिला पाहिजे; नाहींतर माझा अपमान झालासें होईल. मी काय वाटेल तें सहन करीन; परंतु माझ्याच्यानें पराभव सहन होणार नाहीं. भवितव्यतेशीं माझा हाच सतत तंटा चालला आहे. मी स्वत: आपल्या नशिबाला पराजित करीन पण त्याच्याकडून कधींही पराजित होणार नाहीं." अमूल्याकडे एक क्रूर दृष्टिपात करून संदीपबाबू खोलीच्या बाहेर निघून गेले.

"अमूल्य, माझ्या लहानग्या पाडसा, माझ्यासाठीं तुला एक काम केलें पाहिजे." मी म्हणालें.

"मला कोणतेंही काम करावयाला सांग ताई तूं त्यांच्याकरितां मी आपला जीव सुद्धां धोक्यांत घालीन."

शालींत गुंडाळलेली माझी जवाहिराची पेटी बाहेर काढून त्याच्या पुढें ठेवून मीं म्हटलें, "ही वीक अथवा गहाण टाक, आणि शक्य तितक्या लौकर मला सहा हजार रुपये आणून दे."

अमूल्याला वाईट वाटून तो म्हणाला, "छे ! छे ! ताई, राहूं दे हें जवाहीर. मी आपले तुला सहा हजार रुपये आणून देतों."

"असें मूर्खासारखें करूं नकोस." मी उतावीळपणें म्हणालें. "असल्या मूर्खपणाला आतां वेळ नाहीं. ही पेटी घे. कलकत्त्याला रात्रीच्या पहिल्या गाडीनें जा. परवां अगदीं पैसे घेऊन येच."

अमूल्यानें पेटींतून एक हिऱ्याची माळ काढली आणि ती उजेडांत धरून तो तिजकडे उदासपणें पाहूं लागला.

मीं त्याला सांगितलें, "या हिऱ्यांची योग्य किंमत तुला मिळावयाची नाहीं हें मी जाणतें; आणि म्हणून तुला ही तीस हजारांच्या वर किंमतीची पेटी देत आहें. तें सगळें गेलें तरी फिकीर नाहीं, परंतु मला सहा हजार अगदीं न चुकता मिळालेच पाहिजेत."

अमूल्य म्हणाला, "तुला माहीत आहे का ताई ? संदीपबाबूंनीं तुजजवळून ते ६००० रुपये घेतले त्यावरून त्यांच्यांशीं माझें भांडण झालें. मला किती लाज वाटली हें

कांहीं सांगतां येत नाहीं. परंतु देशाकरितां लाज सोडली पाहिजे असा संदीपबाबू आग्रह धरून बसले. बाकी तसेंही असेल, परंतु ही गोष्ट मला आपली कशानें तरी निराळी वाटते. देशासाठीं मरण्याची अथवा मारण्याची मला भीति वाटत नाहीं; एवढी शक्ति मला मिळालेली आहे. पण तुझ्यापासून पैसे घेतल्याबद्दलची लाज कांहीं माझी जात नाहीं. संदीपबाबू या बाबतींत माझ्या पुढें आहेत. त्यांना पश्चात्ताप अथवा अनुताप माहीत नाहीं. ज्याच्या पेटींत पैसा असतो त्याच्याच तो मालकीचा आहे ही कल्पना आम्हीं सोडून दिली पाहिजे असें त्यांचें म्हणणें आहे. नाहीं तर मग 'वंदे मातरम्' ची जादू कोठें राहिली ? "

अमूल्याचा उत्साह बोलतां बोलतां वाढूं लागला. मी त्याचें बोलणें ऐकावयाला असलें म्हणजे त्याला मोठा उत्साह येतो. "गीता आम्हांला सांगते," तो पुढें म्हणाला, "कीं आत्म्याला कोणी मारूं शकत नाहीं. हनन हा एक केवळ शब्द आहे. त्याचप्रमाणें पैसे घेणें हाही एक शब्दच आहे. पैसा कोणाचा ? तो कोणींच उत्पन्न केला नाहीं. मरतेसमयीं आपल्या बरोबर तो कोणालाही नेतां येत नाहीं; कारण तो कांहीं आत्म्याचा अंश नव्हे—आज तो माझा आहे; उद्यां तो माझ्या मुलाचा होईल; परवां तो सावकाराकडे जाईल. तेव्हां ज्या अर्थी पैसा कोणाच्याच मालकीचा नाहीं त्या अर्थी आमच्या देशभक्तांनीं एखाद्या भिकारड्या पोरासाठीं

तो ठेवण्याऐवजीं आपल्या उपयोगाकरितां घेतला तर त्यांना दोष काय म्हणून लागावा ? ”

संदीपबाबूंचे शब्द या मुलाच्या तोंडून ऐकले म्हणजे माझ्या सर्व शरीराला कंप सुटतो. जे सर्पमंत्री असतील त्यांनींच सर्पाशीं खुशाल खेळावें; त्यांच्यावर संकट आलेंच तर त्याकरितां त्यांची तयारी असते. परंतु हीं मुलें इतकीं निष्कपटी आहेत कीं, सर्व जग त्यांचें आपल्या आशीर्वादानें संरक्षण करण्यास तयार आहे. ते सर्पाचा स्वभाव न ओळखतां त्याच्याशीं खेळूं लागतात आणि जेव्हां ते आपले हात सर्पाच्या सुळ्यांच्या तडाक्यांत सांपडतील इतके पुढें हंसत हंसत विश्वासानें नेतांना आम्हांला दिसतात तेव्हां सर्प किती भयंकर आहे याची आम्हांला कल्पना येते. मी स्वतः जरी संदीपबाबूंच्या हातून मरावयाला तयार असलें तरी त्यांच्यापासून या मुलाला तोडून मी त्याचें संरक्षण करणार हा संदीपबाबूंचा संशय अगदीं बरोबर आहे.

“ तर मग मीं दिलेला पैसा तुम्हां देशभक्तांच्या उपयोगासाठीं हवा आहे वाटतें ? ” मीं स्मित करून विचारलें.

“ अर्थात त्यांच्यासाठींच. ” अमूल्य ताठ्यानें म्हणाला. “ ते आमचे राजे नाहींत काय ? दारिद्र्य त्यांची राजसत्ता हिरावून नेतें. तुम्हाला माहीत आहे काय कीं, संदीपबाबूंनीं पहिल्या वर्गांतून प्रवास करावा असा आमचा नेहमीं त्यांना आग्रह असतो ! राजाचे मान ते कधींही नाकारीत

नाहींत. त्यांचा स्वीकार ते कांहीं स्वतःसाठीं नाहीं, तर आम्हां सर्वांच्या कीर्तीसाठीं करतात. जगावर जे सत्ता गाजवितात त्यांचें सर्वांत मोठें शस्त्र म्हणजे त्यांच्या भपक्याची मोहिनी होय असें संदीपबाबूंनीं आम्हांला सांगितलें आहे. दारिद्र्याचें व्रत पतकरणें म्हणजे केवळ तपश्चर्याच नव्हे तर त्यांत त्यांची आत्महत्याही पण होईल."

या सुमारास संदीपबाबू कसलाही आवाज न करतां खोलींत आले. मीं मोठी गडबड करून जवाहिराच्या पेटीवर शाल टाकली.

"खास भाषणाचें काम अजून आटोपलें नाहीं ?" संदीपबाबू उपहासपूर्वक म्हणाले.

"होय. आमचें आतां अगदीं संपण्याच्या बेतांत आलें आहे." अमूल्य अपराध्याप्रमाणें म्हणाला. "कांहीं फारसें नाहीं कांहीं."

"नाहीं अमूल्य," मीं म्हटलें, "आपलें काम अद्याप आटोपलें नाहीं."

"म्हणून संदीप पुन्हां एकदां बाहेर जा असेंच कीं नाहीं ?" संदीपबाबू म्हणाले.

"आपल्या मर्जीप्रमाणें."

"आणि संदीपच्या पुन्हां आंत येण्यासंबंधीं—"

"आज नाहीं. मला वेळ नाहीं."

"अस्सें अस्सें !" संदीपबाबू म्हणाले. त्यांच्या डोळ्यांतून अग्निस्फुलिंग बाहेर पडूं लागले. "फुकट

घालवावयाला वेळ नाहीं. खास संभाषणाला मात्र आहे !"

मत्सर ! बलिष्ठ पुरुषानें कमकुवतपणा दाखविला रे दाखविला कीं, कमकुवत बायका जयध्वनिसूचक ढोलकें वाजविणारच. तेव्हां मी पुन्हां धीटपणें म्हणालें, "मला खरोखरच वेळ नाहीं."

संदीपबाबू कृष्णवर्ण चेहरा करून निघून गेले. अमूल्य संत्रस्त होऊन काकुळतीनें म्हणाला, "ताई राणी, संदीपबाबूंना वाईट वाटलेंसें दिसतें."

"त्यांना वाईट वाटण्यास कारणही नाहीं अथवा हक्कही नाहीं." मी जोरानें म्हणालें. "अमूल्य, मला तुला एका गोष्टीविषयीं सावध करावयाचें आहे. माझ्या या जवाहिरासंबंधीं संदीपबाबूंजवळ एक चकार शब्दही काढूं नकोस. तुझ्या गळ्याची शपथ."

"बरें आहे. नाहीं बोलणार."

"मग आतां तूं विलंब करूं नकोस. रात्रीच्या गाडीनें तुला गेलें पाहिजे."

अमूल्य आणि मी एकदमच खोलीच्या बाहेर पडलों. संदीपबाबू पडवींतच उभे होते. अमूल्याला वाटेंत घेरण्यासाठीं ते तेथें उभे राहिले होते हें मीं तेव्हांच जाणलें. त्यांनीं तसें करूं नये म्हणून त्यांना अडकवून ठेवणें मला प्राप्त होतें. म्हणून मीं त्यांना विचारलें "काय तुम्ही सांगणार होतां मला संदीपबाबू ?"

"मला कांहीं विशेष सांगावयाचें नव्हतें. उगीच

थोडेंसें बोलावयाचें होतें. परंतु तुम्हांला आतां वेळ नाहीं, तेव्हां—"

"थोडासा वेळ आहे मला."

एवढ्या वेळांत अमूल्य निघून गेला. आम्ही खोलींत गेल्यावर संदीपबाबूंनीं विचारलें, "अमूल्य घेऊन गेला त्या पेटींत काय होतें?"

ती पेटी त्यांच्या दृष्टींतून निसटली नव्हती. मीं पूर्वींइतक्याच निर्धारानें म्हटलें, "मला जर तुम्हांला सांगावयाचें असतें तर मग मीं पेटी तुमच्या समक्षच त्याला नसती कां दिली?"

"तर मग अमूल्य मला सांगणार नाहीं असें तुम्हांला वाटतें काय?"

"होय. नाहींच तो सांगणार."

संदीपबाबूंच्यानें आतां आपला राग दाबून ठेववेना. ते क्रोधानें म्हणाले, "माझ्यावर तुम्हाला वर्चस्व मिळेल असें तुम्हाला वाटतें काय? परंतु असें कधींही होणार नाहीं! माझी इच्छाच असली तर माझ्या पायांखालीं अमूल्य सुखानें मरेल. परंतु मी जिवंत आहें तोंपर्यंत तुमच्या पायांशीं मी त्याला तुम्हाला आणूं देणार नाहीं."

अरेरे! किती दुर्बळ! किती दुर्बळ!! माझ्या पुढें आपलें कांहीं चालणार नाहीं हें संदीपबाबूंना पुरें समजून चुकलें; त्याचाच परिणाम हा त्यांच्या रागाचा आकस्मिक उमाळा. माझ्या आंगीं जी शक्ति आहे तिच्याशीं आपल्याला

नुसत्या शरीरसामर्थ्याच्या जोरावर तोंड देतां येणार नाहीं हें त्यांना आतां समजून चुकलें. त्यांच्या बलाढ्य तटबंदया एका दृष्टिपातासरशीं धडपडवून टाकण्याची शक्ति माझ्या आंगीं होती. तेव्हां शिरा ताणण्याखेरीज त्यांना आतां गत्यंतरच नव्हतें. मीं तिरस्कारानें स्तब्ध राहून नुसतें स्मित केलें. शेवटीं एकदां मी त्यांच्यापेक्षां उच्च पायरीवर चढलें होतें. आतां मात्र ही अनुकूल जागा धरून बसावयाला पाहिजे होतें. तेथून मी खालीं उतरणें कधींही चांगलें झालें नसतें. माझ्या अप्रतिष्ठेच्या सागरांत मला ही एवढी तरी सन्मानाची झुळूक अवश्य पाहिजे होती.

संदीपबाबू बराच वेळ थांबून म्हणाले, " ती तुमची जवाहिराची पेटी होती; मला माहीत आहे. "

" तुम्ही आपला वाटेल तो तर्क लढवा. " मी म्हणालें. " माझ्याकडून तुम्हांला कांहीं कळणार नाहीं. "

" म्हणजे एकंदरींत तुमचा माझ्यापेक्षां अमूल्यावर जास्त भरंवसा आहे ! तो पोर म्हणजे निव्वळ माझ्या सावलीची पडछाया, माझ्या ध्वनीचा प्रतिध्वनि आहे. मी पाठीशीं नसलों म्हणजे तो कांहीं नाहीं, हें तुम्हाला माहीत नाहीं वाटतें ? "

" ज्या ठिकाणीं तुमचा प्रतिध्वनि नाहीं त्या ठिकाणीं तो स्वतः अमूल्य असतो आणि तुमचा प्रतिध्वनि नसलेल्या अमूल्यावरच माझा जास्त विश्वास आहे. "

" देवी मातेच्या पूजेसाठीं—भक्तिप्रचारासाठीं—तुम्हीं

आपले सर्व अलंकार मजला देण्याचें वचन दिलें आहे हें तुम्हीं विसरूं नये. "

" मजजवळ जेवढे अलंकार देव शिल्लक ठेवतील ते सगळे मी देवांना अर्पण करीन. परंतु मजपासून चोरीस गेलेले अलंकार मीं कसे अर्पण करावे ? "

" हें पहा, मला अशा तऱ्हेनें शृंगारा देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आतांच खरी कामाची वेळ आहे. तवढें कार्य संपूं द्या, मग तुमच्या स्त्रियांच्या मोहिनीचे डाव खुशाल खेळा, त्यांत मी तुम्हाला मदत करीन. "

ज्या क्षणीं मीं पतींच्या तिजोरींतील पैसे चोरून संदीपबाबूंना आणून दिले त्या क्षणापासून आमच्या एकमेकांच्या संबंधांतील संगीत नष्ट झालें. मीं स्वतःला स्वस्त विकून स्वतःची किंमत कमी केली, एवढेंच नव्हे तर त्यामुळें संदीपबाबूंच्या सामर्थ्याला पुरेशी वाव नाहींशी झाली. आपल्या अगदीं हातांत जी वस्तु आली तिजवर नेम कसा मारतां येणार ? तेव्हां संदीपबाबूंचें नायकस्वरूप नाहींसें होऊन त्यांच्या आंगीं एक प्रकारचा चिरचिरेपणा आतां आला आहे.

संदीपबाबूंनीं आपल्या तेजस्वी डोळ्यांनीं मजकडे एकसारखी टक लावली. शेवटीं अगदीं अगदीं मध्याह्न काळच्या आकाशाप्रमाणें त्यांच्या डोळ्यांतून तृष्णा तळपून बाहेर पडूं लागली. एक दोनदां तर आपल्या जागेवरून उठून आतां ते माझ्यावर झडप घालतात कीं काय अशी

त्यांनीं चळवळ केली. माझें सर्व शरीर तरंगत आहे असें मला वाटलें. शिरा उडूं लागल्या, कानांत कढत रक्त उसळूं लागलें. तेथेंच बसलें तर पुन्हां तेथून केव्हांच उठावयास नको असें मला वाटलें. मोठा प्रयत्न करून मी खुर्चीवरून उठलें आणि दाराकडे धूम ठोकली.

" कोठें पळणार तुम्ही राणीसाहेब ? " असें संदीपबाबू तोंडांतल्या तोंडांत ओरडले. दुसऱ्याच क्षणीं मला धरण्यासाठीं त्यांनीं आपल्या बैठकीवरून उडी मारली; परंतु दाराबाहेर चाहूल ऐकूं आल्यामुळें ते चटकन परतले आणि आपल्या खुर्चीवर जाऊन पडले. मी आपले पाय पुस्तकांच्या मांडणीकडे वळवून पुस्तकांच्या नांवांकडे शून्य दृष्टीनें टक लावून पाहत उभी राहिलें.

माझे पति खोलींत शिरल्याबरोबर संदीपबाबू म्हणाले, " हें पहा निखिल, तूं या पुस्तकांत ब्राउनिंग कवीचीं पुस्तकें ठेवूं नकोस बोवा. आतांच मी मधुराणीला आपल्या कॉलेज क्लबाविषयीं सांगत होतों. या ब्राउनिंगच्या एका काव्यांतील कांहीं ओळींच्या भाषांतराविषयीं आपला केवढा वाद झाला तुला नाहीं आठवत ? मीं त्या ओळींचें बंगालींत भाषांतर जेमतेम केलें; परंतु त्यामुळें बंगाली लोकांना कायमचा आनंद वाटेल असें कांहीं तें भाषांतर उतरलें नाहीं. एक वेळ आपण कवि बनण्याच्या अगदीं बेतांत आलों असें मला खरोखर वाटूं लागलें होतें; परंतु भवितव्यतेनें दयाळूपणानें मला त्या संकटांतून वांचविलें. तुला आपला दक्षिणा

आठवतो का ? तो जर मिठावरील इन्स्पेक्टर झाला नसता तर खात्रीनें कवि झाला असता. त्याचें भाषांतर मला आज सुद्धां आठवत आहे."

"छे ! मधुराणी ! आतां त्या पुस्तकांच्या रांगा धुंडाळण्याची कांहीं जरूरी नाहीं. विवाह झाल्यापासून निखिलनें काव्य वाचण्याचें सोडून दिलें आहे; कदाचित त्याला त्याची जरूरीच उरली नसावी. परंतु मला वाटतें, संस्कृतांत म्हटल्याप्रमाणें 'काव्यज्वरा'चा त्याला पुन्हां झटका येऊं पाहत आहे."

"संदीप, मी तुला आगाऊ सूचना देण्यासाठीं आलों आहें." ते म्हणाले.

"या 'काव्यज्वरा'संबंधीं कीं काय ?"

या त्यांच्या विनोदाच्या प्रयत्नाकडे माझ्या पतींनीं लक्षच दिलें नाहीं. ते पुढें म्हणाले, "आज कांहीं दिवस मुसलमान उपदेशक स्थानिक मुसलमानांना आपल्या उपदेशानें चेतवीत आहेत. ते सर्व तुझ्यावर रागावले आहेत आणि तुझ्यावर ते केव्हां हल्ला करतील याचा नेम नाहीं."

"मग तूं मला पळून जाण्याचा उपदेश करण्यासाठीं आला आहेस कीं काय ?"

"मी तुला माहिती देण्यासाठीं आलों आहें, उपदेश करण्यासाठीं नव्हे !"

"ही इस्टेट जर माझी असती तर असल्या सूचनेची

गरज माझ्यापेक्षां त्या उपदेशकांनाच जास्त भासली असती. मला भीति दाखविण्याएवजीं तूं त्यांनाच जर भीतीचा थोडासा तडाका दाखविशील तर तें तुला आणि मलाही जास्त शोभेलसें होईल. तुझ्या कमकुवतपणामुळें इतर जमीनदारांची शक्ति कमी होत आहे हें तुला माहीत आहे काय ? ”

“ संदीप, मीं तुला उपदेश केला नाहीं तसाच तूंही पण मला करणार नाहींस तर बरें. शिवाय त्याचा कांहीं उपयोगही नाहीं. आणखी एक गोष्ट तुला सांगावयाची आहे. तूं आणि तुझे अनुचर माझ्या कुळांना गुप्तपणें त्रास देत आहां आणि त्यांच्यावर जुलूम करीत आहां. हें मला आतां यापुढें चालूं देतां येणार नाहीं. तेव्हां तूं माझा प्रदेश सोडून जा असें तुला सांगणें मला भाग आहे. ”

“ केवळ मुसलमानांचीच भीति, का आणखी एखादी भीति तूं मला घालणार आहेस ? ”

“ पुष्कळ भयें अशीं असतात कीं तीं नसणें म्हणजे दुर्बळता—भित्रेपणा—होय. त्या भयांच्या नांवानें मी तुला सांगतों कीं, संदीप तूं गेलेंच पाहिजे. पांच दिवसांनीं मी कलकत्त्यास जाणार आहें त्या वेळीं तूं मजबरोबर आलें पाहिजे. तूं पाहिजे तर तेथें माझ्या घरांत रहा. त्याला माझी मुळींच हरकत नाहीं. ”

“ कांहीं हरकत नाहीं. अजून मला पांच दिवस आहेत. तेव्हां आतां मधुराणी, तुमचें पोळें सोडून जातेसमयीं मला एक गीत गुणगुणूं द्या. अहा ! हे

आधुनिक बंगालच्या कवे ! आपलीं द्वारें उघडीं ठेव आणि मला तुझे शब्द लुटूं दे. ती चोरी तुझी आहे; कारण, माझें कवन तूं आपलेंसें केलें आहेस. त्यावर नांव जरी तुझें असलें तरी तें कवन माझेंच आहे." असें म्हणून संदीपबाबूंनीं खोल, घोगऱ्या आणि बेताल सुरांत भैरवी रागांत एक पद म्हटलें.

संदीपबाबूंचें पद म्हणतां वेळचें धाष्टर्य अपरिमित होतें. त्याला मुळींच आडपडदा नव्हता. तें अग्नीसारखें नग्न होतें. तें थांबविण्याची शक्ति कोणाजवळ नव्हती. त्याला थांबविणें म्हणजे वज्राला विरोध करण्यासारखें होतें. वीज चमकते ती सर्व विरोधाला जणूं काय हंसतेच.

मी खोलींतून निघून आलें. पडवींतून आंतील बाजूस जात होतें तों एकाएकीं अमूल्य मजपुढें येऊन उभा राहिला.

"भिऊं नको ताई," तो म्हणाला, "मी आज रात्रीं जातों; आणि तो अयशस्वी होऊन कांहीं परत येणार नाहीं !"

त्याच्या निष्कपट तरुण मुखाकडे थेट पाहून मीं म्हटलें, "अमूल्य, मला स्वत:विषयीं मुळींच भीति वाटत नाहीं. परंतु तुझ्याविषयीं मात्र मला एकसारखी भीतीच वाटणार."

अमूल्य जाऊं लागला, परंतु तो दृष्टीआड होण्यापूर्वींच मीं त्याला हांक मारून विचारलें, "अमूल्या, तुला आई आहे का रे ?"

"आहे."

"बहीण ?"

" नाहीं. मी आपल्या आईचा एकुलता एकच मुलगा आहें. माझे वडील वारले तेव्हां मी अगदीं लहान होतों. "

" तर मग अमूल्य, आपल्या आईकडे परत जा. "

" पण राणी ताई, मला आतां आई आणि बहीण दोघीही आहेत. "

" मग अमूल्य, तूं रात्रीं निघण्यापूर्वीं येथें ये आणि येथेंच जेवून जा. "

" जेवावयाला वेळ मिळणार नाहीं. तुझ्या स्पर्शानें पवित्र झालेलें कांहीं तरी प्रवासांत खावयाला मजजवळ दे म्हणजे झालें. "

" तुला विशेष काय आवडतें, अमूल्य ? "

" मी जर आईकडे असतों तर मला करंज्या पुष्कळ मिळाल्या असत्या. राणी ताई, तुझ्या हातच्या केलेल्या त्या थोड्याशा मला दे म्हणजे झालें. "

## प्रकरण पंधरावें

### निखिलची आत्मकथा

१

संदीपनें हरीश कुंडूशीं गट्टी केली असून राक्षसविनाशिनी देवीच्या पूजेचा मोठा भपकेदार समारंभ व्हावयाचा आहे असें मला गुरुजींकडून कळलें. त्याच्या खर्चासाठीं हरीश कुंडू आपल्या कुळांजवळून पैसे सक्तीनें जमा करीत होता. पंडित कविरत्न आणि पंडित विद्यावागीश यांना एक द्व्यर्थी स्तोत्र रचण्याचें काम देण्यांत आलें होतें.

या बाबतींत नुकताच माझ्या गुरुजींचा संदीपबरोबर मोठा कडाक्याचा वाद झाला. संदीप म्हणतो, " उत्क्रांतीचें कार्य देवांमध्यें सुद्धां चाललें आहे. आजानें उत्पन्न केलेल्या देवांना नातवाला एक तर नवीन स्वरूप द्यावें लागतें; नाहीं तर त्याला अनीश्वरवादी व्हावें लागतें. प्राचीन देवांना अर्वाचीन स्वरूप देणें माझें उद्दिष्ट कार्य आहे. देवांना

भूतकाळाच्या तावडींतून उद्धरण्यासाठीं देवांचा संरक्षक म्हणून माझा जन्म झाला आहे."

संदीप कल्पनांशीं कसा गारोडीपणा करतो हें लहानपणापासून मला ठाऊक आहे. सत्य शोधून काढण्यात त्याला गोडी वाटत नाहीं. परंतु त्याचें विनोदात्मक विकृत प्रदर्शन करण्यानें मात्र त्याच्या मनाला फार आनंद होतो. तो जर आफ्रिकेच्या जंगलांत उत्पन्न झाला असता तर मनुष्यांमनुष्यांत खरें स्नेहसंवर्धन करण्याला सर्वोत्तम साधन म्हणजे नरमांसभक्षण होय असें सिद्ध करण्यासाठीं त्यानें मुद्दयावर मुद्दे पुढें आणले असते. परंतु जे स्वतः मोह उत्पन्न करण्याच्या भानगडींत पडतात ते स्वतःलाच शेवटीं मोहांत पाडतात. आणि संदीपनें एकदां आभास उत्पन्न केला कीं त्याच्या या आभासात्मक सृष्टींत एकमेकांविरुद्ध कांहीं गोष्टी असल्या तरी ते सर्व आभास खरेच आहेत अशी त्याला आपल्या मनाची समजूत करून घ्यावी लागते यांत संशय नाहीं.

परंतु माझ्या देशांत दारूची भट्टी प्रस्थापित करावयाला मी कांहीं हातभार लावणार नाहीं. देशासाठीं आपली सर्व सेवा अर्पण करणाऱ्या तरुणांना ही दारू पिऊन झुंगण्याची संवय लागतां उपयोगी नाहीं. परंतु जे लोक या निशापूर्ण पद्धतीनें काम करून घेतात ते, ज्या मनाला ते निशा पाजतात त्याच्या पेक्षां त्या प्रक्षोभाचीच किंमत जास्त मानतात.

तुला गेलेंच पाहिजे असें संदीपला विमलच्या समक्ष मला सांगावें लागलें. बहुतेक दोघेंही जण माझ्यावर या बाबतींत वाईट हेतूचा आरोप करतील. परंतु माझा हेतु त्यांना नीट समजणार नाहीं या भीतीपासूनही मीं स्वतःला सोडवून घेतलें पाहिजे. खुद्द विमलनें माझ्या हेतूचा विपर्यास केला तरी बेहेत्तर—.

डाक्क्याहून इकडे कितीतरी मुसलमान उपदेशक पाठवले जात आहेत. माझ्या प्रांतांतील मुसलमान लोक गोहत्येचा जवळ जवळ हिंदूंप्रमाणें तिटकारा करूं लागले होते. परंतु आतां जिकडे तिकडे गोहत्येचे प्रसंग बरेच वेळां येऊं लागले आहेत. प्रथम प्रथम ही बातमी मला माझ्या मुसलमान कुळांनींच कळवून स्वतःची त्याबद्दल नापसंती व्यक्त केली. या परिस्थितीला तोंड देणें फार कठीण जाणार हें मी पूर्णपणें ओळखून होतों. त्याच्या मुळाशीं धर्मवेडाचें ढोंग होतें; परंतु विरोध केल्याबरोबर तें ढोंग नाहींसें झालें असतें. आणि त्यांतच तर या हालचालीची खरी खुबी होती!

मीं आपल्या कांहीं मुख्य हिंदु कुळांना बोलावून घेतलें आणि त्यांना ही गोष्ट योग्य तऱ्हेनें समजावून सांगण्याचा प्रयत्न करून म्हणालों, "आपली मतें पाळण्यांत आपण अगदीं दृढ असावें व असतांही येईल. परंतु दुसऱ्यांच्या मतांवर कांहीं आपल्याला ताबा ठेवतां येणार नाहीं. आपल्यापैकीं पुष्कळसे लोक अगदीं वैष्णव आहेत; परंतु आपल्यापैकीं जे शाक्त आहेत त्यांचे पशुयज्ञ चाललेच आहेत

ना? त्याला कांहीं उपाय नाहीं. त्याचप्रमाणें मुसलमानांना जसें वाटतें तसें करूं देणें आपल्याला प्राप्त आहे. तेव्हां कसलाही गोंधळ करूं नका."

ते म्हणाले, "महाराज, हीं असलीं अधर्मकृत्यें आज कित्येक दिवस ऐकूं येत नव्हतीं."

"त्यांची तशी इच्छा म्हणून तसें घडून येत असे. पुन्हां एकदां तसेंच होईल अशा तऱ्हेनें आपण वागलें पाहिजे. परंतु शांतताभंग करणें हा कांहीं तें घडवून आणण्याचा मार्ग नव्हे."

ते पुन्हां म्हणाले, "नाहीं महाराज, ते पूर्वीचे चांगले दिवस आतां गेले. तुम्ही त्यांना चांगला हात दाखविल्याखेरीज कांहीं हें आतां थांबावयाचें नाहीं."

"जुलुमामुळें गोहत्या बंद होण्याचें तर दूरच राहो परंतु मनुष्य मारण्यापर्यंत मात्र पाळी येईल."

त्यांपैकीं एक जण इंग्रजी शिकलेला होता. त्याला प्रचलित काळांतील कांहीं संप्रदाय बोलण्याची संवय होती. तो म्हणाला, "हा कांहीं निव्वळ धर्ममताचा प्रश्न नाहीं. आमचा देश मुख्यत्वेंकरून शेतकीप्रधान आहे; आणि गाई—"

मी मध्येंच म्हणालों, "या देशांत म्हशी सुद्धां गाईप्रमाणेंच दूध देतात आणि त्यांचा नांगरटीलाही उपयोग होतो. म्हणून जोंपर्यंत त्यांच्या रक्तानें माखलेल्या आमच्या देवळांच्या चिरेबंदीवर त्यांचीं मस्तकें घेऊन आपण उत्साहातिरेकानें

नाचत आहों तोंपर्यंत धर्माच्या नांवानें आपण मुसलमानांशीं भांडूं लागलों तर धर्म आपणांला हंसेल मात्र. आणि आमच्या भांडणांशिवाय वास्तविक असें कांहीं शिल्लकही राहावयाचें नाहीं. फक्त गाईचाच वध करणें अपवित्र मानावयाचें, म्हशीचा नाहीं, हें म्हणणें म्हणजे निव्वळ धर्मवेडेपणा आहे; धर्म नाहीं. "

" परंतु हें असें कां होतें तें आपल्याला ठाऊक आहे काय ? " इंग्रजी शिकलेला गृहस्थ पुढें म्हणाला; " कायदा मोडला तरी आपलें कांहीं होणार नाहीं अशी मुसलमानांना खात्री असते म्हणून. तुम्हांला पाचूरच्या खटल्याची हकीकत कळली नाहीं काय ? "

" परंतु आमच्याविरुद्ध मुसलमानरूपी हत्यार उपसणें त्यांना शक्य कां होतें ? आम्हीं आपल्या असहिष्णुतेमुळें त्यांना तसें बनविलें आहे हेंच त्याचें कारण नव्हे काय ? अशा रीतीनें भवितव्यता आम्हांला शिक्षा करीत आहे. आमच्या एकत्र सांचलेल्या पापाचें फळ आतां आम्हांला भोगावें लागत आहे. "

" तसें असेल तर तें भोगावें लागलें तरी हरकत नाहीं. परंतु आम्हांला सूड मिळालाच पाहिजे. कायद्यावर अत्युत्कट निष्ठा हें त्यांचें सर्वांत मोठें बळ आम्हीं हरविलें आहे. एके वेळीं ते खरोखरच राजे होते आणि कायद्याची बजावणी करीत होते; आतां ते कायदा मोडणारे होतील. त्यांची योग्यता कांहीं दरवडेखोरांखेरीज जास्त राहणार नाहीं.

परंतु आम्ही मात्र आपल्या हृदयांत हें सदैव बाळगूं—."

पत्रोपत्रीं माझ्याविषयीं ज्या वाईट बातम्या प्रसिद्ध होत आहेत त्यांमुळें मी मोठा कुप्रसिद्ध होत चाललों आहें. चक्रवर्तीच्या नदीवरील श्मशानांत माझा पुतळा मंत्रतंत्रासह मोठ्या उत्साहानें जाळला गेला असें कळतें. आणि आणखीही असल्या अपमानास्पद गोष्टी करण्याचें वाटत आहे अशा बातम्या येत आहेत. परवां भानगड अशी झाली कीं, त्यांना कलकत्त्यास एक कापसाच्या कापडाची गिरणी काढावयाची होती, तिचे शेअर घ्यावयाला सांगण्यासाठीं लोक मजकडे आले होते. मीं त्यांना सांगितलें कीं, माझा पैसा बुडण्याबद्दल मला कांहीं वाटत नाहीं. परंतु दुसऱ्या पुष्कळ गरीब भागीदारांच्या नुकसानीला कारणीभूत होण्यांत माझा हात असावा असें मला वाटत नाहीं.

मजकडे भेटीस आलेले लोक म्हणाले, "महाराज, देशाचा उत्कर्ष व्हावासें तुम्हाला वाटत नाहीं असाच आम्हीं याचा अर्थ समजावयाचा काय?"

"उद्योगधंद्यानें देशाचा उत्कर्ष होईल खरा; परंतु उत्कर्ष व्हावा या नुसत्या इच्छेनें कांहीं तो होणार नाहीं. आमचें डोकें जेव्हां शांत होतें तेव्हां सुद्धां आमच्या उद्योगधंद्यांना यश आलें नाहीं. तेव्हां आमचीं डोकीं नुसतीं भडकलेलीं असतांना त्यांत आम्हांला यश येईल असें कसें समजावें?"

"असें स्पष्टच कां म्हणत नाहीं कीं, आपण आपला

पैसा धोक्यांत घालण्यास तयार नाहीं ? ”

“ खरोखर उद्योगधंद्याच्या इच्छेनें तुम्ही प्रेरित झालां असें मला ज्या दिवशीं दिसेल त्या दिवशीं मी आपला सर्व पैसा सुद्धां घालीन. परंतु तुम्हीं अग्नि पेटविला असला म्हणून त्याच्यावर शिजविण्यास तुमच्याजवळ कांहीं आहे असा कांहीं त्याचा अर्थ नाहीं. ”

२

याचा अर्थ काय ? आमची चाकुत्रा येथील दुय्यम तिजोरी लुटली गेली. तेथून मुख्य कचेरींत ७५०० रुपये येणें होतें. तेथल्या खजीनदारानें सोईसाठीं नोटांच्या रूपांत शिल्लक करून पुरचुंड्या बांधून ठेवली होती. मध्यरात्रीच्या सुमाराला सशस्त्र लोकांची एक टोळी आली आणि पाहऱ्यावरील कासीमला त्यांनीं घायाळ केलें. चोरींतली चमत्कारिक गोष्ट ही कीं, त्यांनीं फक्त ६००० रुपयेच नेले आणि बाकीचे पसरलेले ठेवले. त्यांना ते सुद्धां नेण्यास कसलीच अडचण पडली नसती. कसेंही असो. दरवडेखोरांचा हल्ला संपला होता. आतां पोलीसचा सुरू होणार होता. शांततेचें आतां नांवही घ्यावयाला नको होतें.

मी आंत गेलों तों ती बातमी माझ्या अगोदरच तेथें गेलेली आढळली. “ काय भयंकर गोष्ट भावोजी ! ” मोठी राणी उद्गारली. “ आतां करावयाचें तरी काय ? ”

मीं तिला धीर देण्यासाठीं त्या गोष्टीची चेष्टाच केली. स्मित करून म्हणालों, " आपल्याजवळ थोडें फार कांहीं शिल्लक आहे त्याच्यावर भागवूं झालें आपण कसें तरी. "

" अशी थट्टा करून विषय बदलूं नका गडे भावोजी. तुमच्यावर त्यांचा एवढा राग कां ? त्यांना तुम्हाला शांत करतां नाहीं येणार ? सगळ्यांचाच राग कां करून घ्या ? "

" सगळ्यांना तसें वाटतें म्हणून मी आपल्या देशाचा नाश करण्यास कांहीं मदत करणार नाहीं. "

" श्मशानांत त्यांनीं तें कसलें भयंकर कृत्य केलें! तुम्हाला असें वागविणें म्हणजे खरोखर शरमेची गोष्ट होय. त्या इंग्रजी बाईच्या शिक्षणानें धाकट्या राणीसाहेबांची भीति सर्व नष्ट झाली आहे. परंतु हें दुश्चिह्न टाळण्याकरितां भटजींना बोलावल्यावांचून कांहीं माझ्या मनाला बरें वाटणार नाहीं. माझी शपथ आहे गडे तुम्हाला, तुम्ही आपले कलकत्त्याला जा. तुम्ही येथें राहिलांत तर ते काय करतील याचा नेम न वाटून माझ्या शरीराला कंप सुटतो. " मोठ्या राणीच्या निष्कपट काळजीनें माझ्या अंतःकरणाचा ठाव घेतला.

" आणि भावोजी, " ती पुढें म्हणाली, " मी तुम्हाला सांगत होतें कीं, खोलींत कांहीं इतके पैसे ठेऊं नका म्हणून. त्यांना त्याची वार्ता केव्हां लागेल आणि केव्हां नाहीं. पैशाचें कांहीं एवढें नाहीं—पण कोणीं सांगावें ?—"

तिला शांत करण्याकरितां, अगदीं तावडतोब शांत

करण्याकरितां, मीं पैसे कलकत्त्यास नेण्याचें तिला वचन दिलें. आम्ही एकदमच कपडयांच्या खोलीकडे गेलों. दार लावलेलें होतें म्हणून मीं टिचकी वाजविली.

आंतून विमलचा आवाज आला. ती म्हणाली, " मी कपडे करीत आहें. "

" धाकट्या राणीसाहेबांचा मला मोठा चमत्कार वाटतो. " मोठी राणी म्हणाली. " इतक्या पहांटेस कपडे ! त्यांच्या ' वंदे मातरम् ' भेटींपैकीं भेट मला वाटतें ! "

" दरवडेखोरांच्या राणीसाहेब, " ती थट्टेनें म्हणाली, " आंत तुम्ही लूट मोजीत बसलां आहां काय ? "

" मी इकडे थोडया वेळानें येईन. " असें म्हणून मी बाहेर कचेरींत निघून आलों.

पोलीस इन्स्पेक्टर माझी वाट पाहत होते. " दरवडेखोरांचा कांहीं माग ? " मीं विचारलें.

" मला संशय आहे. "

" कोणाचा ? "

" पहारेवाल्या कासीमचा. "

" कासीम ? पण त्याला जखम झाली होती ना ? "

" अगदींच कांहीं नाहीं. पोटरीवरील मांसांत जखम. बहुधा स्वतःच करून घेतलेली. "

" माझा कांहीं यावर विश्वास बसत नाहीं. तो किती तरी विश्वासू नोकर आहे ! "

" तुम्हीं त्याच्यावर विश्वास टाकला असला म्हणून

त्यामुळें त्याला चोर होण्यास कांहीं प्रतिबंध होत नाहीं. वीस वर्षें विश्वासू म्हणून नांवाजलेले लोक सुद्धां एकाएकीं चोर बनलेले माझ्या पाहण्यांत आहेत—."

"असें जरी असलें तरी त्याला माझ्याच्यानें तुरुंगांत पाठववणार नाहीं. पण त्यानें मग बाकीचे पैसे जमीनीवरच कां राहूं दिले असावे ? "

"आम्हांला वास लागूं नये म्हणून. महाराज, तुम्हीं कांहींही म्हटलेंत तरी तो या बाबतींत बिलंदर असला पाहिजे. तो आपल्या पाहऱ्यावर अगदीं बिनचूक हजर असतो खरा, परंतु आसपासच्या दरवड्यांत त्याचा हात असला पाहिजे." असें म्हणून आपल्यापासून वीस किंवा तीस मैल दूरच्या दरवड्यांत सुद्धां मनुष्याला कसा भाग घेतां येतो याचें वर्णन करण्यास त्यांनीं सुरुवात केली.

"कासीमला तुम्हीं इकडे आणलें आहे काय ?" मीं विचारलें.

"नाहीं." त्यांनीं उत्तर दिलें. "चौकशीसाठीं तो मामलेदाराच्या ताब्यांत आहे."

"मला त्याला भेटावयाचें आहे." मी म्हणालों.

मी तुरुंगांत गेल्याबरोबर माझ्या पायांवर लोटांगण घालून कासीम म्हणाला, "परमेश्वराची शपथ महाराज, मीं हें कृत्य केलें नाहीं."

"मला तुझा संशय मुळींच नाहीं कासीम." मीं त्याला आश्वासन दिलें. "तूं भिऊं नको. तूं निरपराधी

असल्यावर तुला कोणी कांहीं करूं शकणार नाहीं. "

कासीमला कांहीं त्या प्रकाराची सुसंगत हकीकत सांगतां आली नाहीं. तो उघड उघड अतिशयोक्ति करीत होता. चारपांचशें लोक, मोठ्या तोफा आणि असंख्य तरवारी त्याच्या हकीकतींत भरल्या होत्या! त्याच्या मनाला भ्रम झाल्यामुळें त्यानें तसें सांगितलें असेल अथवा आपला इतक्या सहज रीतीनें पराभव कां झाला हें दाखविण्यासाठीं सांगितलें असेल. त्याचा हट्ट असा कीं, हें सगळें हरीश कुंडूचें कृत्य; कुंडूचें मुख्य कूळ एकराम याचा आवाज आपण खात्रीनें ऐकला असें तो म्हणे.

मीं त्याला सूचना दिली, " हें पहा कासीम, दुसऱ्यांचीं नांवें तुझ्या हकीकतींत उगाच येऊं देऊं नको. तुला कांहीं हरीश कुंडूवर किंवा दुसऱ्या कोणावर खटला करावयास बोलावलेलें नाहीं. "

२

घरीं गेल्यावर मीं गुरुजींना बोलावून आणलें. गंभीरपणानें मान हालवून ते म्हणाले, " सदसद्विवेकबुद्धीला बाजूस सारून देशाची तेथें प्रस्थापना करण्यांतून कांहीं चांगलें निष्पन्न होईलसें मला दिसत नाहीं. देशाचीं सर्व पापें आतां बेशरम आणि घाणेरड्या स्वरूपांत बाहेर पडतील. "

" तुम्हाला कोणीं वाटतें—"

" मला विचारूं नको. परंतु पाप मात्र माजणार खास. त्या सर्वांना अगदीं येथून पार घालवून दे."

" मीं त्यांना आणखी एक दिवसाची मुदत दिली आहे. ते परवां जातील येथून."

" आणखी एक गोष्ट. विमलेला कलकत्त्यास घेऊन जा. येथून तिला बाह्य जगाचें दर्शन फार कमी होत आहे. मनुष्यें आणि इतर वस्तु येथून तिला योग्य प्रमाणांत दिसत नाहींत. तिला जग पाहूं दे—मनुष्यें आणि त्यांचें कार्य पाहूं दे—तिला विस्तृत दृष्टि दे."

" माझ्या मनांत अगदीं हाच विचार आला होता."

" तर मग आतां त्याला अगदीं विलंब करूं नको. मी तुला सांगतों निखिल, मनुष्याचा इतिहास जगांतील सर्व मानवजातींच्या संयुक्त प्रयत्नानें बनत असतो. म्हणून अशा रीतीनें राजकारणात्मक हेतूसाठीं सदसद्विवेकबुद्धि विकणें व आपल्या स्वतःच्या देशाला कृत्रिम पूजाविषय करणें याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. यूरोपला अंतःकरणांत हें तत्त्व पसंत नाहीं ही गोष्ट खरी. परंतु या बाबतींत आमचा शिक्षक म्हणून मिरविण्याचा त्यास हक्क नाहीं. जे सत्याकरितां मरतात ते अमर होतात; आणि सत्यासाठीं जर सर्व लोकच्या लोक मेले तर मानवी इतिहासांत ते अमर होऊन राहतील. पिशाच आपल्या हास्यानें आकाशभर लाटा उत्पन्न करीत असतांना ही सत्याची भावना या आपल्या भरतभूमींत वास्तविकता पावेल. परदेशाहून

पापाची किती भयंकर सांथ आमच्या देशांत आणली गेली आहे—."

सर्व दिवस चोरीच्या चौकशीच्या धांदलींत निघून गेला. रात्रीं विश्रांतीसाठीं गेलों तेव्हां मी अगदीं दमून गेलों होतों. तिजोरींतून भावजईचे पैसे कलकत्त्याला नेण्याचें मीं दुसऱ्या दिवसावर ढकललें.

मी मध्यरात्रीं झोपेंतून जागा झालों. खोलींत काळोख मिट्ट होता. कोठून तरी हुंदके ऐकूं येतातसें मला वाटलें. कोणी तरी खास रडत होतें. हुंदक्यांचा आवाज पावसाळ्या रात्रीच्या वाऱ्याच्या सोसाट्याप्रमाणें जवळ येत होता. माझ्या खोलींतूनच रडें बाहेर पडत आहे असें वाटलें. मी एकटाच होतों. कांहीं दिवस विमल माझ्या शेजारच्या दुसऱ्या खोलींत निजत असे. मी उठून बाहेर गेलों तों सज्जांत ती तोंड जमीनीवर टेकून उपडी पडलेली आढळली.

ही गोष्ट अशी होती कीं तिचें वर्णन शब्दांत करतां येणार नाहीं. जगाच्या हृदयांत स्थित होऊन दुःखाचे सर्व चरके जो आपल्या हृदयावर घेतो त्यालाच तें कळे. आकाश स्तब्ध, चांदण्या आणि तारे मूक, रात्र प्रशांत आणि त्या सगळ्यांत एकच तें रडें!

पुस्तकांतील वर्गीकरणाप्रमाणें आम्ही या भावनांना चांगलेंवाईट म्हणतों. परंतु या भिन्न हृदयांतून हा जो दुःखाचा पूर निघून अगाध अंधकारांत पसरतो आहे त्याला काय नांव द्यावयाचें? मध्यरात्रीं तारकांच्या शांत

प्रकाशांत मीं ती आकृति पाहिली तेव्हां माझें हृदय भीतीनें भरून गेलें आणि मी आपल्याशीं म्हणालों, “ मी कोण तिजविषयीं इनसाफ करणार ! अनंत अस्तित्वाच्या जीवा, मृत्यो, परमेश्वरा, मी स्तब्धपणें तुझ्यांतील गूढापुढें मस्तक नमवितों. ”

एकदां मला वाटलें कीं, परत जावें. परंतु जाववेना. मी विमलशेजारीं जमीनीवर बसलों व तिच्या मस्तकावर हात ठेवला. स्पर्श केल्याबरोबर प्रथम तिचें सर्व शरीर ताठ झालेंसें वाटलें, परंतु दुसऱ्याच क्षणीं सगळा ताठपणा निवून गेला आणि अश्रूंचा पूर लोटला. मीं तिच्या कपाळावरून हळूच बोटें फिरविलीं. एकाएकीं हातांनीं चांचपून तिनें माझे पाय धरले आणि ते आपल्याजवळ घेऊन आपल्या उराशीं इतक्या जोरानें दाबले कीं तिचा ऊर आतां फुटणार असें मला वाटलें.

## प्रकरण सोळावें

### विमलेची आत्मकथा

१

अमूल्य आज सकाळीं कलकत्त्याहून परत यावयाचा होता. तो आल्याबरोबर मला कळवा असें मीं नोकरांना सांगून ठेवलें होतें. परंतु मला कांहीं स्वस्थ राहवेना. शेवटीं मीच बाहेर जाऊन खोलींत त्याची वाट पाहत बसलें.

मीं जेव्हां त्याला जवाहीर विकावयाला पाठवला तेव्हां मी फक्त आपल्याविषयींच विचार करीत असलें पाहिजे. एवढासा लहान मुलगा एवढें मौल्यवान जवाहीर विकूं लागला म्हणजे लोक त्याचा एकदम संशय घेतील हा विचार त्या वेळीं माझ्या मनाला शिवला देखील नाहीं. आम्ही स्त्रिया किती दुर्बळ ! आमच्या संकटाचें ओझें आम्हांला दुसऱ्यावर टाकणें भाग पडतें. आम्ही मरूं लागलों म्हणजे आमच्या आसपासच्या लोकांना सुद्धां आम्ही

ओढून नेतों.

मीं मोठया अभिमानानें म्हटलें कीं, मी अमूल्याचें संरक्षण करीन. जणूं काय बुडतां बुडतां मी दुसऱ्याला वांचविणार! परंतु त्याचें संरक्षण करण्याऐवजीं मीं त्याला मृत्यूकडेच पाठवलें. माझ्या धाकटया भावा, आपल्याच दुष्कृत्यांचें ओझें घेऊन भ्रमिष्टासारख्या हिंडणाऱ्या या तुझ्या बहिणीनें तुला भाऊबिजेच्या दिवशीं आशीर्वाद दिला त्या वेळीं मृत्यू खरोखर हंसला असेल.

आज मला असें वाटतें कीं, पुरुषांना वाइटाची प्लेगसारखी कधीं कधीं बाधा होते. कोठून तरी थोडेसे जंतु येतात आणि एका रात्रींतच मृत्यू प्राप्त होतो. असल्या प्लेगनें लागलेल्या मनुष्याला जगापासून दूर कां बरें ठेवीत नाहींत? सर्व जगाला पेटवूं पाहणाऱ्या मशालीप्रमाणें संसर्ग कसा भयंकर असतो हें निदान मला तरी चांगलेंच समजून आलें आहे.

नवांचे ठोके पडले. अमूल्यावर संकट आलें आहे, तो पोलीसच्या तावडींत सांपडला आहे, असें मला आपलें एकसारखें वाटूं लागलें. पोलीसकचेरींत केवढी गडबड उडाली असेल, कीं जवाहीर कोणाचें? त्याच्या हातीं तें कोठें लागलें? आणि मग शेवटीं मला सार्वजनिक रीतीनें सर्व जगाला उत्तर द्यावें लागणार.

आणि तें उत्तर तरी काय? मोठया राणीसाहेब, तुमचा मी आजवर दुःस्वास करीत होतें. पण आज तुमची सही

आली बरें. समाजाच्या रूपानें—जगाच्या रूपानें—तुम्ही सूड उगविणार. परमेश्वरा, मला एवढी एकदां वांचीव म्हणजे मग मी आपला सगळा ताठा माझ्या जावेच्या पायांवर अर्पण करीन.

मला हे विचार अगदीं सहन होत ना. मी थेट मोठ्या राणीकडे गेलें. ती पडवींत आपली सुपारी घेऊन बसली होती. तिच्या शेजारीं ठकूही होती. ठकूला पाहून मीं एक क्षणभर माघार घेतली, परंतु सगळा संकोच बाजूला सारून फेकून देऊन मीं राणीला लवून नमस्कार केला आणि तिच्या पायाची धूळ कपाळास लावली.

"ओहो, धाकट्या राणीसाहेब!" ती चकित होऊन म्हणाली, "आज तुमच्या आंगांत आलें आहे तरी काय? हा नमस्कार काय म्हणून आज? एवढा आदर?"

"आज माझा जन्मदिवस आहे, बाई." मीं म्हटलें. "मीं तुम्हांला पुष्कळदां दुःख दिलें आहे. आज मला तुमचा आशीर्वाद द्या म्हणजे माझ्या हातून पुन्हां तसें घडणार नाहीं. माझें मन किती क्षुद्र आहे!" मीं पुन्हां नमस्कार केला आणि चटकन तेथून निघून गेलें तों तिनें मला हांक मारली.

"धाकट्या राणीसाहेब, आज तुमचा वाढदिवस असतो हें तुम्हीं मला आजपर्यंत कधींच सांगितलें नाहीं गडे! आज अगदीं जरूर माझ्या खोलींत या म्हणजे आपण दोघी बरोबर फराळ करूं. अगदीं आलेंच पाहिजे बरें का?"

परमेश्वरा, आज माझा खरोखरच जन्मदिन होऊं दे. पुन्हां एकदां जन्म घेणें मला शक्य नाहीं काय? परमेश्वरा, मला शुद्ध कर आणि मला आणखी एक वेळ संधि दे! अशी मीं परमेश्वराची प्रार्थना केली.

मी पुन्हां बाहेरच्या बसण्याच्या खोलींत गेलें तों संदीपबाबू तेथें बसले होते. माझ्या सर्व रक्तांत तिरस्काराची भावना विषासारखी पसरली. सकाळच्या प्रकाशांत मला त्यांच्या चेहऱ्यावर प्रतिभेची आकर्षक आरक्तता मुळींच दिसली नाहीं.

" खोलींतून तुम्ही जाल काय? " कपाळाला आंठया घालून मीं म्हटलें.

संदीपबाबूंनीं स्मित केलें. ते म्हणाले, " आतां अमूल्य येथें नाहीं. तेव्हां मला वाटलें, खास संभाषणाची आज माझी पाळी आली. "

माझें दैव पुन्हां माझ्यावर उलटत होतें. आपणच दिलेला हक्क आतां कसा काढून घ्यावा असें मला वाटलें. तरी पण मीं पुन्हां म्हटलें, " मला एकांत हवा आहे. "

ते म्हणाले; " राणी, दुसऱ्या मनुष्याच्या सांनिध्यामुळें कांहीं तुमच्या एकांताला अडथळा येत नाहीं. मी एक तेल्यातांबोळ्यांतील आहें असें आपण समजूं नका. माझ्या भोंवतीं हजारों लोक असले तरी हा संदीप एकटाच असतो. "

" पुन्हां केव्हां तरी या. आज सकाळीं मी—"

" अमूल्याची वाट पाहत आहें. "

मी अगदीं संतापून जाण्याच्या बेतांत होतें तोंच

संदीपबाबूंनीं जेव्हां आपल्या कोटाच्या आंतून माझी जवाहिराची पेटी काढली आणि संगमरवरी टेबलावर उंच धरली तेव्हां मी चकित होऊन उद्गारलें, " तर मग अमूल्य गेला नाहीं काय ? "

" कोठें ? "

" कलकत्त्याला. "

" नाहीं. " संदीपबाबू पुटपुटले.

अहा ! तर मग माझा आशीर्वाद खरा झाला. त्याचें संरक्षण झालें ! परमेश्वराची शिक्षा मला खुशाल होवो. मी चोरच आहें. परंतु अमूल्य मात्र सुरक्षित असो.

माझ्या चेहऱ्यावरील फरकानें संदीपबाबूंचा तिरस्कार जागृत झाला. ते गुरगुरून म्हणाले, " इतक्या खुशींत अगदीं राणीसाहेब ? हें जवाहीर अगदीं इतकें मौल्यवान आहे ? मग तुमच्याच्यानें तें देवीच्या पूजेसाठीं अर्पण कसें करवलें ? तुमची देणगी तर अगदीं देऊन झाली होती. आतां ती तुम्ही परत घेणार काय ? "

ताठा हा मरायला फार कठीण. शेवटपर्यंत तो फुसकारे टाकीतच असतो. त्या जवाहिराची मी काडीइतकीही काळजी करीत नाहीं असें संदीपबाबूंना भासविलें पाहिजे हें मला स्पष्ट दिसत होतें. मी म्हणालें, " त्यानें तुमची हांव जागृत झाली असेल—त्याच्यासाठीं तुम्ही हपापले असाल—तर तें तुम्ही खुशाल घ्या. "

" माझी हांव आज बंगाल्यांतील सगळ्या द्रव्याभोंवत

पसरलेली आहे. लोभापेक्षां मोठी शक्ति जगांत आहे काय ? इंद्राच्या ऐरावताप्रमाणें लोभ हा मोठ्या लोकांचा युद्धाश्व आहे. आतां हीं रत्नें माझीं झालीं ना ? " त्यांनीं विचारलें.

संदीपबाबूंनीं जवाहिराची पेटी पुन्हां आंगरख्याच्या आंत ठेवली तों अमूल्य आंत घुसला. त्याच्या डोळ्यांखालीं काळ्या वळ्या पडल्या होत्या; त्याचे ओठ वाळून गेले होते व केस अस्ताव्यस्त झाले होते. त्याच्या तारुण्यांतील तेजस्वीपणा फक्त एका दिवसांत कोमेजून गेलासा झाला होता. त्याच्याकडे पाहिल्याबरोबर माझ्या हृदयाला चरके बसले.

" माझी पेटी. " असें ओरडून मजकडे मुळींच न पाहतां तो थेट संदीपबाबूंकडे धांवला. " तुम्हीं माझी जवाहिराची पेटी खोलींतून घेतलीत काय ? "

" तुझी जवाहिराची पेटी आं ? " संदीपबाबू टवाळीच्या आवाजांत म्हणाले.

" ती माझी पेटी होती ! "

संदीपबाबू खो खो हसूं लागले. " माझें आणि तुझें असा फरक करण्याची तुझी दृष्टि जास्तच तीक्ष्ण होऊं लागली काय ? तरी पण तूं धार्मिक उपदेशक म्हणूनच मरणार खास. "

अमूल्य एका खुर्चीवर पडला आणि त्यानें आपले हात आपल्या तोंडावर घेतले. मीं त्याच्याजवळ जाऊन आपला हात त्याच्या मस्तकावर ठेवला आणि म्हटलें, " अमूल्य,

कसल्या संकटांत आहेस तूं ? "

तो ताठ उभा राहून म्हणाला, " तुझी जवाहिराची पेटी स्वतःच्या हातानें परत करावी अशी माझी अगदीं मनापासून इच्छा होती राणी ताई ! परंतु संदीपबाबूंना हें माहीत होतें आणि म्हणून त्यांनीं माझ्यापुढें आघाडी मारली. "

" मला काय त्या जवाहिराचें करावयाचें आहे ? जाऊं दे तें. त्यांत कांहीं हरकत नाहीं. "

" जाऊं दे कोठें ? " तो चकित होऊन म्हणाला.

" हें जवाहीर माझें आहे. " संदीपबाबू म्हणाले. " राणीनें अर्पण केलेलें हें राजचिह्न आहे. "

" छे ! छे ! छे ! " अमूल्य संतप्त होऊन म्हणाला. " असें करूं नको राणी ताई ! मीं तें तुझ्याकरितां परत आणलें; तें तूं दुसऱ्या कोणाला देऊं नकोस. "

" तुझी देणगी मी स्वीकारतें भाऊ. " मी म्हणालें. " त्याच्यासाठीं तो हपापला आहे. त्याला आपला लोभ शांत करूं दे. "

अमूल्य संदीपबाबूंकडे हिंस्त्र पशूप्रमाणें तीक्ष्ण दृष्टिपात करून गुरगुरून म्हणाला, " हें पहा संदीपबाबू, मला फांशी जाण्याची सुद्धां भीति नाहीं हें निदान तुम्हांला माहीत असावयास पाहिजे. तुम्ही जर ती जवाहिराची पेटी न्याल–"

छद्मी हास्य करण्याचा प्रयत्न करून संदीपबाबू म्हणाले, " आणि तुला पण अमूल्या आजपर्यंत समजून यावयाला पाहिजे होतें कीं, तुला भिणारा मनुष्य मी नाहीं. "

नंतर मजकडे वळून ते म्हणाले, " मधुराणी, आज मी येथें जवाहीर नेण्याला आलों नाहीं तर देण्याला आलों आहें. माझी देणगी तुम्हीं अमूल्याच्या हातून घेतली असती तर तो तुमचा अपराध झाला असता. तसें होऊं नये म्हणून ती मला प्रथम पक्की माझी करून घ्यावी लागली. आतां हीं माझीं रत्नें मी तुम्हांला आपली देणगी म्हणून देतों. ही पहा ती पेटी. तुम्ही या पोराची आतां कशीही समजूत घाला; मला गेलेंच पाहिजे. आज पुष्कळ दिवस मला दूर ठेवून तुमचीं खास संभाषणें चालत असत. आतां जर कांहीं खास गोष्टी घडून आल्या तर मात्र मला दोष देऊं नका. "

" अमूल्य," ते पुढें त्याला म्हणाले, " मीं तुझ्या पेट्या आणि इतर सगळ्या वस्तु तुझ्या बिऱ्हाडीं पाठवून दिल्या आहेत. आतां यापुढें तुझी कोणतीही जिन्नस माझ्या खोलींत ठेवीत जाऊं नकोस. "

२

" तुला जवाहीर घेऊन पाठवल्यापासून मला एकसारखी रुखरुख लागून राहिली आहे. " मी अमूल्याला म्हणालें.

" कां बरें राणी ताई ? "

" त्यामुळें तूं संकटांत सांपडतोस कीं काय, तुला कोणी चोर म्हणून पकडतें कीं काय, अशी मला धास्ती वाटत होती. ते सहा हजार रुपये आतां मला न मिळाले तरी चालतील.

पण तूं आणखी एक काम कर. तूं आपल्या आईकडे जा."

अमूल्यानें एक लहानसें पुडकें पुढें करून म्हटलें, " ते सहा हजार रुपये आणले आहेत ताई."

"कोठून ?"

माझ्या प्रश्नाला उत्तर न देतां तो पुढें म्हणाला, "मीं गिन्या मिळविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, पण व्यर्थ. मग आपल्या नोटाच आणल्या."

" अमूल्य, मला खरें सांग. माझी शपथ घेऊन सांग. तूं कोठून आणलास हा पैसा ?"

" तें मी तुला सांगणार नाहीं."

माझ्या डोळ्यांपुढें सर्वत्र अंधारी आल्यासारखी झाली. " किती भयंकर कृत्य केलेंस अमूल्या तूं ?" मी म्हणालें. " तर मग—"

" मीं हा पैसा अयोग्य तऱ्हेनें मिळविला असेंच तूं म्हणणार ना ? मी कबूल करतों. परंतु माझ्या अन्यायाची मीं अगदीं भरपूर किंमत दिली आहे; तेव्हां तो आतां माझा झाला आहे."

मला त्या बाबतींत आणखी कांहीं जाणण्याची इच्छा राहिली नाहीं. माझ्या शिराच संकुचित होऊन माझें सर्व शरीर अगदीं आंतल्या आंत कोंडल्यासारखें झालें.

मीं अमूल्याला काकुळतीनें म्हटलें, " अमूल्य, हें घेऊन जा आणि जेथून आणलेंस तेथें परत नेऊन ठेव."

" फार कठीण काम आहे तें खरोखर !"

" कांहीं कठीण नाहीं भाऊ. संदीपबाबूंकडून तूं मजकडे आलास ती वेळच वाईट होती. खुद्द संदीपबाबू सुद्धां तुला इतक्या संकटांत घालूं शकले नसते."

संदीपबाबूंचें नांव ऐकल्याबरोबर त्याच्या हृदयाला तीव्र वेदना झाल्याशा दिसल्या.

" संदीपबाबू ! " तो ओरडला. " तुझ्याच मुळें मला त्यांचें खरें स्वरूप कळून आलें. तुझ्यापासून घेतलेल्या त्या गिन्यांतून त्यांनीं एक पैही खर्च केली नाहीं हें तुला माहीत आहे काय ? येथून गेल्यावर ते खोलींत जाऊन गिन्यांची रास पुढें ओतून त्यांच्याकडे हपापून पाहत बसले. ते उद्गारले; 'हें द्रव्य नव्हे; या शक्तिरूपी दैवी कमळाच्या पाकळ्या आहेत; नंदनवनांत वाजत असलेल्या सुस्वर वाद्यांचा ध्वनि घट्ट होऊन बनलेले त्याचे हे स्फटिक आहेत. या गिन्या मोडण्याला माझें मन घेत नाहीं; कारण सौंदर्यदेवीच्या मानेवर लटकण्याची त्यांची उत्सुकता स्पष्ट दिसत आहे. अमूल्या, गड्या तूं त्यांच्याकडे आपल्या चर्मचक्षूंनीं पाहूं नकोस. त्या लक्ष्मीचें हास्य आहेत; इंद्राणीचें तेज आहेत. छे! छे! मी या त्या रानटी व्यवस्थापकाच्या कांद्याला देणार नाहीं. माझी खात्री आहे अमूल्य, कीं तो आपणांजवळ खोटें बोलत असला पाहिजे. बोट बुडविणाऱ्या मनुष्याचा सुगावा कांहीं पोलीसला लागलेला नाहीं. या कारभाऱ्याला त्यांत कांहीं साधलें तर पाहावयाचें आहे. कांहीं तरी करून तीं पत्रें आपल्याला त्याच्यापासून परत मिळविलीं पाहिजेत.'"

" हें कसें करावयाचें म्हणून मीं त्यांना विचारलें. धमकी घाला अथवा सक्ती करा असें ते म्हणाले. तुम्ही जर हें सोनें परत द्याल तर मी पत्रें परत मिळविण्याचें काम पतकरतों असें मीं त्यांस सांगितलें. त्याचा आपण मग विचार करूं असें ते म्हणाले. मीं त्याला कसा भिवविला, पत्रें कशीं मिळविलीं आणि जाळून टाकलीं, तें सगळें सांगून कांहीं ताई मी तुला त्रास देत नाहीं. ती फार मोठी हकीकत आहे. त्याच रात्रीं मी संदीपबाबूंकडे येऊन म्हणालों, 'आतां आपण सुरक्षित आहोंत. आतां गिन्या मला द्या म्हणजे त्या मी सकाळीं माझ्या ताईला—महाराणीला—नेऊन देईन.' परंतु ते ओरडून म्हणाले, 'काय खूळ तुझें हें ! तुझ्या बहिणीच्या पदरानें तूं सगळा देश डोळ्यांआड करणार काय ? 'वंदे मातरम्' म्हण आणि सैतानाची आराधना कर.' "

" संदीपबाबूंच्या जादूची शक्ति ताई तुला माहीतच आहे. तें सोनें त्यांच्याच जवळ राहिलें आणि मीं सगळी रात्र सरोवराच्या घाटावर 'वंदे मातरम्' चा जप करून घालविली."

" मग मला विकण्यासाठीं तूं तें जवाहीर दिलेंस तेव्हां मी पुन्हां संदीपबाबूंकडे गेलों. ते माझ्यावर रागावले आहेत हें मीं ओळखलें. 'अजून त्या मीं आपल्या पेटींत पुजून ठेवल्या आहेत असा तुला संशय असेल तर त्या तूं घे जा' असें म्हणून त्यांनीं माझ्याकडे किल्ल्या झुगारल्या. मला त्या गिन्या कोठें सांपडेनात. 'त्या कोठें आहेत मला सांगा.' मीं म्हटलें. 'तुझें खूळ सुटलें म्हणजे मग; आतां नाहीं.'

ते म्हणाले."

"जेव्हां ते वळेनात तेव्हां मला निराळ्याच मार्गाचा अवलंब करावा लागला. मीं माझ्या नोटांच्या ऐवजीं त्यांच्याजवळ गिन्या मागितल्या. 'देतोंच तुला' असें म्हणून ते आंत गेले. मी बाहेरच होतों. आंत त्यांनीं माझी ट्रंक फोडली आणि पाठीमागच्या दुसऱ्याच रस्त्यानें ती जवाहिराची पेटी घेऊन ते इकडे तुझ्याकडे आले. मला त्यांनीं तें आणूं दिलें नाहीं. आतां ते त्याला आपली देणगी असें म्हणतात. त्यांनीं मला किती लुबाडलें हें कोणाला सांगतां येणार? मी त्यांना कधींही क्षमा करणार नाहीं."

"पण ताई, माझ्यावरचें त्यांचें वजन मात्र पार नाहींसें झालें. आणि तें तूं घालविलें आहेस."

"तसें जर असेल तर माझ्या जीविताचें सार्थक झालें भाऊ." मीं म्हटलें. "परंतु अजून पुष्कळ काम आहे अमूल्य. मंत्राचा नाश झाला एवढ्यानेंच कांहीं झालें नाहीं. त्याचे डाग पार धुवून काढले पाहिजेत. आतां अगदीं विलंब करूं नकोस. प्रथम जा आणि हे पैसे जेथून आणलेस तेथें परत नेऊन ठेव. होईल कीं नाहीं तुझ्याच्यानें हें?"

"तुझा आशीर्वाद असल्यावर सगळें कांहीं शक्य आहे महाराणी."

"ध्यानांत ठेव, तसें केल्यानें केवळ तुझेंच पापक्षालन होईल असें नाहीं; माझेंही होईल. मी स्त्री आहे. बाह्य जग

मला वर्ज्य आहे. नाहीं तर मीच स्वतः गेलें असतें. मला परमेश्वराची सर्वांत कठिनतम शिक्षा म्हणजे माझ्या दुष्कृत्याचें ओझें मला तुझ्यावर घालावें लागत आहे हीच होय."

"असें नको म्हणूं ताई. मी ज्या मार्गावरून चाललों होतों तो मार्ग तुझा नव्हे. त्यांतील संकटें आणि अडचणी यांनीं माझें अंतःकरण त्याच्याकडे वेधलें. आतां मला तुझ्या मार्गावरून जावेंसें वाटत आहे. मग तो हजारपटीनें अडचणीचा व संकटमय असला तरी बेहेत्तर. तुझ्या पायाची धूळ मला यशस्वी करील. तर मग पैसे परत जागच्याजागीं ठवावे अशी तुझी आज्ञा आहे काय?"

"माझी नव्हे भाऊ, परमेश्वराचीच तशी आज्ञा आहे."

"ऊंः, मला तें कांहीं कळत नाही. परमेश्वराची ती आज्ञा मला तुझ्याकडून समजत आहे एवढें मला पुरे आहे. मला वाटतें, तूं मला येथें जेवावयाला बोलावलें होतेंस. मला ती संधि गमवितां कामा नये. मी जाण्यापूर्वीं तूं आपला प्रसाद मला अवश्य दिला पाहिजेस. मग साधलेंच तर मी संध्याकाळीं माझें काम उरकीन."

मीं स्मित करण्याचा प्रयत्न केला तों माझ्या डोळ्यांत अश्रू उत्पन्न झाले. मी म्हणालें, "बरें, कांहीं हरकत नाहीं."

२

अमूल्य गेल्याबरोबर माझें हृदय दडपून गेलें. आईच्या

त्या एकुलत्या एक मुलाला मीं केवढया भयंकर कामगिरीवर पाठवला होता! परमेश्वरा, माझ्या पापक्षालनाला एवढा भपका आणि महत्त्व कशासाठीं ? माझ्या शिक्षेंत या सगळ्यांचा संबंध येत आहे त्यापेक्षां ती मला एकटीलाच भोगावयाला लागती तर नसतें का चाललें ? तुझ्या क्रोधाला निदान या लहान निष्कपट मुलाचा तरी कृपा करून बळी घेऊं नको.

मीं त्याला परत बोलावलें. ' अमूल्य. '—माझा आवाज इतका कमजोर निघाला कीं त्याला तो ऐकूं गेला नाहीं. मीं दाराशीं जाऊन पुन्हां ' अमूल्य, ' अशी हांक मारली. परंतु तो गेलाच होता.

" कोण आहेरे तिकडे ? "

" काय राणी आई ? "

" जा, आणि अमूल्यबाबूंना सांग मी बोलावत आहें म्हणून. "

काय झालें मला कांहीं नक्की सांगतां येत नाहीं; त्या मनुष्याला कदाचित अमूल्याचें नांव माहीत नसावें. परंतु तो बाहेर जातो न जातो तोंच परत आला व त्याच्या मागोमाग संदीपबाबू आले. आंत आल्याबरोबर ते मला म्हणाले,

" तुम्हीं मला जावयास सांगितलें त्याच वेळेस तुम्ही मला परत बोलावणार अशी माझी भावना झाली. एकाच चंद्राच्या आकर्षणानें भरती अथवा ओहोटी येते. मला

तुम्ही बोलावणार याबद्दल इतकी खात्री होती कीं, मी बाहेर वाटेंतच उभा होतों. तुमचा मनुष्य दिसतांक्षणींच तो कांहीं बोलण्याच्या आधींच मी म्हणालों, " समजलों, हा मी येतच आहें. " त्या बिचाऱ्याला खरोखर आश्चर्य वाटलें. मी काय जादूगार आहें कीं काय असें वाटून आ वासून तो मजकडे पाहतच राहिला ! "

" मधुराणी, " ते पुढें म्हणाले, " जगांतील सर्व भांडणें खरोखर जादूच्या बळांमधील असतात. मंत्रावर मंत्र—अगदीं आवाजरहित शस्त्रें—त्यांना अदृश्य गोष्टीवर सुद्धां प्रहार करतां येतो. शेवटीं एकदां तुम्ही मला माझ्या जोडीदार मिळालांत. कावेबाज राणी ! तुमचा भाता भरलेला आहे हें मी जाणतों. जगांत तुम्ही एकट्याच आपल्या गोड इच्छेप्रमाणें संदीपला घालवूं शकतां अथवा परत हांक मारूं शकतां. आतां तुमचा बळी तुमच्यापुढें लोटांगण घालीत आहे; त्याचें तुम्ही वाटेल तें करा. त्याला तुम्ही आपल्या कृपाछत्राखालीं घेणार कीं पिंजऱ्यांतच अडकवून ठेवणार ? मी आपला तुम्हांला आधींच सांगून ठेवतों राणीसाहेब कीं, हा पशु तुम्हांला मारावयाला तसाच बंधनांत ठेवावयालाही जड जाईल. तरी पण तुमचीं जादूचीं शस्त्रें उपयोगांत आणण्यास आतां विलंब कां ? "

उत्तराची वाट न पाहतां, आपल्या संनिध आलेल्या पराभवाची छाया दिसल्यामुळेंच बडबड करून वेळ घालविण्याचा संदीपबाबूंचा बेत असावा. मीं अमूल्याला बोलावणें पाठवलें होतें हें त्यांना खात्रीनें माहीत असलें पाहिजे.

गड्यानें त्याचें नांव घेतलेंच असेल अशी माझी खात्री होती. तसें त्यांना सांगण्याला मला संधीच मिळूं नये असा त्यांचा प्रयत्न चालला होता. परंतु त्यांचा डाव फुकट होता. कारण त्यामुळें मला त्यांची दुर्बळता दिसून येत होती. आतां अगदीं रेसभरही मागें सरतां कामा नये.

“ संदीपबाबू, ” मीं म्हटलें, “ हीं मध्यें थांबल्याशिवाय लांबच लांब भाषणें तुम्ही कशीं करीत राहतां कोण जाणे ! तुम्ही तीं आगाऊ पाठ करून ठेवतां काय ? ”

संदीपबाबूंचें तोंड तत्क्षणीं लाजेनें ताम्रवर्ण झालें. मीं पुढें म्हटलें, “ मीं असें ऐकलें आहे कीं, आपले धंदेवाईक वादविवादवाले निरनिराळ्या विषयांवरील प्रबंधांची एक वही जवळ बाळगतात. हे प्रबंध असे असतात कीं, ते कोणत्याही वेळीं कशाही प्रसंगीं उपयोगीं पडावे. तुमच्याजवळ अशी एखादी वही आहे काय ? ”

संदीपबाबूंनीं दांत ओठ खाऊन उत्तर दिलें, “ तुम्हां स्त्रियांना आरंभ करण्यासाठीं परमेश्वरानें हावभावांचा भरपूर सांठा देऊन ठेवला आहे. तुमच्या बाबतींत आणखी शिंपी व जवाहिऱ्ये यांचीही मदत आहे. परंतु तुम्हांला अगदींच कांहीं असें वाटूं देऊं नका कीं, आम्ही पुरुष अगदींच विषम——”

“ संदीपबाबू, तुम्ही एकदां परत जाऊन आपल्या वहींत पाहून याल तर बरें. तुम्ही अगदीं चुकीचे शब्द बोलूं लागलां आहां. पाठ करून म्हणावयाचें असलें म्हणजे

त्याचा असाच त्रास होतो. ”

स्वतःच्या मनावरचा ताबा उडून जाऊन संदीपबाबू ओरडून म्हणाले, “ तुम्ही, तुम्ही माझा अपमान करतां ? तुमची अशी काय गोष्ट आहे कीं जी मला अगदीं मुळापासून माहीत नाहीं ?—काय—” त्यांच्या तोंडून शब्द निघेना.

आपल्या मंत्राचें कार्य घडून आलें नाहीं म्हणजे जादूगार संदीपबाबू अगदींच दुर्बळ होऊन जातात. आज ते राजाच्या जागेवरून अगदीं रानटी मनुष्याच्या स्थितीला आले. त्यांची दुर्बळता पाहण्याचा केवढा आनंद ! त्यांचें औद्धत्य जसजसें वाढूं लागलें तसतसा माझा आनंद वाढतच चालला. ज्या आपल्या सर्परूपी वेष्टनांनीं त्यांनीं मला विळखे घातले होते तीं सगळीं वेष्टनें तुटून गेलीं. ‘ मी स्वतंत्र झालें. माझें संरक्षण झालें. आतां तुम्ही कितीही उद्धटपणा करा, माझा अपमान करा; त्यामुळें तुमचें खरें स्वरूप व्यक्त होतें. माझ्या अवास्तव स्तुतीचीं आपलीं गाणीं बंद करा. ’ असें सांगण्याचा माझ्या मनांत विचार आला.

इतक्या सुमारास माझे पति आंत आले. पूर्वीप्रमाणें चटकन भानावर येण्याचें कौशल्य आज कांहीं संदीपबाबूंना साधलें नाहीं. पतींनीं चकित होऊन कांहीं वेळ त्यांच्याकडे पाहिलें. असें कांहीं दिवसांपूर्वी घडतें तर मला लाज वाटली असती; परंतु आज मला आनंद झाला. त्यांना कांहींही वाटो—परंतु माझ्या दुर्बळ प्रतिपक्ष्याची पुरी फजीती करण्याची माझी इच्छा होती.

आम्हां दोघांनाही स्तब्ध आणि चमकलेलीं पाहून त्यांना प्रथम थोडा संकोच वाटला. परंतु मग खुर्चीवर बसून ते म्हणाले, "संदीप, मी तुलाच पाहत होतों. तूं इकडे आहेस म्हणून कळलें."

"होय, मी येथें आहे." संदीपबाबू जरा जोरानें म्हणाले. "मधुराणींनीं मला आज इतक्या लौकर हांक मारली. आणि पोळ्यांतील मी तर एक नम्र कामकरी. तेव्हां दुसरें सगळें सोडून मला इकडे यावें लागलें."

"मी उद्यां कलकत्त्याला जाणार आहें. तूं मजबरोबर येणार ना?"

"कां बरें? मी तुझ्या नोकरवर्गापैकीं आहें असें तुला वाटतें काय?"

"ओहो! कांहीं हरकत नाहीं. समज कीं तूंच कलकत्त्यास जात आहेस व मी तुझ्याबरोबर येतों आहें."

"माझें तेथें कांहीं काम नाहीं."

"म्हणून तर जरूर जावयाला पाहिजे. येथें तुला फार जास्त काम झालें आहे."

"माझा येथून हालण्याचा विचार नाहीं."

"मग तुला हालविण्याचा माझा विचार आहे."

"जबरदस्तीनें?"

"जबरदस्तीनें."

"बरें तर मग. मी हालतों तर. परंतु जग म्हणजे कांहीं तुझी इस्टेट अथवा कलकत्ता नव्हे. जगावर दुसरी

पुष्कळ ठिकाणें आहेत."

"आजपर्यंतचा तुझा क्रम पाहिला तर माझ्या इस्टेटीशिवाय दुसरी जागा तुझ्या मतानें जगांत असेल असें कांहीं कोणाला वाटलें नसतें."

संदीपबाबू उठून म्हणाले, "कधीं कधीं असें हातें कीं, सर्व जग मनुष्याला एका जागेंत मावलेंसें वाटतें. मला माझें विश्व या तुझ्या बसण्याच्या खोलींत आढळून आलें आहे. आणि म्हणूनच मी हा असा येथें डांबलेला आहें."

"मधुराणी, तुमच्याखेरीज माझे हे शब्द कोणाला कळणार नाहींत--कदाचित तुम्हांलाही ते समजणार नाहींत. मी तुम्हांला वंदन करतों. माझ्या दृष्टीला तुम्ही पडल्यापासून माझ्या परवलीचा शब्द बदलला आहे. आतां तो 'वंदे मातरम्' हा राहिला नाहीं; तर 'प्रियतमेला, मोहिनीला वंदन असो' असा तो झाला आहे. माता संरक्षण करते—प्रिया—गृहिणी—नाश करते. परंतु त्या नाशांत माधुर्य आहे. मृत्यूच्या नृत्यांतील पैंजणांचा मधुर आवाज तुम्हीं माझ्या हृदयाला ऐकविला आहे. 'सुजलां, सुफलां, मलयजशीतलां, सस्यश्यामलां' असें जें मी माझ्या देशाचें स्वरूप समजत होतों तें तुम्हीं पार बदलून टाकलें आहे. तुम्ही माझ्याकडे विषपात्र घेऊन आलां आहां. तुमच्याजवळ दया नाहीं. तें पात्र मी रितें करणार. मग मी एक तर दुःखांत मरेन अथवा मृत्यूवर विजय मिळवून जगेन."

"देशमातेचा दिवस गेला. तुम्हीं, तुम्हीं मला सत्य,

चांगलें, खुद्द स्वर्ग, यांना कस्पटासमान भासविलें आहे. सगळीं कर्तव्यें मला सावलीप्रमाणें झालीं आहेत. सर्व नियमांचीं आणि निग्रहांचीं बंधनें तुटून गेलीं आहेत. माझ्या प्रियतमे, सगळ्या जगाला आग लावून देऊन तुझ्या कमळासारख्या पायांखालची जमीन खेरीज करून त्या जगाची राख झाल्यावर मोठ्या उन्मादातिरेकानें मी नृत्य करीन असें मला वाटे. हे दुसरे पुरुष मृदु आहेत. हे पुरुष चांगले आहेत. ते सर्व जण सर्वांचें हितच—जणूं कांय हे सर्व वास्तविक आहेत. जगांत या माझ्या प्रेमाखेरीज दुसरें कांहीं वास्तविक नाहीं. मी तुम्हांला वंदन करतों. तुमच्या भक्तीनें मी क्रूर झालों आहें; तुमच्या पूजेनें नाशाची भडकणारी ज्योत माझ्या हृदयांत पेटविली आहे. मी नीतिमान नाहीं. मला श्रद्धा नाहीं. या सर्व जगांत मला फक्त जिची जाणीव झाली आहे तिजवरच मात्र माझी श्रद्धा आहे."

आश्चर्य! खरोखर सर्व कांहीं आश्चर्य! एका क्षणापूर्वींच मी त्यांचा मनापासून तिरस्कार करीत होतें. परंतु नुसती राख आहे असें जेथें वाटत होतें तेथेंच जागृत अग्नि पेटलेला मला आढळला. त्यांच्यांतील तेज—अग्नि—सत्य आहे यांत मुळींच शंका नाहीं. स्रष्टयानें असा मिश्र मनुष्य कशाला उत्पन्न केला? केवळ आपल्या हातचें अतिमानुष कौशल्य प्रकट करण्यासाठींच काय? मला एका क्षणापूर्वींच असें वाटलें कीं, ज्या संदीपबाबूंना मी वीरनायक समजत होतें ते संदीपबाबू अद्भुतरसप्रधान नाटकांतील नायक आहेत. परंतु तसें नाहीं.

नाटकाच्या पडद्याआड कधीं कधीं खरा वीरही असूं शकतो.

संदीपबाबूंमध्यें गांवढळपणा, विषयप्रधानता, असत्य, निर्दयता, पुष्कळ आहे. परंतु हें कबूल केलेंच पाहिजे कीं, त्यांच्यांत असेंही पुष्कळ आहे कीं, ज्याचा आपल्याला पार तळ लागत नाहीं—आपल्यांत सुद्धां असेंच कांहीं असतें. मनुष्य हा एक चमत्कृतिमय प्राणी आहे. त्याच्या हातून कोणतें गूढ कार्य होत आहे परमेश्वराला माहीत. आम्ही मात्र त्याच्या झपाटयांत सांपडलों आहों. शिव हा लयाचा देव आहे; तो सर्वस्वीं आनंदमय आहे; तो आमच्या बंधनांचा नाश करील !

मला आपलें पुन्हां पुन्हां वाटतें कीं, माझ्यांत दोन माणसें आहेत. एक संदीपच्या लयस्वरूपापासून दूर राहूं पाहतें. दुसऱ्याला त्यांचें तेंच स्वरूप मधुर आणि मोहक वाटतें. बुडणारें जहाज आपल्याभोंवतीं तरंगणाऱ्या सर्व वस्तूंना आपल्याबरोबरच जलसमाधि देतें. संदीपबाबू अशीच एक विनाशशक्ति आहेत. त्यांची भीति वाटून दूर होण्यापूर्वींच मनुष्य त्यांच्या अफाट आकर्षणाच्या तावडींत सांपडतो; आणि मग डोळ्यांचें पातें लवतें न लवतें तोंच प्रकाश, सत्य, वातावरणांतील—श्वासोच्छ्वासाचें सुद्धां—स्वातंत्र्य, जन्मभर जमा केलेल्या वस्तु व भावना, दररोजची काळजी, या सर्वांपासून मनुष्य अगदीं अनिवार्य रीतीनें ओढला जाऊन थेट मृत्यूच्या जबड्यांत जातो.

एखाद्या संकटप्रदेशांतून संदीपबाबू दूत म्हणून आले

आहेत; अपवित्र मंत्र म्हणत ते एखाद्या प्रदेशावर धाड घालतात; लगेच मुलें आणि तरुण त्यांच्याभोंवतीं जमा होतात. देशाच्या कमळहृदयांत बसलेली माता, आपल्या अमृताचा सांठा ते जमीनीवर ओतून टाकतील व आपल्या प्राचीन व सन्मान्य नावा मोडून त्यांचे ते तुकडे करतील, म्हणून हृदय फोडून रडत आहे. कारण त्यांनीं दारू पिऊन तिची कोठीची खोली धिंगाणा घालण्यासाठीं फोडली आहे. मला सुद्धां तिच्याबरोबर वाईट वाटत आहे; पण त्याच वेळीं त्यांच्या प्रक्षोभाचीही मला आवड वाटल्यावांचून राहत नाहीं.

आम्ही सत्याच्या आज्ञा कितपत पाळतों हें पाहण्यासाठीं सत्यानेंच हा मोहक दूत पाठवला आहे. निशा स्वर्गीय वेष घेऊन यात्रेकरूंना—प्रवाशांना—म्हणत आहे, "तुमच्यापैकीं जे त्यागाच्या मार्गानें जातात ते मूर्ख होत. निवृत्तीचा मार्ग लांब आहे. तिचा काळ फार मंद आहे आणि म्हणून वज्रधाऱ्यानें मला तुमच्याकडे पाठवलें आहे. मी सुंदर आहें; मी विकारमय आहें. मजकडे पहा. मला मिठी माराल तर तुमच्या सर्व आशा परिपूर्ण होतील."

थोडा वेळ थांबून संदीपबाबू मला पुन्हां म्हणाले, "देवी, तुला सोडून जाण्याची माझी वेळ आली आहे. फार चांगलें आहे. तुझ्याजवळचें काम संपलें आहे. आतां येथेंच रेंगाळल्यास हळू हळू तें झालेंच नाहीं अशा स्थितीला येईल. आमच्या लोभानें जगांतील उच्चतम वस्तूला जर आम्ही स्वस्त करूं लागलों तर सगळ्याचाच नाश होतो. एक

क्षणभर जें अपरिमित असतें तें बऱ्याच काळांत पसरलें तर परिमित होतें. आपला अपरिमित क्षण आपण अगदीं घालविण्याच्या बेतांत होतों. इतक्यांत तुझेंच वज्र सुटकेला आलें. तुझ्या पूजेचें पावित्र्य राखण्यासाठीं तूंच मध्यें पडलीस; आणि असें करण्यानें तूं आपल्या भक्तालाही वांचविलेंस. आज मी तुझी रजा घेतों आहें. यांत तुझ्या भक्तीचाच मोठा थोरला भाग आहे."

"देवी, मी पण आज तुला स्वतंत्र करतों. माझ्या मातीच्या देवळांत तुला धरून ठेवण्याची शक्ति नाहीं. तें केव्हां मोडेल याचा नेम नाहींसा झाला आहे. आज तुझ्या मोठ्या मूर्तीची मोठ्या देवालयांत पूजा करावयास मी निघालों आहें. तुझ्यापासून दूर राहूनच मला खरोखर जास्त फायदा होईल. येथें मला फक्त तुझी कृपाच प्राप्त होत होती. दूर मला तुझा वर प्राप्त होईल."

जवाहिराची पेटी टेबलावरच होती, ती वर उचलून मीं म्हटलें, "देवीकडे ही नेण्याची मी तुम्हांला कामगिरी सांगतें —तुमच्या मार्फत मीं तिला ही कधींच अर्पण केली आहे."

माझे पति कांहींच बोलले नाहींत. संदीपबाबू खोलींतून निघून गेले.

४

मी अमूल्यासाठीं करंज्या करावयाला बसलें नाहीं तोंच

मोठी राणी तिकडे आली. "धाकट्या राणीसाहेब, गडे तुमच्या जन्मदिवशीं स्वतःसाठीं करंज्या करीत बसण्याची पाळी तुम्हांवर यावी ना !" ती उद्गारली.

"पण मीं त्या दुसऱ्या कोणासाठीं करूं नयेत अशीच माझी स्थिति आहे काय ?" मीं विचारलें.

"परंतु आज तुम्हीं दुसऱ्यांना मेजवानी नाहीं घालावयाची. आज आम्हीं तुम्हांला मेजवानी घालावयाची. मी कांहीं तरी करण्याच्या बेतांत होतें तोंच ती भयंकर बातमी ऐकून मला धडकीच भरली. पांचसहाशें लोकांनीं आपल्यापैकीं एका तिजोरीवर हल्ला करून सहा हजार रुपये लांबविले म्हणतात. खुद्द आपल्या घरावर लवकरच दरवडा पडेल असें म्हणतात."

माझें अंतःकरण अगदीं हलकें झालें. कारण ते पैसे आमचेच होते हें माझ्या तेव्हांच ध्यानांत आलें. अमूल्याला बोलावून आणून 'नोटा पतींजवळ दे आणि सगळें कांहीं माझ्यावर लोट' असें त्याला सांगावें अशी मला इच्छा उत्पन्न झाली.

माझ्या चेहऱ्यावरील फरक पाहून राणी म्हणाली, "तुम्ही एक चमत्कारिक प्राणी आहां बाई ! खरोखरच तुम्हांला भीति हा पदार्थच ठाऊक नाहीं काय ?"

"मला नाहीं वाटत. काय म्हणून ते आमचें घर लुटतील ?"

"नाहीं वाटत खरें ! आमची दुय्यम तिजोरी लुटली

जाईल असें तरी कोणाला वाटलें होतें ?"

मी कांहींच न बोलतां खालीं दृष्टि लावून किसलेलें खोबरें करंज्यांत घालीत बसलें.

"बरें आहे. मला आतांच्या आतां निखिल भावोजींकडे जाऊन वेळ गेली नाहीं तोंच तेवढे ते पैसे कलकत्त्यास पाठवण्यास सांगितलें पाहिजे," असें म्हणून ती गेली.

तिची पाठ वळली नाहीं तोंच मीं करंज्या तशाच ठेवून दिल्या आणि तडक कपड्यांच्या खोलींत जाऊन आंतून कडी लावून बसलें. माझ्या पतींचें जाकीट तेथेंच होतें; त्यांत किल्ल्यांचा जुडगा तसाच होता. मीं तेथल्या तिजोरीची किल्ली जुडग्यांतून काढून घेतली आणि ओच्यांत सुरक्षित ठेवून दिली.

इतक्यांत दारावर टिचक्या वाजूं लागल्या. 'मी कपडे करीत आहें,' मी ओरडलें. मोठी राणी मला ऐकूं येईलसें म्हणाली, "एका क्षणापूर्वीं मीं त्यांना करंज्या करतांना पाहिलें. आणि आतां या कपडे करीत आहेत! याच्यापुढें आणखी काय हरि जाणे! त्यांची 'वंदे मातरम्'ची भेट चालली आहेसें वाटतें." ती मला हांक मारून म्हणाली, "अहो दरवडेखोरांच्या राणीसाहेब, आंत काय तुम्ही लुटीचा हिशेब घेत आहां काय?"

ती निघून गेल्यावर मीं तिजोरी कशासाठीं उघडली कोण जाणे! कदाचित सगळें कांहीं स्वप्न आहे अशा एखाद्या आशेचा तंतु शिल्लक राहिलेला असेल. आंतला

खण उघडल्यावर आंत गिन्यांच्या जुळ्या जशाच्या तशा सांपडल्या तर ? परंतु नष्ट केलेल्या भरंवशाप्रमाणें सर्व कांहीं शून्य होतें.

मला मग वस्त्रें बदलण्याचा फार्स करावा लागला. अगदीं कांहीं जरूरी नसतांना मला आपले केस पुन्हां निराळ्या तऱ्हेनें बांधावे लागले. मी बाहेर आल्यावर मोठ्या राणीनें मजवर तोंड टाकून म्हटलें, " आज तुम्ही किती वेळां कपडे पालटणार आहां ? "

" आज माझा जन्मदिवस ना ? " मीं म्हटलें.

" हं ! कोणतीही सबब ठीक दिसते. मीं आपल्या आयुष्यांत पुष्कळ दिमाखदार लोक पाहिले आहेत. परंतु तुम्ही त्यांचा अगदीं पार नक्षा उतरून टाकतां. "

मी कोणाला तरी अमूल्याला बोलावूं पाठवण्याच्या बेतांत होतें तोंच एकानें मला एक लहानशी चिठ्ठी आणून दिली. ती अमूल्याची होती. " ताई, आज तूं मला संध्याकाळीं बोलावलें होतेंस; तोंपर्यंत थांबणें मला बरें वाटत नाहीं. प्रथम मी तुझी आज्ञा पार पाडतों आणि मग तुझा प्रसाद घ्यावयाला येतों. कदाचित थोडा उशीर होईल. " असें त्यानें लिहिलें होतें.

कोणाला हा पैसे नेऊन देणार ? आणखी कसल्या नव्याच भानगडींत सांपडतो आहे कोण जाणे. अहा ! किती दुर्दैवी स्त्री मी ! मीं त्याला बाणासारखा पाठवला खरा; पण आतां नेम चुकला तर मला तो परत कांहीं घेतां

येणार नाहीं. अशा प्रकारच्या विचारांनीं माझ्या मनांत काहूर उसळलें.

या दरवड्याच्या मुळाशीं मी आहें असें मीं सांगितलें पाहिजे होतें. परंतु आजूबाजूच्या लोकांची निष्ठा आहे तोंपर्यंत आम्हां स्त्रियांचें जीवित तेवढेंच आमचें जग. एकदां का हा भरंवसा गुप्त तऱ्हेनें आम्हीं मोडला असें बाहेर आलें कीं मग आमच्या जगांतील आमची जागा गेली. मग आम्हांला आम्हीं मोडलेल्या वस्तूंच्या तुकड्यांवर उभें राहावें लागतें आणि ते आमच्या पायांना एकसारखे बोचत राहतात. स्त्रीला पाप करणें सोपें आहे; परंतु मग त्याची भरपाई करणें मात्र फार कठीण आहे.

आज बरेच दिवस त्यांच्याशीं—पतींशीं—सहज बोलावयाला मिळण्याचे प्रसंग मला अगदीं सांपडतनासे झाले आहेत. मग मीं त्यांच्याजवळ जाऊन या बातमीचा स्फोट कसा करावा ? आज त्यांना जेवावयाला येण्यास फार उशीर झाला—दोन वाजले. अगदीं भ्रमिष्टासारखे ते वागत होते. अन्नाला जवळजवळ स्पर्श सुद्धां केला नाहीं. आग्रह करण्याचा सुद्धां माझा हक्क नष्ट झाला होता. अश्रू पुसण्यासाठीं मला आपलें तोंड फिरवावें लागलें.

“ खोलींत जाऊन थोडी विश्रांति घ्यावी; किती दमावयाला झालें आहे ! ” असें म्हणावें असें मला किती, किती वाटत होतें ! मीं थोडासा घसा सुद्धां साफ केला. इतक्यांत पंचूला घेऊन पोलीस इन्स्पेक्टर राजवाड्यांत आले आहेत अशी एका

गड्यानें वर्दी दिली. त्यांच्या तोंडावरील काळजीची छाया जास्त स्पष्ट झाली. जेवण अर्धवट टाकून ते बाहेर गेले.

थोड्या वेळानें मोठी राणी आली. "निखिल भावोजी आंत आले तेव्हां तुम्हीं मला कां कळविलें नाहीं ? त्यांना थोडासा उशीर झाला तेव्हां म्हटलें आंगधुणें उरकून घ्यावें. इतक्या लौकर त्यांचें जेवण कसें झालें बाई !"

"काय तुमचें काम होतें त्यांच्याशीं ?"

"हें तुमचें दोघांचें उद्यां कलकत्त्याला जावयाचें काय निघालें आहे ? मला एवढेंच सांगावयाचें आहे कीं, मी कांहीं येथें एकटी राहणार नाहीं. आसपास जिकडे तिकडे दरवडेखोर पसरले आहेत; त्यामुळें थोडासा आवाज झाला तरी सुद्धां माझा जीव जावयाला होईल. तुमचें अगदीं उद्यां जाण्याचें ठरलें का ?"

मीं ती गोष्ट नुकतीच ऐकली होती; आणि दुसऱ्या दिवसापर्यंत आम्ही गेलों काय अथवा नाहीं काय कांहींही सारखेंच अशा तऱ्हेनें आमच्या जीविताचा ओघ बदलतो कीं कसें याविषयींही मला शाश्वती वाटत नव्हती. तसें झाल्यावर पुढें काय होईल हें कांहीं माझ्या दृष्टीला दिसत नव्हतें—सगळें कांहीं स्वप्नासारखें अंधुक दिसत होतें—तरी पण मीं जावेला 'होय' असें उत्तर दिलें.

आतां थोड्याच तासांत माझें नशीब उघड व्हावयाचें होतें. कोणी तरी हे थोडे तास खूप वेळ लांबवून मला सगळ्या गोष्टींची शक्य तर योग्य व्यवस्था लावण्यास वेळ

मिळवून देईल काय ? बीं जमीनींत असतें तो काळ फार लांब असतो. आतां तें उगवणार नाहीं असा त्यामुळें संशय सुद्धां येतो. परंतु एकदां का अंकुर वर आला म्हणजे मग तो वेगानें वाढतो आणि मग त्याला पदरानें अगर शरीरानें अथवा जीवितानें सुद्धां झांकतां येत नाहीं.

मीं त्या बाबतींत विचार न करण्याचा मग निश्चय केला. वाटेल तसें संकट येवो, अगदीं निष्क्रिय आणि मुग्ध बसावयाचें असें मीं ठरविलें. दोन दिवसांनीं सर्व कांहीं कसेंबसें आटोपेल—प्रसिद्धी, हंसें, रडें, प्रश्न आणि उत्तरें, सर्व कांहीं आटोपेल.

परंतु अमूल्याचा भक्तियुक्त सुंदर आणि अरुण चेहरा माझ्यापुढून जाईना. नशीबाचा तडाखा येईल तेव्हां येईल असें म्हणून तो निराशेनें वाट पाहत बसला नाहीं, तर एकदम संकटाच्या धुमश्चक्रींत त्यानें उडी टाकली. मी घाणेरडी स्त्री आहें खरी, पण मी त्याला वंदन करतें. तो माझा बालस्वरूपी देव आहे. खेळाच्या मिषानें त्यानें माझें सगळें ओझें आपल्यावर घेतलें. माझी शिक्षा आपण सोसून मला सोडविण्याचा त्याचा विचार आहे. परंतु माझ्या देवाची ही भयंकर कृपा मी सहन कशी करूं ? असे विचार माझ्या मनांत घोळूं लागले.

माझ्या बाळा, मी तुला वंदन करतें. तूं माझा धाकटा भाऊ आहेस; तुला मी वंदन करतें. तूं शुद्ध आहेस; तूं सुंदर

आहेस; तुझें मी वंदन करतें. पुढल्या जन्मीं तूं माझा मुलगा होऊन माझ्या हातीं खेळावेंस एवढीच माझी प्रार्थना आहे.

५

जिकडे तिकडे निरनिराळ्या अफवा उठूं लागल्या. पोलीस एकसारखे येत आणि जात. नोकर चाकर सगळे अगदीं घाबरून गेले होते.

माझी दासी खेमा मजकडे येऊन म्हणाली, 'राणी आई साहेब! कसेंही करा आणि एवढी माझी पुतळ्यांची माळ व या वांकी तुमच्या लोखंडी तिजोरींत ठेवा.' राणीच या सगळ्या गुंतागुंतीच्या मुळाशीं असून स्वत: तीही पण त्यांत सांपडली होती असें मीं कोणास सांगावें! मला मोठ्या संरक्षकाचा आणि दयावंताचा आव घालून खेमाचे दागिने आणि ठकूची शिल्लक आपल्याजवळ ठेवावी लागली. गवळणीनें तर आपली एक पेटी आणून माझ्या खोलींत ठेवली. त्यांत तिची एक बनारसी साडी आणि दुसऱ्या कांहीं मूल्यवान चिजा होत्या. 'आपल्या लग्नाच्या वेळीं मला या मिळाल्या' असें मला तिनें सांगितलें.

उद्यां जेव्हां या सर्वांच्या समक्ष तिजोरीची पेटी उघडली जाईल—नको पण, त्याचा विचारच नको! आणखी एक वर्षानें माघ शुद्ध तृतीया येईल त्या वेळीं काय होईल याचाच विचार करावा. माझ्या घरांतील जीवितावरील जखमा

त्या वेळीं आजच्या इतक्याच ताज्या राहतील काय ?

अमूल्य लिहितो, मला यावयाला उशीर होईल. कांहीं न करतां विचार करीत कांहीं मला बसवत नाहीं. तेव्हां आतां त्याच्या करंज्या करावयाला बसावें—पुष्कळच झाल्या या. या कोण खाणार ? गड्यामाणसांना वाढून टाकाव्या. रात्रींच हें केलें पाहिजे. आज माझी मर्यादा आहे; उद्यांचा दिवस माझ्या हातीं नाहीं. असे विचार मनांत भ्रमण करीत होते.

मी न दमतां सारखी करंज्यावर करंज्या तळीत होतें. मला एकसारखें वाटे कीं, माझ्या वरच्या खोलींत कांहीं तरी आवाज झाला. माझ्या पतींची किल्ली हरवलेली समजून मोठ्या राणीनें ती शोधण्यासाठीं जमविलेल्या गड्यामाणसांचा तर तो आवाज नसेलना ? छे ! मला या आवाजांकडे लक्ष देतां कामा नये. चला, दारच लावून घेऊं.

असें मनांत म्हणून मी दार लावावयाला उठलें. इतक्यांत ठकू धापा टाकीत आली. " राणी आई ! राणी आई ! " ती ओरडली.

" चालती हो, " मी तिला पुढें बोलूं न देतां म्हणालें. " मला त्रास द्यावयाला येऊं नकोस इकडे. "

ती पुढें म्हणाली, " मोठ्या राणीसाहेबांनीं आपल्याला बोलावलें आहे. त्यांच्या भाच्यानें कलकत्त्याहून एक चमत्कारिक यंत्र आणलें आहे. तें माणसासारखें बोलतें. येऊन ऐका तर खरें ! "

हंसावें कीं रडावें हेंच मला कळेना. एकंदरींत दुसऱ्या सगळ्या वस्तु राहून, प्रत्येक वळणाला आपल्या नाटकी पदांतील गेंगाणा झणत्कार बाहेर टाकणारा फोनोग्राफ या प्रसंगीं हजर व्हावा ना! यंत्र मनुष्याची नक्कल करूं लागलें म्हणजे किती भयंकर परिणाम होतो!

संध्याप्रकाश नाहींसा होऊं लागला. आल्याची वर्दी दिल्याखेरीज अमूल्य राहणार नाहीं हें मला माहीत होतें तरी मला थांबवेना. मीं एका गड्याला बोलावून म्हटलें, "अमूल्यबाबूंना जाऊन सांग कीं, तुम्हांला तडक आंत बोलावलें आहे."

थोड्या वेळानें परत येऊन तो मनुष्य म्हणाला, "अमूल्यबाबू घरीं नाहींत. ते गेले ते अद्याप आले नाहींत."

'गेले' हा शब्द अंधारांतील रोदनाप्रमाणें माझ्या कानांत शिरला. अमूल्य गेला! मग तो केवळ कायमचा जाण्यासाठीं आलेला अस्तंगत होणाऱ्या सूर्याच्या प्रकाशाचा फवाराच होता काय? शक्य आणि अशक्य अशीं सगळीं संकटें माझ्या मनांत येऊन गेलीं. मीं त्याला मृत्यूकडे पाठवला होता. त्याला भीति वाटली नाहीं तर तो त्याच्या हृदयाचा मोठेपणा झाला. पण त्यानंतर माझा जीव कसा काय राहणार?

अमूल्यानें मला ओवाळणी म्हणून दिलेल्या पिस्तुलाखेरीज त्याच्या आठवणीची दुसरी वस्तु मजजवळ नंव्हती. भवितव्यतेनें ही सूचनाच केली असें मला वाटलें. माझ्या

दोषानें अगदीं माझ्या जीविताच्या मुळाशीं कीड लावली होती—पण माझ्या या बालरूपी देवानें त्याच्या क्षालनाचा उपाय मला देऊन ठेवला होता. किती प्रेमळ देणगी! तिच्यांत केवढी संरक्षक कृपा!

मीं पेटी उघडून पिस्तूल काढलें आणि भक्तिपूर्वक तें कपाळाशीं धरलें. त्याच वेळीं आमच्या शेजारच्या देवळांत घंटांचा आवाज झाला—मीं साष्टांग नमस्कार घातला.

संध्याकाळीं मीं घरांतील सर्वजणांना करंज्यांची मेजवानी दिली. "तुम्हीं आपल्या वाढदिवसाची मोठी मजेची मेजवानी दिलीत बाई!" माझी जाऊ म्हणाली. "पण आम्हांला सुद्धां तुम्हीं कांहीं तरी थोडेंसें करूं दिलें पाहिजे." असें म्हणून त्यांनीं फोनो सुरू करून कलकत्त्यांतील नायकिणींचीं गाणीं सुरू केलीं. खिंकाळणाऱ्या घोड्यांच्या तबेल्यांत बसल्याप्रमाणें मला वाटलें.

मेजवानीचा समारंभ आटोपण्याला पुष्कळ रात्र झाली. पतींच्या पायाची धूळ मस्तकाला लावून आपल्या वाढदिवसाचा समारंभ आटोपावा अशी एकाएकीं माझ्या मनांत इच्छा उत्पन्न झाली. मी खोलींत गेलें तों त्यांना गाढ झोंप लागली होती. त्यांचा सगळा दिवस त्रासांत आणि कटकटींत गेला होता. मीं मच्छरदाणीचें टोंक अगदीं हळूच उचललें आणि डोकें त्यांच्या पायांवर ठेवलें. माझ्या केसांचा त्यांना स्पर्श झाला असावा; कारण झोंपेंतच पाय हालवून माझें डोकें त्यांनीं ढकललें.

मग मी बाहेर जाऊन पश्चिमच्या पडवींत बसलें. लांब अंतरावर, पानें झडून गेलेलें एक सावरीचें झाड हाडांच्या सांपळ्याप्रमाणें उभें होतें. त्याच्या पलीकडे चंद्रकोर अस्तास जात होती. सगळें आकाश मला भीत आहे--सगळी रात्र माझ्याकडे टवकारून पाहत आहे, असा एकदम माझ्या मनांत विचार आला. कां बरें ? मी एकटी होतें म्हणून ?

सगळ्या सृष्टींत एकाकी मनुष्याइतकें चमत्कारिक कांहीं नाहीं. ज्याचे सगळे नातेवाईक एकामागून एक मरतात तो सुद्धां एकटा असत नाहीं--मृत्यूच्या पडद्यापाठीमागून त्याला सोबत प्राप्त होते. परंतु ज्याचे नातेवाईक जवळ असून जवळ नसतात, घर भरलेलें असून ज्याला सोबत नाहींशी होते, त्याच्या अंधाऱ्या आयुष्याकडे पाहून चांदण्यांनीं युक्त असें विश्व सुद्धां लाजतें.

जेथें मी असतें तेथें मी नसतें. माझ्या सभोंवारच्या लोकांपासून मी अगदीं दूर असतें. कमळाच्या पानावरील पाण्याच्या थेंबाप्रमाणें अशाश्वत अशा विरहाच्या विश्वव्यापी पोकळींत मी आपलें जीवित घालवीत आहें.

मनुष्य बदलतात तेव्हां ते सर्वतोपरी कां बरें बदलत नाहींत ? मीं आपल्या हृदयांत पाहिलें म्हणजे त्यांतील सर्व वस्तु मला तेथें दिसतात. पण त्या सगळ्या अस्ताव्यस्त पडल्या आहेत—नीट व्यवस्थित असलेल्या सगळ्या वस्तु आडव्यातिडव्या पडल्या आहेत. माळेमध्यें अडकविलेलीं रत्नें धुळींत लोळत पडलीं आहेत. आणि म्हणून माझें

हृदय फुटूं पाहत आहे.

मला मरावेंसें वाटतें. परंतु माझ्या हृदयांत सर्व कांहीं जिवंतच राहतें--मृत्यूंत सुद्धां मला सगळ्याचा शेवट दिसत नाहीं. मृत्यूंत सुद्धां तितकीच धुसफूस शिल्लक राहणारसें दिसतें. सगळ्या गोष्टींचा शेवट या आयुष्यांतच लागला पाहिजे. दुसरी मार्ग नाहीं.

परमेश्वरा, मला फक्त एकदां ही वेळ क्षमा कर. तूं माझ्या हातांत माझी संपत्ति म्हणून जें जें दिलेंस त्या सगळ्याचें मीं ओझें बनविलें आहे. मला तें यापुढें सहनही होत नाहीं आणि टाकवतही नाहीं. परमेश्वरा, फार पूर्वीं माझ्या प्रभातकाळच्या आकाशाच्या गुलाबी क्षितिजावर बसून तूं सुस्वर वेणुध्वनि काढलेस तसे पुन्हां एकदां काढ. माझ्या जीवितांतील गुंतागुंत सोपी होऊं दे. मोडलेलें एक होण्याला अथवा अशुद्ध शुद्ध होण्याला तुझ्या वेणुगीताशिवाय उपाय नाहीं. आपल्या वेणुनिनादानें माझें गृह पुन्हां निर्माण कर. मला दुसरा मार्ग दिसत नाहीं.

अशी प्रार्थना करीत मी तोंड जमीनीकडे करून पडलें आणि मोठ्यानें स्फुंदून रडूं लागलें. कोठून तरी दयेचें आवरण थोडेंसें मिळावें, थोडेंसें क्षमेचें चिह्न कोठून तरी प्राप्त व्हावें, कोठून तरी शेवट होण्याची आशा दिसावी, अशी माझी मनापासून प्रार्थना चालली होती. मीं प्रतिज्ञा केली कीं, परमेश्वराचा आशीर्वाद मला येऊन पोंचेपर्यंत मी येथेंच अशी वाट पाहत राहणार; अन्नपाण्याला शिवणार नाहीं.

मला चाहूल ऐकूं आली. कोण म्हणतो कीं ईश्वर मर्त्य मनुष्याला दर्शन देत नाहीं? मीं पाहण्यासाठीं दृष्टि वर केली नाहीं. पाहल्याबरोबर मंत्राचा प्रभाव नाहींसा व्हावयाचा. ये, ये, ये! परमेश्वरा, ये आणि तुझ्या पदकमलांचा माझ्या मस्तकाला स्पर्श होऊं दे. परमेश्वरा, ये आणि माझ्या धडाडणाऱ्या छातीवर उभा रहा—व तत्क्षणींच मला मरूं दे. अशी त्याची मीं प्रार्थना केली.

कोणी तरी येऊन माझ्या मस्तकाशीं बसलें. कोण? दुसरें कोण! माझें दुःख पाहवेना अशा त्या परमेश्वराच्या सांनिध्यांत त्यांची बैठक हालली. मला वाटलें मला मूर्छा येणार. मग माझ्या हृदयांतील दुःख विरोधी शिरांना आणि नाड्यांना तोडून अश्रूंच्या अनिवार्य पुराबरोबर बाहेर पडलें. मीं त्यांचे पाय लांबवून हृदयाशीं धरले. अरेरे! त्यांचा छाप तेथें कायमचा कां बरें राहिला नाहीं?

माझ्या डोक्यावर नाजूक तऱ्हेनें ते थोपटूं लागले. मला त्यांचा आशीर्वाद मिळाला. आतां उद्यां होणारा सार्वजनिक अपमान सहन करून तो अत्यंत कळकळीनें आपल्या परमेश्वरचरणीं अर्पण करतां येईल असा मला भरंवसा आला.

परंतु माझ्या हृदयावर दडपण पडत आहे तें असें कीं, आज नऊ वर्षांपूर्वी ज्या सूरसनयांनीं सुस्वर निनादानें माझ्या विवाहसमयीं या गृहांत माझें स्वागत केलें त्या सूरसनया माझ्याकरितां या आयुष्यांत पुन्हां वाजणार

नाहींत. अशी कोणती तपश्चर्या केली असतां मी माझ्या या गृहांत तांबडें वस्त्र नेसून चंदनाची उटी लावून नववधूच्या नात्यानें येऊं शकेन, हें मला कोणी सांगेल काय? त्या नऊ वर्षांपूर्वीच्या शुभ दिवसाची प्राप्ति होण्यास मला किती युगें-किती कल्प-घालविलीं पाहिजेत!

ईश्वर नवीन वस्तु उत्पन्न करतो. परंतु एकदां नाश पावलेली वस्तु त्याला तरी पुन्हां जशीच्या तशी उत्पन्न करतां येत असेल काय?

अशा प्रकारच्या विचारांनीं माझें मन भ्रमून गलें.

## प्रकरण सतरावें

### निखिलची आत्मकथा

१

आज आम्ही कलकत्त्यास जाणार आहों. आमचीं दुःखें अथवा सुखें नुसतीं आम्ही वाढवीत बसलों तर त्यांचें आमच्यावर ओझें मात्र होतें. त्यांचें रक्षण करणें अथवा त्यांचा संग्रह करणें दोन्हीही कार्यें अवास्तविक होत. घराचा धनी या नात्यानें माझी स्थिति कृत्रिम आहे; संसाराच्या मार्गांतील वास्तविक मी एक वाटसरू आहें. याच कारणास्तव घराच्या धन्याला पावलोपावलीं जखमा होत आहेत; आणि शेवटीं मृत्यूची परम जखम होणार आहे.

प्रिये, तुझा माझा संबंध केवळ मार्गाच्या बाजूचा होता. जोंपर्यंत आपण एकाच मार्गानें जात होतों तोंपर्यंत ठीक होतें; परंतु यापुढें तो कायम ठेवण्यानें

आपल्यावर संकट येईल. त्याचीं बंधनें आतां आपण मागें टाकीत आहों. त्याच्या पलीकडील प्रवासाला आतां आपण निघत आहों; त्यापूर्वीं आपण एकमेकांकडे एक दृष्टिक्षेप अथवा एक हस्तस्पर्श जातां जातां केला म्हणजे बस्स आहे. त्यानंतर ? त्यानंतर मग जास्त मोठा असा जगाचा मार्ग—विश्वरूप जीविताचा अनंत ओघ—आहेच.

परंतु खुद्द तुला सुद्धां माझ्या प्रेमाचा किती थोडा अंश लुबाडतां येणार आहे! मी कान देऊन ऐकूं लागलों कीं मला वेणू वाजत असलेली ऐकूं येते, आणि तिच्या गानाचें कारंजें विरहरूपी विवरांतून जोरानें बाहेर पडत असतें. देवीचें प्रेमाचें अमर पात्र कधींच रितें होत नाहीं. आम्ही ज्यांतून प्रेमरस पितों तें भांडें ती कधीं कधीं फोडते आणि एवढयाशा नुकसानीबद्दल आम्ही असमाधानी झालेले पाहून ती स्मित करते. मी आपलें फुटकें भांडें उचलण्याच्या भानगडींत पडणार नाहीं. दुःखित अंतःकरणानें का होईना, पण मी पुढेंच जाणार.

मोठया राणीनें येऊन मला विचारलें, "हीं सगळीं पुस्तकें बांधून पेटींत घालून नेलीं जात आहेत याचा अर्थ काय भावोजी ?"

"त्यांच्यावरचें माझें प्रेम अद्याप नष्ट होऊं शकलें नाहीं हा !"

" दुसऱ्या कांहीं गोष्टींवरचें तुमचें प्रेम असेंच कायम राहील तर काय बहार होईल! कधींच परत यावयाचें नाहीं असा बेत आहे काय तुमचा?"

" येऊन जाऊन राहणार आहें. कायम मात्र यापुढें राहणार नाहीं."

" खरें कीं काय? तर मग माझ्या खोलींत चला. तेथें माझें प्रेम किती वस्तूंवरून उडालें नाहीं हें तुम्हांला दिसून येईल." असें म्हणून तिनें माझा हात धरून मला आपल्या खोलींत नेलें.

माझ्या भावजईचीं असंख्य गाठोडीं आणि पेटया प्रवासासाठीं बांधून तयार अशा दिसल्या. त्यांपैकीं एक पेटी उघडून ती म्हणाली, " पहा भावोजी, या माझ्या विड्याच्या साहित्याकडे पहा. यांत मीं केशराचें पाणी दिलेला कात ठेवला आहे. या जस्ताच्या डब्यांतून निरनिराळ्या तऱ्हेचे मसाल्याचे जिन्नस ठेवलेले आहेत. माझे खेळण्याचे पत्ते अथवा बुद्धिबळांचा पट सुद्धां मी विसरलें नाहीं. तुम्हां दोघांना जर फारच काम असेल तर तेथें मी दुसऱ्या कोणाशीं तरी मैत्री करीन. ही फणी तुम्हांला ठाऊक आहे? माझ्यासाठीं तुम्हां आणलेल्या स्वदेशी फण्यांपैकीं आहे ती—"

" परंतु हें सगळें कशासाठीं?" मीं विचारलें. " ही सगळी बांधाबांध कशासाठीं चालविली आहे?"

" मी तुमच्याबरोबर येणार नाहीं असें तुम्हांला वाटतें काय?"

" किती चमत्कारिक बेत ! "

" भिऊं नका. मी तेथें येऊन कांहीं तुमचें हृदय चोरण्याचा प्रयत्न करणार नाहीं; अथवा धाकट्या राणीसाहेबांशीं भांडणार नाहीं ! केव्हां तरी मरावयाचें हें आहेच; मग लौकरच गंगातीरीं जाऊन राहावें हें बरें. त्या तुमच्या श्मशानांत जाऊन सर्व क्रिया घडवून आणण्याची मला भयंकर भीति वाटते, म्हणून तर मी आजपर्यंत मेलें नाहीं आणि तुम्हांला इतका त्रास दिला. "

शेवटीं मला घरांतील खरा आवाज ऐकावयाला मिळाला. मोठी राणी आमच्या घरांत वधू म्हणून आली तेव्हां मी फक्त सहा वर्षांचा होतों. गच्चीच्या एका कोपऱ्यांत बसून आम्ही दोघें जण अगदीं वीट येई तों दुपारचीं खेळलेलीं आहों. ती खालीं उभी राही आणि मी उंच झाडावरून आंबे टाकीत असें. व मग आम्ही त्यांच्या नानाप्रकारच्या स्वादिष्ट चटण्याकोशिंबिरी करीत असूं. आम्हांला मना असलेल्या कोठींतल्या सगळ्या वस्तु गोळा करण्याचें काम माझ्याकडे असे; त्या वस्तूंचा आम्ही आमच्या बाहुलीच्या लग्नाच्या भोजनसमारंभासाठीं उपयोग करीत असूं. कारण आमच्या आजीच्या शिक्षेंतून मलाच फक्त एकट्याला मुक्तता होती. आणि मीं विनंति केली असतां माझे बंधु ती कधीं नाकारीत नसत, म्हणून त्यांच्याकडून कांहीं मिळवावयाचें असलें म्हणजे ती मला त्यांच्याकडे पाठवीत असे. आणि मी आजारी पडलों व घाणेरड्या डाक्टरांनीं साबूदाण्याची खीरच

फक्त खावयाची असा हुकूम केला, म्हणजे मला जो संताप होत असे तो सहन न होऊन ती मला चोरून मिष्टान्न आणून देत असे. एक दिवस ती पकडली गेली तेव्हां तिला किती बोलून घ्यावें लागलें !

आणि मग आम्ही जसजशीं वाढूं लागलों तसतशीं आमचीं एकमेकांच्या सुखदु:खाचीं बंधनें स्नेहामुळें जास्त दृढ होऊं लागलीं. काय आम्ही भांडत असूं ! कांहीं कांहीं वेळीं आमचीं भांडणें होऊन आमच्या मनांत संशय व मत्सर यांचें प्राबल्य होऊं लागलें आणि प्रेमांत बांध उत्पन्न होऊं लागले. धाकटी राणी आल्यापासून ते बांध मग कायमचे होतात कीं काय असें वाटे. परंतु बांधाखालील भांडणें नष्ट करणाऱ्या शक्तीच वरच्या जखमांपेक्षां जास्त सामर्थ्यवान असत असें आढळून येई.

अशा रीतीनें लहानपणापासून आतांपर्यंत आमच्यामध्यें खरें नातें उत्पन्न झालेलें असून त्याची पालवी आमच्या घराच्या प्रत्येक भागाला चिकटलेली आहे. मोठ्या राणीला जेव्हां मीं मजबरोबर येण्याची तयारी करतांना पाहिलें तेव्हां घरांतल्या या सर्व बंधनांना मुळापासून धक्का बसलासें वाटलें.

आपल्या रोजच्या संवयी, आंत आल्यापासून आजपर्यंत कधीं न सोडलेलें खुद्द आपलें घर, इत्यादि सर्व वस्तु टाकून देऊन ती एका अज्ञात ठिकाणीं यावयास कां तयार झाली याचें कारण मला स्पष्ट दिसत होतें. आणि हेंच खरें कारण आपल्या तोंडन बाहेर पडं नये—तें सोडून दुसऱ्याच कांहीं

क्षुद्र सबबी सांगाव्या—असे तिचे प्रयत्न चालले होते.

जगांत तिला हें एवढेंच नातें शिल्लक होतें; आणि त्या बिचाऱ्या अपत्यरहित विधवेनें अत्यंत नाजूकपणानें तें आपल्या हृदयांत सांठवून ठेवलें होतें. मी त्या तिच्या अस्ताव्यस्त पेटया, गांठोडीं, वगैरेमध्यें जेव्हां जाऊन उभा राहिलों तेव्हांच मला, आमच्या एकमेकांच्या दूर होण्यानें तिच्या मनाला काय वाटलें असतें याची योग्य कल्पना आली.

आणि मला एकदम दिसून आलें कीं, पैशांच्या बाबतींत विमलशीं जें तिचें जुळत नसे तें माझ्या सांसारिक नीचपणामुळें नव्हे; तर आपल्या या नात्यांत दुसरीच एक बाहेरची स्त्री हात घालते म्हणून. प्रत्येक वेळीं तिला दुःख होई, परंतु तक्रार करण्याचा तिला हक्क नव्हता.

आणि विमल ? तिलाही असें वाटे कीं, आमचा संबंध फक्त सामाजिक नात्यापुरता नसून जास्त खोल आहे. आमच्या लहानपणापासून जडलेल्या या संबंधाबद्दल तिला मत्सर वाटे.

आज माझें हृदय माझ्या छातीच्या द्वाराशीं धडपडूं लागलें. मी एका पेटीवर पडून म्हणालों, "वहिनी, तुझी माझी या घरांत पहिली भेट झाली त्या काळांत पुन्हां एकदां प्रवेश करावा असें मला किती वाटतें !"

"छे, छे ! भावोजी, मला माझें आयुष्य पुन्हां पहिल्यापासून— स्त्री म्हणून—घालविण्याची इच्छा नाहीं. माझ्या नशिबांत भोगावयाचें होतें तें एवढ्या जन्मांतच संपू

दे. मला तें पुन्हां सहन करवणार नाहीं."

"परंतु दुःख भोगून जें स्वातंत्र्य आपल्याला मिळतें तें त्या दुःखापेक्षां मोठें नाहीं काय?"

"तुम्हां पुरुषांच्या बाबतींत तसें असेल. स्वातंत्र्य तुमच्यासाठीं आहे. बंधनें आमच्यासाठीं आहेत. आम्ही स्वतःच होऊन बंधनांत राहतों. छे, छे! तुम्ही आमच्या कष्टांतून मोकळे होऊं शकणार नाहीं. तुम्हांला पंख पसरून उडावयाचें असेल तर आम्हांला बरोबर घेऊनच हिंडलें पाहिजे. आम्ही कधींच मागें राहणार नाहीं. म्हणून मीं ही सगळी बांधाबांध केली आहे. पुरुषांना अगदीं कांहींच वजनाशिवाय धावूं देणें ठीक नाहीं."

"तुमच्या शब्दांचें वजन मला चांगलेंच जाणवत आहे," मी हंसून म्हणालों; "आणि तुमच्या ओझ्याविषयीं आम्ही तक्रार करीत नाहीं याचें कारण त्याबद्दल तुम्ही आम्हांला भरपूर मोबदला देतां हें होय."

"आमचें ओझें लहान लहान अशा पुष्कळ वस्तूंनीं भरलेलें असतें म्हणून तुम्ही तें वाहून नेतां. एखाद्या वस्तूला तुम्ही टाकून देऊं म्हणाल तर त्यांपैकीं प्रत्येक मी हलकी आहें म्हणून सबब सांगेल. आणि अशा पुष्कळ हलक्या वस्तूंनीं आम्ही तुम्हांला दडपून टाकतों. —केव्हां निघावयाचें आपल्याला?"

"गाडी साडेअकरा वाजतां सुटते. आपल्याला पुष्कळ वेळ मिळेल."

" इकडे पहा भावोजी, आजचा दिवस तुमचा. हट्टीपणा सोडा आणि दोनप्रहरीं एक लांबलचक झोंप काढा. गाडींत तुम्हांला मुळींच झोंप येत नाहीं. तुम्ही इतके वाळले आहांत कीं केव्हां कुठें पडाल याचा नेम नाहीं. चला, प्रथम आंघोळ करा पाहूं. "

आम्ही आमच्या स्नानगृहाकडे जात होतों तों खेमा आली आणि फाजील विनयानें पदर तोंडावरून ओढून, " पोलीस इन्स्पेक्टर एका कैद्याला घेऊन आले असून महाराजांची वाट पाहत आहेत, " असें म्हणाली.

" महाराज काय चोर आहेत कीं दरवडेखोर आहेत म्हणून त्यांच्या मागें पोलिसांनीं एकसारखें लागावें! महाराज स्नान करीत आहेत म्हणून फौजदाराला सांग जा. " मोठी राणी म्हणाली.

" मला जाऊन काय गोष्ट आहे ती पाहूं दे. विशेष जरूरीची असेल ती कदाचित, " मीं म्हटलें.

" छे! छे! " मोठी राणी हट्टानें म्हणाली. " काल धाकट्या राणीसाहेब रात्रीं खूप करंज्या करीत बसल्या होत्या. त्यांतल्या कांहीं त्या फौजदाराला पाठवून तुम्ही येईपर्यंत मी त्याला गप्प करतें. " असें म्हणून तिनें मला स्नानगृहांत ढकललें आणि बाहेरून दार लावून घेतलें.

असल्या जुलुमाला विरोध करण्याचें मला सामर्थ्य नव्हतें. करंज्या खाऊन फौजदार घालवील वेळ. कामाकडे थोडें दुर्लक्ष झालें तर काय हरकत आहे ?

गेले थोडे दिवस पोलीस मोठ्या धामधुमींत होते. आज याला पकड, उद्यां त्याला पकड, असा त्यांचा धडाका चालला होता. माझ्या खोलींतील लोकांचा उत्साह जागृत ठेवण्यासाठीं रोज ते कोणा तरी निरपराधी मनुष्याला धरून घेऊन येत. आज एक असाच कोणी कमनशिबी प्राणी आणला असेल असें मला वाटलें. मग फक्त फौजदारालाच एकट्याला करंज्या काय म्हणून? तें कांहीं चालणार नाहीं! असें मनांत म्हणून मी जोरजोरानें दार खडबडवूं लागलों.

माझी भावजय वाटेंतूनच म्हणाली, "तुम्हांला जर वेडाचा झटका येणार असेल तर लौकर गार पाणी डोक्यावर ओतून घ्या. त्यानें तुमचें मस्तक शांत राहील."

मी मोठ्यानें ओरडलों, "दोघांनाही करंज्या पाठवा. ज्याला चोर म्हणून आणला आहे तोच कदाचित त्या करंज्यांना जास्त योग्य असेल. त्याला म्हणावें अगदीं पोटभर खा."

२

मीं घाईघाईनें स्नान आटोपलें. बाहेर आलों तों जवळच विमल जमीनीवर बसली होती. ही माझी पूर्वींचीच विमल काय? अभिमानी, रागीट विमल हीच काय? अशा तऱ्हेनें दाराशीं बसून तिला काय बरें मागावयाचें होतें?

मी थोडा वेळ थांबल्याबरोबर ती उभी राहून जमीनीकडे पाहत हळूच म्हणाली, " मला आपल्याशीं थोडें बोलावयाचें आहे. "

" तर मग आंत ये, " मी म्हणालों.

" पण आपण कांहीं विशेष कामाला जात आहां काय ? "

" जात होतों, पण असूं दे. प्रथम मला तुझें—"

" नको; आपलें कामच प्रथम होऊं द्या. आपण जेवण झाल्यावर बोलूं. "

मी माझ्या बैठकीच्या खोलींत गेलों तों फौजदाराचें खाणें आटोपलें होतें. परंतु त्यानें बरोबर आणलेला मनुष्य मात्र अद्याप खातच होता.

" आं ! " मीं चकित होऊन म्हटलें. " अमूल्या, तूं ?"

" होय, मीच तो महाराज, " अमूल्य तोंडांत करंजी असतांनाच म्हणाला. " मला अगदीं मोठी मेजवानीच झाली. आणि तुमची हरकत नसेल तर उरलेल्या या करंज्या मी बांधून घेतों. " त्यानें उरलेल्या सगळ्या करंज्या हातरुमालांत बांधल्या.

" याचा अर्थ काय ? " मीं फौजदाराकडे आश्चर्यानें टक लावून म्हटलें.

फौजदार हंसून म्हणाला, " चोराचें कोडें सोडविण्याच्या आम्ही जसें जवळ येऊं पाहत आहों तसें चोरीचें गूढ जास्तच खोल जात चाललेलें आहे. "

मग त्यानें हातरुमालांतून कायसेंसें सोडलें. पाहतों तों

नोटांचें पुडकें. " हे तुमचे सहा हजार रुपये महाराज," तो म्हणाला.

" कोठें सांपडले हे ?"

" अमूल्यबाबूंच्या हातीं. काल चाकुत्रा दुय्यम कचेरींत जाऊन पैसे सांपडले असें ते तेथील खजीनदाराला सांगूं लागले. खजीनदाराला, पैसे गेले त्या वेळेपेक्षां ते सांपडले हें ऐकूनच जास्त धडकी भरली. स्वतःच नोटा नेऊन आतां कांहींतरी बनावट हकीकत सांगतो असा आपल्यावर संशय येईल असें वाटून, चहा वगैरे घेऊन येतों, बसा, असें अमूल्याला खोटेंच सांगून तो तडक पोलीसठाण्यावर आला. त्याची ती हकीकत कशीही असो, मी मात्र लगेच घोडयावरून तेथें गेलों आणि अमूल्याला मजकडे घेऊन आलों. आज सकाळपासून मी त्याच्याच पाठीशीं आहें. आपल्याला पैसे कोठें मिळाले हें तो सांगत नाहीं. तें सांगेपर्यंत तुला अटकेंत ठेवूं अशी मीं त्याला धमकी दिली. 'तर मग मला खोटें बोलावें लागेल,' तो म्हणाला. 'कांहीं हरकत नाहीं,' मी म्हणालों. मग त्यानें सांगितलें कीं, एका झुडुपाखालीं सांपडले ते. 'कोठलें झुडूप ? तूं कशाला तेथें गेला होतास ? असे त्यांत अनेक प्रश्न आहेत; खोटें बोलणें तितकें सोपें नाहीं अमूल्य,' मीं म्हटलें. 'जाऊं द्या हो. पुष्कळ वेळ आहे आपल्याला हकीकत बनवावयाला.' तो म्हणाला."

" परंतु फौजदार साहेब, अशा सभ्य आणि सन्मान्य तरुण

गृहस्थाला तुम्ही असा कां त्रास देत आहां ? "

" त्याला त्रास देण्याची माझी इच्छा नाहीं. तो सभ्य तरुणच नव्हे, तर माझा लंगोटियार मित्र निवारणबाबू याचा तो मुलगा आहे. काय झालें आहे तें मी आपणांला सांगतों महाराज. अमूल्याला चोर माहीत आहे. परंतु संशय आपल्यावर घेऊन त्याला वांचविण्याचा त्याचा विचार आहे. अशाच प्रकारच्या धाडसाच्या कामांत त्याला मौज वाटते. महाराज, आतां खरा चोर सुटणार. परंतु या सगळ्याच्या मुळाशीं कोण आहे हें मी आतां सांगूं शकेन. "

" कोण आहे ? " मीं विचारलें.

" तो कारभारी आणि त्याला मदतगार तो कासीम. "

आपलें हें म्हणणें आपल्याला हवें तसें मांडल्यावर फौजदार निघून गेला. तेव्हां मीं अमूल्याला विचारलें, " पैसे कोणीं घेतले हें जर तूं मला सांगशील तर त्याला मुळींच धक्का लागणार नाहीं असें मी वचन देतों. "

" मींच घेतले, " तो म्हणाला.

" पण असें कसें ? सशस्त्र लोकांच्या टोळीविषयीं मग—"

" मी फक्त एकटाच होतों. कारभारी नुकताच जेवून उठून हात धूत होता. त्या जागीं थोडासा काळोख होता. माझ्या प्रत्येक खिशांत एक अशीं दोन पिस्तुलें होतीं. पैकीं एकांत पोकळ बार होते आणि एकांत खरे बार होते. मीं तोंडावर बुरखा घेतला होता. मीं माझ्या विजेच्या दिव्याचा प्रकाश कारभाऱ्याच्या डोळ्यांवर झटकन पाडला आणि एक

बायबार काढला. तो बिचारा मूर्छित पडला. पहाऱ्यावर नसलेले कित्येक लोक धांवतच आले; पण मीं पुन्हां एक बायबार काढतांच ते पळून गेले. कासीम पहाऱ्यावर होता; तो एक दंडुकें घेऊन आला. तेव्हां मीं त्याच्या पायावर गोळी झाडली आणि तो जमीनीवर पडला. मी मग त्या थरथर कांपणाऱ्या कारभाऱ्याला बरोबर घेऊन गेलों आणि त्याजकडून तिजोरी उघडवून ६००० रुपये काढून घेतले. मग तेथल्याच एका घोडयावर बसून मी बराच वेळ दौडत आलों व घोडा वाटेंतच सोडून इकडे आलों."

"हें एवढें तूं कां केलेंस अमूल्य?" मीं विचारलें.

"तसेंच महत्त्वाचें कारण होतें महाराज!"

"मग तूं ते परत कां नेऊन ठेवीत होतास?"

"जिच्या आज्ञेवरून मीं तसें केलें तिला येऊं द्या. मग मी सगळें कांहीं उघड करून सांगेन."

"आणि ही 'ती' कोण बरें?"

"माझी बहीण धाकटी राणी."

विमलला मीं बोलावूं पाठवलें. ती डोक्यावर एक पांढरी शाल घेऊन अनवाणी भीत भीत आली. मीं विमलला अशी कधींच पाहिली नव्हती. तिनें प्रभातकाळचा प्रकाश पांघरला आहेसें मला वाटलें.

अमूल्यानें तिला साष्टांग नमस्कार घातला आणि तिच्या पायाची धूळ कपाळाला लावली. नंतर उठून तो म्हणाला, "ताई, तुझ्या म्हणण्याप्रमाणें झालें आहे. पैसे

परत गेले."

"भाऊ, तूं मला वांचविलें आहेस." तिनें उत्तर दिलें.

अमूल्य पुढें म्हणाला, "तुझी मूर्ति हृदयांत असल्यामुळें मीं एक चकार शब्द सुद्धां खोटा सांगितला नाहीं. 'वंदे मातरम्' हा परवलीचा शब्द मीं तुझ्या पायांवर अर्पण केला हें चांगलेंच झालें. राजवाड्यांत आल्याबरोबर मला तुझा प्रसादही मिळाला."

विमलला त्याचें शेवटचें वाक्य न समजून ती त्याजकडे शून्यदृष्टीनें पाहूं लागली. अमूल्यानें आपला हातरुमाल बाहेर काढला आणि तो सोडून आंतील करंज्या त्यानें तिला दाखविल्या. "मीं त्या सगळ्या खाल्ल्या नाहींत. तूं स्वतः वाढल्यावर मग खाण्यासाठीं त्या मीं ठेवल्या आहेत," तो म्हणाला.

आपण येथें राहण्याची कांहीं जरूरी नाहीं असें पाहून मी निघून गेलों. मला आपला नुसता उपदेश करतां येतो आणि म्हणूनच माझी प्रतिमा जाळली जाण्याचें मला बक्षीस मिळालें. मला अजून एकही आत्मा मृत्यूपासून सोडवितां आला नाहीं. ज्यांच्या आंगांत सामर्थ्य आहे ते लोक नुसत्या खुणेनें हें काम करतात; माझ्या शब्दांच्या आंगीं तसली अनुपमेय शक्तीच नाहीं. मी कांहीं अग्निज्योति नव्हे, तर विझलेला कोळसा आहें. मला दीप लावतां येत नाहीं. हीच माझ्या आयुष्याची हकीकत—माझ्या

दीपांची रांग

मी हळू ह
खोलीकडेच अं
तरी जीविता
जीविताच्या य
दिवशीं मला अ
अस्तित्वाचें खो
नाहीं; त्याचें
मी माझ्या
बाहेर येऊन
उशीर होणा
जेवणाची वर्दी
"तेवढ्या
ठेवूं या."
आम्ही ति
लागला का
तिला ६००
सांगावेंसें वा
आहे,' मीं
कपड्यांच्या

दीपांची रांग विनपेटलेलीच आहे.

३

मी हळू हळू अंतर्गृहांत गेलों. मी मोठ्या राणीच्या खोलीकडेच ओढला जात असलों पाहिजे. दुसऱ्या कोणाच्या तरी जीविताच्या वीणेंतील एखादी तरी तार माझ्या जीविताच्या योगानें छेडली गेली आहे असें वाटण्याची त्या दिवशीं मला अत्यंत जरूरी भासूं लागली होती. आपल्या अस्तित्वाचें खरें चीज आपल्याला आपल्यांतच गुरफटवून होत नाहीं; त्याचें चीज बाह्य प्रदेशांतच शोधावें लागतें.

मी माझ्या भावजईच्या खोलीवरून जात होतों तोंच ती बाहेर येऊन म्हणाली, "मला वाटलें आज सुद्धां तुम्हांला उशीर होणार. परंतु तुमची चाहूल लागतांक्षणींच मीं जेवणाची वर्दी दिली. एका क्षणांत वाढून येईल."

"तेवढ्या वेळांत आपण तुमचे पैसे काढून जवळ घेऊन ठेवूं या."

आम्ही तिकडे जातां जातां 'दरवड्याचा कांहीं तलास लागला का?' असें तिनें मला विचारलें. मला कांहीं तिला ६००० रुपये परत कसे आले या संबंधीं सगळें सांगावेंसें वाटेना. 'तीच तर सगळी भानगड चालली आहे,' मीं कांहींतरी उत्तर दिलें.

कपड्यांच्या खोलींत जाऊन किल्ल्यांचा जुडगा काढला

तों त्यांत तिजोरीची किल्ली नाहीं. किती निष्काळजी मनुष्य मी खरोखर ! त्याच दिवशीं सकाळीं मीं पेट्या आणि कपाटें उघडलीं पण ती किल्ली नाहीं हें कांहीं मला समजून आलें नाहीं.

" काय झालें तुमच्या किल्लीचें ? " मोठ्या राणीनें विचारलें.

मी या खिशांत, त्या खिशांत, असा धुंडाळूं लागलों; पण उत्तर मात्र कांहीं दिलें नाहीं. त्याच त्याच ठिकाणीं मीं पुन्हां पुन्हां शोधून पाहिलें. मग आम्हांला वाटलें कीं, किल्ली कांहीं हरवली नाहीं; कोणीं तरी घेतली असली पाहिजे. कोण घेणार ? खोलींत दुसरें कोण आलें असणार ?

" जाऊं द्या सध्यां तें, " मोठी राणी म्हणाली. " प्रथम तुम्ही जेवून घ्या. तुमचा हा विसरभोळेपणा पाहून धाकट्या राणीसाहेबांनीं ती आपल्या स्वतःजवळ ठेवली असेल. "

परंतु माझ्या हृदयांत खूप गडबड झाल्याखेरीज राहिली नाहीं. मला सांगितल्याखेरीज माझ्या किल्ल्यांना हात लावण्याची विमलला कधीं संवय नव्हती. विमल त्या दिवशीं माझ्या जेवण्याच्या वेळीं हजर नव्हती; ती तिकडे अमूल्याला जेवूं घालण्यांत गुंतली होती. मोठी राणी तिला बोलावूं पाठवणार होती, परंतु मीं नको म्हटलें.

माझें जेवण नुकतेंच संपलें होतें, इतक्यांत विमल आंत आली. किल्लीची गोष्ट तिजजवळ मोठ्या राणीच्या समक्ष

काढूं नये असें मला वाटलें; परंतु तिला पाहिल्याबरोबर मोठ्या राणीनें विचारलें, " तिजोरीची किल्ली कोठें आहे, माहीत आहे तुम्हांला गडे ? "

" मजजवळ आहे, " उत्तर मिळालें.

" मीं नाहीं म्हटलें ? " मोठी राणी विजयोत्साहानें म्हणाली. " आमच्या धाकट्या राणीसाहेब दरवड्याची आपल्याला भीति वाटत नाहीं असें दाखवितात; परंतु त्यांची आपली आडून सावधगिरी असतेच. "

विमलचा चेहरा पाहून माझ्या मनांत भलतीच शंका आली. " असूं दे ती किल्ली आतां—संध्याकाळीं काढीन मी पैसे. " मीं म्हटलें.

" मीं ते आधींच काढून घेतले आहेत, " विमल म्हणाली.

मी आश्चर्यानें मूढ झालों.

" कोठें ठेवले आहेत ते तुम्हीं ? " मोठ्या राणीनें विचारलें.

" मीं ते खर्च केले. "

" ऐका तर खरें ! कशाला खर्च केलेत एवढे पैसे तुम्हीं बाई ? "

विमलनें उत्तर दिलें नाहीं. मींही तिला पुढें कांहीं विचारलें नाहीं. विमलला कांहीं तरी टोमणा मारण्याचा मोठ्या राणीचा बेत दिसला; परंतु आपलें मन आवरून धरून ती म्हणाली, " एकंदरींत हें सगळें ठीकच आहे. अगदीं असेंच मी तिकडच्या मोकळ्या शिलकेचें

करीत असें. तिकडच्या जवळ ती राहूं देण्यांत कांहीं अर्थ नव्हता—तिकडच्या भोंवतीं फिरणारे सगळे उपटसुंभ त्या पैशांचे मालक व्हावयाचे हें मला ठाऊक होतें. तुम्ही पण भावोजी जवळजवळ तसेच ! तुम्हां पुरुषांना पैसे खर्च करण्याचे किती तरी मार्ग माहीत असतात. आम्ही स्त्रिया ते स्वतःच चोरून राखावयाचे कसे हें जाणतों. चला आतां. प्रथम निजा कसे. ”

मोठ्या राणीनें मला माझ्या शय्यागृहाकडे नेलें; परंतु मी कोठें जातों आहें हें कांहीं मला कळेना. मी निजल्यावर माझ्या उशाशीं बसून ती हंसून विमलला म्हणाली, “ धाकट्या राणीसाहेब, मला एखादें तुमच्यापैकीं पान द्या पाहूं.—काय ? तुमच्या जवळ मुळींच नाहीं ? तुम्ही अगदीं बाई पक्क्या मडमसाहेब बनलां आहां ! तर मग माझ्या खोलींत कोणाला तरी धाडा. ”

“ परंतु तुम्ही जेवलां का ? ” मीं काळजीनें विचारलें.

“ केव्हांच ”—तिनें धडधडीत खोटें उत्तर दिलें—आणि ती माझ्या उशाशीं गप्पा मारीत बसली.

एक दासी येऊन म्हणाली, “ महाराणी, तुमचें पान वाढलेलें गार होऊन चाललें आहे. ” पण विमलचा उठण्याचा बेत दिसेना.

“ अजून जेवण नाहीं ? काय चमत्कारिकपणा हा ! किती भयंकर उशीर ! ” असें म्हणून मोठ्या राणीनें विमलला हात धरून नेलें.

हे सहा हजार आणि त्या दरवड्याचे सहा हजार यांत कांहीं तरी संबंध आहे हें मीं ताडलें. परंतु त्याबद्दल चौकशी करण्याची मला मुळींच उत्सुकता नव्हती. कधींही त्याविषयीं विचारावयाचें नाहीं असा मीं निश्चय केला.

भवितव्यता आमचें जीवित सांच्यांतून खडबडीतच बाहेर काढते; हेतु हा कीं, शेवटचा सफाईचा हात त्यावर आम्हींच द्यावा; आणि आमच्या रुचीप्रमाणें त्याला कायमचें स्वरूप द्यावें. स्रष्ट्यानें आंखलेल्या मार्गानें माझ्या जीविताला आकार-स्वरूप-देत असतां कांहीं तरी एखाद्या मोठ्या कल्पनेला मूर्त स्वरूप द्यावें अशी माझ्या मनांत एकसारखी इच्छा जागृत आहे. याच प्रयत्नांत मी सर्व आयुष्य खर्च करीत आलों आहें. मीं माझ्या आशा-इच्छा-किती निष्ठुरपणानें दाबल्या, पावलोपावलीं स्वतःचें संयमन कसें केलें, हें त्या एकट्या अंतरात्म्यालाच ठाऊक.

परंतु अडचण अशी आहे कीं, मनुष्याचें जीवित हें त्याचें एकट्याचें नसतें. ज्या कोणाला कोणतीही गोष्ट उत्पन्न करावयाची असेल त्याला आपल्या सभोंवतालच्या परिस्थितीची मदत ही घेतलीच पाहिजे; नाहीं तर त्याला यश येणें नाहीं. आणि म्हणून स्वतःला आकार देण्याच्या या कामांत विमलला मदतीस ओढण्याचें माझें नेहमीं मनोराज्य चाले.

माझें तिच्यावर आत्यंतिक प्रेम होतें; त्या प्रेमाच्या जोरावर तिला माझ्याकडे वळविण्यांत यश आलेंच पाहिजे असा मला दृढ भरंवसा होता.

मग मला असें आढळून आलें कीं, ज्यांना आपल्याला आकार प्राप्त करून घेण्याचे कामीं सभोंवतालच्या परिस्थितीला सहज आणि स्वाभाविक तऱ्हेनें मदतीस ओढतां येतें, अशा मनुष्यांचा वर्ग निराळा आणि माझा वर्ग निराळा आहे. माझ्या आंगीं जीवनाला आवश्यक असा तेजःकण होता, परंतु तो दुसऱ्याला देण्याची शक्ति माझ्या आंगीं नव्हती. मीं आपलें सर्वस्व ज्यांना अर्पण केलें त्यांनीं माझ्या सर्वस्वाचा स्वीकार केला, परंतु माझा मात्र स्वीकार केला नाहीं. अगदीं आतांच मला मदतनिसाची जरूर आहे. परंतु याच वेळीं माझा मी एकटा पडलों आहें. तरी पण मी अशी प्रतिज्ञा करतों कीं, या परीक्षेंत सुद्धां मी यशस्वी होईन आणि मग माझा कांटेरी मार्ग माझ्या आयुष्याचा प्रवास संपेपर्यंत मी एकटाच आक्रमीन.

मला असा संशय येऊं लागला आहे कीं, माझ्या आंगांत इतके दिवस सर्व काळ जुलमाची वृत्ति जागृत होती. विमलेच्या व माझ्या संबंधाला कठीण, स्पष्ट आणि पूर्ण स्वरूप देण्याच्या माझ्या प्रयत्नांत अधिकार भरलेला होता. परंतु मनुष्याचें आयुष्य हें सांच्यांत घालून काढण्याकरितां नाहीं; आणि जगांतील मंगल तत्त्वाला जर आपण व्यावहारिक वस्तु समजून आकार देऊं लागलों, तर तर तें स्वतःच विलीन होऊन आपला सूड घेतें.

इतके दिवस आम्ही एकमेकांपासून दूर दूर जाण्याचें कारण माझा जुलूम, हें मला कळलें नाहीं. वरील माझ्या

दाबामुळें विमलेच्या जीविताला आपल्या वास्तविक पातळीवर येतां आलें नाहीं, आणि त्यामुळें त्याला बाहेर पडण्याला आपल्या बांधाच्या खालून फोडून मार्ग काढावा लागला. कित्येक गोष्टींत मी तिचें मुळींच ऐकत नाहीं असें तिला वाटल्यामुळें माझ्याजवळ तिला उघड बोलतां येईना; म्हणून तिला ते सहा हजार रुपये चोरावे लागले.

एकाच कल्पनेला जखडून बसलेल्या माझ्यासारख्या लोकांचें, आपल्याशीं ज्यांचें जुळेल तेवढ्याच लोकांशीं ठीक जमतें. परंतु ज्यांचें आमच्याशीं जुळत नाहीं त्यांना आम्हांला फसवूनच आम्हांबरोबर वागावें लागतें. आमच्या दुराग्रही हटवादीपणामुळें अगदीं साध्या लोकांना सुद्धां कुटिल मार्गानें जावें लागतें. स्त्रियांना आम्ही आयुष्यांतील मदतगार करण्याचा प्रयत्न करतों; परंतु त्यामुळें त्यांच्या हृदयांतील गृहिणीत्वाची नाजूक भावना मात्र नाहींशी केल्याचें फळ आमच्या पदरांत पडतें.

मला पुन्हां सुरुवातीला जातां आलें असतें तर? मग मात्र मीं सरळ मनुष्यांचाच मार्ग अनुसरला असता. माझ्या कल्पनांच्या बेड्यांनीं मीं माझ्या सहचारिणीला जखडून टाकण्याचा प्रयत्न केला नसता; तर माझ्या प्रेमाचा आनंदपूर्ण वेणु वाजवून म्हटलें असतें, "तूं माझ्यावर प्रेम करतेस? मग आपल्या प्रेमाच्या जोरावरच तूं आपलें सत्स्वरूप जाण. माझ्या कल्पना दडपून जाऊं देत; परंतु तुला उत्पन्न करण्यांत ईश्वराचा जो

हेतु आहे तोच सिद्ध होऊं दे."

परंतु आमच्या परस्पर मतभेदामुळें आम्हांला ज्या बाहेर दिसणाऱ्या जखमा झाल्या आहेत त्या सृष्टिदेवीच्या काळजीपूर्वक शुश्रूषेनें तरी बऱ्या होणें शक्य आहे काय? सृष्टींतील गूढ शक्ति ज्या आवरणाच्या आड आपला प्रभाव पाडीत असतात तें आवरण फाटून गेलें आहे. जखमा बांधाव्या लागतात. आमच्या जखमा प्रेमानें बांधतां येऊन त्यांची खूण कधीं सुद्धां दिसणार नाहीं असा दिवस उगवेल काय? पण आतां वेळ गेली नाहीं काय? चुका करतां करतांच किती काळ गेला आहे. चुका कळून येण्यास इतके दिवस लागले; आतां त्या दुरुस्त होईपर्यंत आणखी किती काळ जाणार आहे कोण जाणे! समजा, जखम कधींच बरी झाली नाहीं, तर तिनें केलेला नाश तरी भरून येईल काय?

अशा विचारांत मी गुंगलों होतों इतक्यांत दाराच्या बाजूस थोडासा आवाज ऐकूं आला. मीं वळून पाहिलें तों विमलची दारांतूनच मागें परतणारी आकृति मला दिसली. आंत जावें कीं न जावें याचा विचार करीत ती उभी राहिली असावी आणि शेवटीं परत जाण्याचें तिनें ठरविलें असावें. मी एकदम उठलों आणि दाराशीं जाऊन हांक मारली, "विमल!"

ती चालावयाची थांबली. तिची पाठ मजकडेच होती. तिजपाशीं जाऊन मीं तिचा हात धरला आणि तिला आमच्या खोलींत नेलें. तिनें आपलें तोंड एका उशींत खुपसलें आणि

स्फुंदस्फुंदून रडण्यास आरंभ केला. कांहीं न बोलतां मी तिचा हात धरून तिच्या उशाशीं बसलों.

तिच्या दुःखाचें वादळ शांत झाल्यावर ती उठून बसली. मीं तिला माझ्या छातीशीं ओढण्याचा प्रयत्न केला, परंतु तिनें माझे हात दूर सारले आणि ती माझ्या पायांशीं गुडघे टेकून बसली व एकसारखें आपलें डोकें लववून नमस्कार करूं लागली. मीं पटकन आपले पाय मागें घेतले; परंतु ते हातांत वट्ट धरून ती रडत रडत घोगऱ्या आवाजानें म्हणाली, "छे! छे! छे! गडे पाय दूर करूं नयेत. मला माझी पूजा करूं दे."

मी स्तब्ध राहिलों—मी तिला कोण थांबविणार? काय ती वास्तविक माझी पूजा करीत होती—कारण परमेश्वर कांहीं मी नव्हे—म्हणून मला संकोच वाटावा?

## प्रकरण अठरावें

### विमलेची आत्मकथा

चला !

ज्या ठिकाणीं प्रेम आणि भक्ति यांचा संगम होतो तेथें जाण्याची आतांच वेळ आहे. त्या संगमाच्या शुद्ध नील वर्णांत त्याचा सर्व गढूळपणा बुडून जाऊन अदृश्य होतो.

आतां मला कसलीच भीति वाटत नाहीं—माझी नाहीं अथवा दुसऱ्याही कोणाची नाहीं. मीं अग्निदिव्य केलें आहे. जळण्याजोगें होतें त्याची राख झाली आहे. आतां राहिलें आहे तें अमर आहे. आपल्या दुःखाच्या पोकळींत ज्यानें माझें पाप मावबून घेतलें त्याच्या पायांशीं मीं आपलें जीवित अर्पण केलें आहे.

आज रात्रीं आम्ही कलकत्त्याला जाणार आहों. माझ्या अंतस्तापामुळें मला माझ्या प्रवासाची तयारी आतांपर्यंत करवली नाहीं. आतां मला सगळी बांधाबांध केली पाहिजे.

थोड्या वेळानें माझ्या पतींनीं येऊन माझ्यासाठीं बांधाबांध

करण्यास सुरवात केली.

" हें ठीक नाहीं गडे, " मीं म्हटलें. " झोंप घेण्याचें आतांच आपण मजजवळ कबूल केलें ना ? "

" मीं तसें कबूल केलें असेल, " त्यांनीं उत्तर दिलें. " परंतु झोंपेनें कांहीं कबूल केलें नव्हतें. ती कोठें सांपडेचना. "

" छे ! छे ! " मीं पुन्हां म्हटलें. " हें नाहीं चालणार. थोडा वेळ तरी पडावेंच ! "

" पण तुला एकटीला हें सगळें कसें आटपेल ? "

" आटपेल कसें तरी. "

" बरें बोवा. माझ्याशिवाय तुझें चालेल असें तूं खुशाल म्हण. परंतु मी उघडच म्हणतों कीं, तुझ्याशिवाय कांहीं माझें चालावयाचें नाहीं. झोंप सुद्धां मी खोलींत एकटा होतों म्हणून मजजवळ आली नाहीं. "

पण या आमच्या प्रेमसंवादांत एका गड्यानें येऊन बिघाड केला. संदीपबाबू आले असून त्यांनीं तसें कळवावयाला सांगितलें आहे असें तो म्हणाला.

त्यांना कोणाला भेटावयाचें आहे हें विचारण्याचा मला धीर झाला नाहीं. लाजाळूच्या पानाप्रमाणें आकाशांतील प्रकाश एकदम मिटल्यासारखें मला वाटलें.

" चल विमल, " ते म्हणाले. " संदीप काय म्हणतो तें ऐकूं या. आपला निरोप घेऊन गेल्यावर ज्या अर्थी तो आला आहे त्या अर्थी त्याला तसेंच कांहीं विशेष

सांगावयाचें असेल."

थांबून जास्तच कसेंसें वाटलें असतें म्हणूनच मी गेलें. संदीपबाबू भिंतीवरील एका चित्राकडे टक लावून पाहत होते. आम्ही आंत शिरल्याबरोबर ते म्हणाले, "हा फिरून कशाला आला असें तुम्हांला वाटत असेल. परंतु सर्व मंत्रतंत्र संपविल्याखेरीज भूत गाडलें जात नाहीं." असें म्हणून त्यांनीं हातरुमालांत बांधलेलें कांहींसें काढलें. सोडलें तो आंत त्या गिन्या होत्या.

"निखिल, माझ्याविषयीं भलतीच कल्पना करून घेऊं नको." ते म्हणाले. "तुझ्या संपर्कानें मी एकाएकीं सत्त्वस्थ—प्रामाणिक—बनलों अशी तूं कल्पना करून घेऊं नको. वाईट तऱ्हेनें मिळविलेले पैसे कांहीं पश्चात्तापानें द्रवून आणून देण्याला हा संदीप आलेला नाहीं, तर—"

त्यांनीं आपलें भाषण अर्धेंच ठेवलें. थोडशा वेळानें पतींकडेच पाहत ते मला म्हणाले, "मधुराणी, माझ्या आजपर्यंत कशालाही न भिणाऱ्या सदसद्विवेकबुद्धींत इतक्या दिवसांनीं पश्चात्तापाला वाव मिळाला आहे. माझी पहिली झोंप झाल्यावर मला त्याच्याशीं रोज झगडावें लागतें. तेव्हां त्याला माझ्या कल्पनेचा वारु म्हणतां येत नाहीं. त्याचें ऋण फेडल्याशिवाय खुद्द माझी सुद्धां सुटका नाहीं. तर मग त्याच भुताच्या स्वाधीन मला हें सर्व परत करूं दे. देवी, या सर्व जगांत फक्त तुझ्यापासून मला कांहीं घेऊन जाववत नाहीं. मी कफल्लक बनल्याखेरीज माझी तुझ्यापासून सुटका

होणार नाहीं. हें परत घे ! ”

गिन्यांबरोबरच त्यांनीं जवाहिराची पेटी काढून टेबलावर ठेवली आणि ते चटकन तेथून निसटले.

“ संदीप, माझें थोडें ऐक— ” माझे पति ओरडले.

“ मला वेळ नाहीं निखिल. मुसलमानांना माझी फार किंमत वाटत असल्यामुळें मला लुटून आपल्या कबरस्तानांत पुरण्याचा त्यांनीं कट केला आहे. तेव्हां येथून निघून जाणें जरूर आहे असें मला वाटतें. उत्तरेकडे जाणारी गाडी पकडण्यास मला आतां फक्त पंचवीसच मिनिटें आहेत. तेव्हां आतां मला गेलें पाहिजे. पुन्हां चांगली संधि आली म्हणजे आपण पुष्कळ बोलूं. माझें ऐकशील तर तूं सुद्धां निघून जाण्यास विलंब करूं नको. मधुराणी ! मी तुला वंदन करतों. ”

संदीपबाबू धांवतच गेले. मी वेडयासारखी स्तब्ध राहिलें. हीं रत्नें आणि हें सोनें हीं किती क्षुद्र आहेत हें आतांच्याइतकें स्पष्टपणें मला कधींच कळून आलें नव्हतें. थोडयाच वेळापूर्वी बरोबर काय घ्यावें, त्याची कशी बांधाबांध करावी, याच्या मी केवढया धांदलींत होतें ! आतां मला कांहींच घेण्याची जरूरी नाहीं असें वाटलें. निघून चालतें होणें ही गोष्ट आतां महत्त्वाची होती. त्यांनीं जाग्यावरून उठून माझ्याकडे येऊन माझा हात धरला आणि म्हटलें, “ विमल, उशीर होत आहे; आपल्या प्रवासाची तयारी आटोपली पाहिजे. ”

याच वेळेस चंद्रनाथबाबू एकाएकीं आंत आले. आम्हां दोघांना एके ठिकाणीं पाहून ते प्रथम थोडेसे कचरले. परंतु लगेच ते म्हणाले, " माझे लहानगे माते, मी मध्यें येत आहें याबद्दल क्षमा कर.— निखिल, मुसलमान हातांतून गेले आहेत. ते हरीश कुंडूचा खजीना लुटीत आहेत. त्यांत कांहीं विशेष नाहीं. पण वाईट व असह्य गोष्ट ही कीं, त्याच्या घरांतील बायकांवर फार वाईट तऱ्हेनें जुलूम होत आहे. "

" मी निघालोंच तिकडे. " पति म्हणाले.

मीं त्यांच्या हाताला लोंबकळून म्हटलें, " आपण काय करणार गडे तेथें ? तुम्ही तरी तिकडे जाऊं नका म्हणून सांगा हो ! "

" माझे आई, दुसरें तिसरें कांहीं करावयास वेळ राहिलेला नाहीं. "

" विमल, भिऊं नको. " जातां जातां म्हणावयाचें झालें.

मीं खिडकींतून पाहिलें तों त्यांची स्वारी घोड्यावरून निःशस्त्रच दौडत चालली होती.

दुसऱ्याच क्षणीं मोठी राणी धांवत आंत आली. " काय केलेंत हें धाकट्या राणीसाहेब ! तुम्हीं त्यांना जाऊं कसें दिलेंत ? "

" दिवाणांना प्रथम बोलावून आण, " ती एका गड्याकडे वळून म्हणाली.

दिवाणापुढें राण्या कधींच उभ्या राहत नसत. परंतु

माझ्या जावेला आज तें कांहीं भान राहिलें नाहीं. दिवाण आल्याबरोबर ती म्हणाली, " महाराजांना परत आणण्यासाठीं प्रथम घोडेस्वार पाठवा एक. "

" आम्हीं त्यांना थांबण्याची पुष्कळ विनंति केली राणी आई; पण त्यांनीं परत फिरण्याचें नाकारलें. " दिवाणानें उत्तर दिलें.

" त्यांना असा निरोप पाठवा कीं, मोठी राणी आजारी आहे. अगदीं मरावयाला टेकली आहे. " माझी जाऊ भ्रमिष्टपणें ओरडली.

दिवाण निघून गेल्यावर त्या माझ्यावर एकदम उसळल्या. " राक्षसिणी ! तूंच स्वतः त्यांना पाठविण्याऐवजीं कां मेली नाहींस !——"

दिवसाचा प्रकाश अंधुक होऊं लागला. सूर्य अस्तास गेला. त्या दिवशींच्या सूर्यास्ताच्या समयींच्या आकाशाच्या छटा मला आज डोळ्यांपुढें दिसत आहेत. अस्तंगत होणाऱ्या बिंबाच्या दोनही बाजूंला जे दोन मोठमोठाले ढग आले होते त्यांमुळें बिंब पंख पसरलेल्या पक्ष्याप्रमाणें दिसत होतें. हा दुर्दैवी दिवस रात्ररूपी समुद्र ओलांडण्यासाठीं धांवत आहे असें मला वाटलें.

अंधार जास्त जास्तच वाढूं लागला. एखाद्या दूरच्या खेड्याला आग लागली म्हणजे तिच्या ज्वाळा जशा क्षितिजावर एकदां दिसतात, आणि नाहींशा होतात, व पुन्हां दिसतात, त्याप्रमाणें त्या अंधारांत दुरून कोठें तरी चाललेल्या

धुमश्चक्रीमधील आवाजाच्या लाटांवर लाटा अंधुकपणें ऐकं येऊन आकाशांत विलीन होत होत्या.

संध्याकाळच्या पूजेच्या घंटा देवळांत वाजूं लागल्या. मोठी राणी देवळांत हात जोडून स्तब्धपणें प्रार्थना करीत बसली होती हें मला माहीत होतें. परंतु मला खिडकींतून पाऊलभर सुद्धां हालवेना.

रस्ते, पलीकडचें खेडें आणि त्याच्याही पलीकडच्या वृक्षांच्या रांगा जास्त जास्तच अंधुक होऊं लागल्या. आमच्याच हद्दींतील तें तेजस्वी तळें आकाशाकडे लागलेल्या आंधळ्याच्या डोळ्याप्रमाणें दिसूं लागलें. डाव्या बाजूचा बुरूज कांहीं तरी गोष्ट घडत आहे ती पाहण्यासाठीं आपली मान लांब करीत आहेसा दिसला.

रात्रींच्या आवाजांत नानातऱ्हेच्या कल्पना निघतात. डहाळी खडबडते, आणि कोणी तरी जीव घेऊन पळत आहेसें आपल्याला वाटतें. दार करकरतें, आणि चकित झालेल्या जगाच्या हृदयाची ती धडधड आहेसें वाटतें.

त्या लांबच्या झाडांमध्यें दिवे एकाएकीं चमकत होते आणि पुन्हां नाहींसे होत होते. घोड्यांच्या टापा एकसारख्या ऐकूं येऊं लागल्या. आमच्या राजवाड्यांतून गेलेले ते घोडेस्वार होते.

मला आपलें एकसारखें वाटे कीं, मी मेलें म्हणजे ही सगळी दंगल बंद होईल. मी जिवंत आहें तोंपर्यंत माझीं दुष्कृत्यें जिकडेतिकडे नाश पसरवीत राहणारच.

मला माझ्या पेटींतलें पिस्तूल आठवलें. परंतु खिडकींतून तिकडे जावयाला माझे पायच हालत ना. तेथें माझ्या नशीबाचीच मी वाट पाहत बसलें नव्हतें काय ?

पहाऱ्यावरच्या घंटेंत गंभीरपणें दहांचे ठोके पडले.

थोड्याच वेळानें पुष्कळ दिवे लांब अंतरावर चमकूं लागले. आणि सर्पाप्रमाणें नागमोडी वाटेनें अंधारांतून मोठा थोरला जमाव येतांना मला दिसला.

आवाज ऐकल्याबरोबर दिवाण देवडीशीं गेले. लगेच एक घोडेस्वार दौडत आला.

" काय बातमी, जता ? " दिवाणांनीं विचारलें.

" कांहीं चांगली नाहीं. "

हे शब्द मला खिडकींतून स्पष्ट ऐकूं आले, परंतु त्यांच्यामध्यें कांहीं कुजबूज झाली ती मला ऐकूं आली नाहीं.

आणि मग पालखी आली व मागाहून एक मेणा आला. डाक्टर पालखीबरोबर चालत होते.

" तुम्हांला काय वाटतें डाक्टर ? " दिवाणांनीं विचारलें.

" अजून कांहीं सांगतां येत नाहीं. मस्तकांतली जखम जरा भयंकर आहे. " डाक्टर म्हणाले.

" आणि अमूल्यबाबू ? "

" त्याच्या छातींतून गोळी गेली. त्याचें आटपलें. "